KÂVYASANGRAHA. 22.

# THE POEMS

OF

# SOHIROBÂNÂTHA ÂMBIYE.

(A RENOWNED SAGE OF BÂNDE'M.)

## 1. SIDDHÂNTA SAMHITÂ

First Half.

*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

BY

VÂMANA DÂJÎ OKA,

HEAD MASTER, HIGH SCHOOL, RAIPORE.

PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂMA JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGARA" PRESS,

Bombay.

1896.

*Price 14 Annas.*

काव्यसंग्रह. २२.



साधुवर्य सोहिरोबानाथ आंबियेकृत

# पारमार्थिक कवितासंग्रह.



## १. सिद्धांतसंहिता.

### पूर्वार्ध.

'कवि संत सोहिरोबा बांदेगांवीं वसे महा द्विज हा ।
त्याची देखुनि कविता, हरि स्वजनां भूवरी म्हणे द्विज व्हा.' ॥

विठोबा अण्णा.

हा
वामन दाजी ओक,
हेडमास्तर, हायस्कूल, रायपुर,
यांनीं अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपा देऊन
जुनाट हस्तलिखित प्रतींच्या आधारें
तयार केला.

तो
मुंबईत जावजी दादाजी यांच्या "निर्णयसागर" छापखान्याचे मालक
तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१८९६.

किंमत १४ आणे.

हा ग्रंथ

श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य, मठ संकेश्वर,

ह्यांस,

त्यांची भक्तिपरायणता, सद्धर्माचारतत्परता,

आणि परमार्थसाधनासक्तता इत्यादि

गुणांच्या अभिनंदनार्थ

त्यांच्या अनुज्ञेनें

नम्रतापूर्वक

अर्पण केला असे.

'काव्यसंग्रह'कार.

# अनुक्रमणिका.



---

## आभारप्रदर्शन.


या ग्रंथाची मूळ हस्तलिखित प्रत आमचे परम मित्र **रा० रा० भगवंतराव बाळकृष्ण पै रायकर** मु० होडावडें यांनीं महत्प्रयासानें मिळवून आम्हांस दिली; यास्तव आम्ही त्यांचे फार आभारी आहों.

'काव्यसंग्रह'कार.

# सोहिरोबानाथकृत पारमार्थिक कवितासंग्रह.

## भाग पहिला.

### १. सिद्धांतसंहिता.

#### अध्याय पहिला.

(ओंव्या.)

**नमोऽस्त्वनंताय सहस्रमूर्तये सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे ।**
**सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्रकोटीयुगधारिणे नमः ॥**

१. या 'सिद्धांतसंहिता' ग्रंथाची जी प्रत आम्हांस मिळाली आहे, ती शुद्ध रीतीनें लिहिलेली नाहीं. दुसरी प्रत मिळण्यासाठीं आम्ही पुष्कळ प्रयत्न केला, तथापि ती मिळाली नाहीं आणि यासाठीं असलेल्या प्रतीवरूनच निर्वाह करून घेणें आम्हांस भाग पडलें. या ग्रंथांतील मूळ संस्कृत भागांत बऱ्याच ठिकाणीं अशुद्धें दिसून येतात, तीं होतील तेवढीं शुद्ध करण्याविषयीं खबरदारी ठेविली आहे; तथापि कांहीं न्यूनाधिक्य असण्याचा संभव आहेच, तरि 'कां न सदन बांधावें, कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस'—या पंतोक्तीला अनुसरून आम्हीं प्रयत्न चालविला आहे; कालेंकरून या ग्रंथाची दुसरी शुद्ध प्रत मिळून पुनरुज्जीवनाचा प्रसंग आल्यास त्या वेळीं हा आमचा प्रस्तुत प्रयत्न साह्यभूत होणारा आहे. सोहिरोबाच्या कवितेंत जीं अशुद्धें आढळतात, त्याबद्दल कवि दोषास पात्र नाहीं, कारण सोहिरोबानें केलेले ग्रंथ पदें इत्यादि वाङ्मय अन्य लोकांकडून लिहविलेलें आहे; लेखकांस भाषेचें अज्ञान असल्यामुळें त्यांनीं कानावर शब्द आले ते कसे तरी लिहून ठेवले आहेत; बरें, कवीनें तरी आपण सांगितल्याप्रमाणें लेखकानें ठसा उमटविला आहे कीं नाहीं, हें पाहिलें पाहिजे होतें; परंतु सोहिरोबांची वृत्ति यासंबंधानें उदासीन होती. यांना हठयोगाची पूर्णसिद्धि झाली होती; ब्रह्मानंदाचे वेळीं जे उद्गार आले ते ते बोलून चुकले; पुन्हा त्या संबंधाच्या नीटनेटकेपणाकडे लक्ष पुरविण्याची त्यांस गरज नव्हती. सोहिरोबांची कविताही त्यांनीं केलेली कविता नव्हे. ही त्यांचेकडून स्फूर्तिप्रभावानें झालेली कविता होय; भाषेच्या संबंधानें कविलाच अज्ञान होतें असें म्हणावें तर जी या कवीची कृति उपलब्ध झाली आहे तीवरून पाहतां सोहिरोबांस भाषापरिज्ञान चांगलेंच होतें असें वाचकांस वाटल्याविना राहाणार नाहीं. तसें नसतें तर त्यांच्या उक्तीचा एवढा ठसा उमटलाच नसता असें आम्हांस वाटतें. सोहिरोबाची कविताकृति इतर कविकृतींहून अगदीं भिन्न प्रकारची असून केवळ स्वानुभवयुक्त अशी स्वतंत्र आहे. तींत भारतभागवतादिकांतील कथानकसंबंध मुळींच नसून केवळ भक्ति, ज्ञान, वैराग्य, नीति, इत्यादिकांचा समावेश आहे; म्हणून

**निःसंगं निर्मलं शांतं निराकारं निरंजनम् ।**
**नित्यं तृप्तं निरावर्तं निगमातीतनिर्गुणम्. ॥ १ ॥**

जेंवी घटीं[1] व्यापिजे आकाश[2] । आणि घट पावलिया नाश । उरलाचि असे अवकाश[3] । जया परी ॥ १ ॥ शिवुनि सोवळा पवन[4] । पोळेनी[5] गुप्त हुताशन[6] । तेंवी सर्व निरसूनी[7] निर्दान[8] । उरे जें कां ॥ २ ॥ सर्व सेवितां न भरे रसना[9] । सर्व श्रवणीं शून्य[10] श्रवणा । सर्व देखत अंधत्व नयनां । होय जेथें ॥ ३ ॥ स्पर्श करितां निर्जीवा । उपरमेचि[11] अनुभवा । चरण घेती मांघोवा[12] । प्रतिबिंब[13] वाटे ॥ ४ ॥ उत्पत्तीचा[14] हर्ष नाहीं । उद्वेग[15] नुपजे प्रलयीं[16] कांहीं । गर्जत असतां अचल पाहीं । समुद्र जैसा ॥ ५ ॥ कठिणत्व दावुनी शीतळ । उदक जैसें निर्मळ । कीं न हाले जेंवि भूमंडळ[17] । भूतोत्पातीं[18] ॥ ६ ॥ जें अवयवांवीण स्वरूप । कीं वातीविरहित दीप । अतींद्रिय[19] निष्कंप[20] । परं[21]-

---

यासंबंधानें इतकी सूचना देणें अवश्य आहे कीं ही कविता केवळ शब्दालंकार, वाक्यालंकार, अर्थालंकार, तसेंच छंदःशास्त्र, व्याकरण इत्यादिक नियमानुरूप ताडून पाहणाऱ्या जनांस आनंददायिनी वाटणार नाहीं. परंतु भक्ति, ज्ञान, वैराग्य, इत्यादि प्रकारानुरूप ही कविता अवलोकन करणाऱ्या जनांस आनंद वाटल्याविना राहणार नाहीं, अशी आमची समजूत आहे. •अर्वाचीन सुप्रसिद्ध भगवद्भक्त कविवर्य **विठोबा अण्णा** दप्तरदार यांनीं **सो**हिरोबांची बहुतेक कविता लक्षपूर्वक पाहिली होती, व ते तिला फार मान देत असत, तो या कवितेंत ज्ञानमार्ग विशेष आहे, याच गुणामुळें होय. **अ**ण्णांनीं यांच्या कवितेविषयीं एका आर्येंत म्हटलें आहे कीं:–'कविसंत **सो**हिरोबा **बां**देग्रामीं वसे महा द्विज हा । ज्याची देखुनि कविता, हरि स्वजनां भूवरी म्हणे द्विज व्हा ॥'. (हरि=परमात्मा; स्वजनां=आपल्या भक्तजनांस, निरंतर सन्निध असणाऱ्या जनांस म्हणतो; भूवरी=मृत्युलोकांत; द्विज=द्विजन्मे व्हा, पुनर्जन्म धारण करा.) **अ**ण्णासारख्या विद्वान् आणि भक्तिशील पुरुषानें ज्या कवितेविषयीं इतका गौरव केला आहे, त्या कवितेंत कांहीं तरी सत्तत्वांश आहे, यांत संशय नाहीं.

१. घड्यांत, घागरींत. २. घटांतील पोकळी, अंतर्भाग. ३. पोकळी, आकाश. ४. वायु, वारा. ५. भाजून, दग्ध करून. ६. वैश्वानर, अग्नि. ७. नाश करून. ८. कारण, शेवट, नाशिवंत भाग नाहींसा झाल्यानंतरही स्थिर असणारें तत्व. ९. जिव्हा. 'रसना कांचिजिह्वयोः इति विश्वप्रकाशः. १०. शून्य=अभाव, कांहीं नाहीं असें. ११. शांति, विराम. १२. मागले मागें, माघां, मागें. १३. प्रतिबिंब वाटे=अविद्येमध्यें चिदात्म्याचा पडच्छायारूप जीव जो त्य वाटे–मार्गांत. १४. जगाच्या झालेपणाचा. १५. उद्विग्नपण, त्रास, कंटाळा. १६. जगदंतां समयीं. १७. पृथ्वी, भूगोल. १८. पंचमहाभूतें–१ पृथ्वी २ आप् ३ तेज ४ वा ५ आकाश–यांच्या विशेष प्राबल्यानें, अनियमितपणानें. १९. इंद्रियांनीं जाणण्यास अशक्य इंद्रियातीत. २०. स्थिर, अचल. २१. ब्रह्मात्मस्वरूप, परतत्व.

ब्रह्म ॥ ७ ॥ आकार झालिया न होय । [1]आकार लोपतां न जाय । अविनाश-
पणें नित्य आहे । ते गा! [2]वस्तु ॥ ८ ॥ जेथ पाहा तें पाहणें मावळलें ।
गगन सर्वांगीं गाळिलें । नाशिवंत म्हणोनि वाळिलें । [3]दिसतें दृश्य ॥ ९ ॥
तेंवी सर्वकाळीं जें आहे । तेंचि [4]निरंजन पाहें । [5]दृश्यदृष्टीस दिसेना हें । तेंचि
जाण ॥ १० ॥ जयासि नाहीं आदि अंत । तेंचि [6]निरामय सिद्धांत । स्वानु-
भवें [7]सांद्यंत । जाण ऐसें ॥ ११ ॥ जेथ पैं [8]पंचभूतें नाहीं । [9]गुणत्रय लेश
कांहीं । तें पद [10]परात्पर पाहीं । अर्थेवीण ॥ १२ ॥ क्षुधा नाशिवंत सेवी । ते
रसना घेतसे चवी । ते [11]चवीची चवी बरवी । घेतसे जो कां ॥ १३ ॥ हें
[12]नित्यतृप्ताचें लक्षण । [13]निरोपचारें तृप्त जाण । [14]स्वसंवेद्य संतुष्टपण । निरंतर
॥ १४ ॥ [15]अविद्येचा आवर्त । जेथ न बाधे [16]विवर्त । सुटे जेथ पैं [17]सांगात ।
[18]गुणत्रयांचा ॥ १५ ॥ तें जाणावें [19]निर्गुण । जेथ [20]कुंठलें [21]वेदें वर्णन । तें स्वयें
जाणती खुण । [22]योगेश्वर ॥ १६ ॥

**अच्युतमादिमध्यांतमनंतं परमेश्वरम् ।**
**प्रकाशं दिव्यमानं च शाश्वतं चाचलं ध्रुवम्. ॥ २ ॥**

[23]आदी अंतीं जागृतीं आहे । [24]स्वप्न भासलें वायां जाये । [25]विश्वांतीं अंतीं राहे ।

---

१. जगदाकार. (जें ब्रह्म जगदाकार झाला तरी आपण तद्रूप होत नाहीं.) २. शुद्धवस्तु, परब्रह्म. ३. दृग्गोचर होणारा जगद्भास. ४. मायारहित एकांत स्थान. ५. दृश्य दृष्टीस=अविद्यामय जगाची घडामोड पाहणाऱ्या चर्मचक्षूंस, अज्ञानी जनांच्या डोळ्यांस. ६. निरुपाधिक, व्याधिआधिरहित (ब्रह्म). ७. इत्थंभूत. ८. पृथ्वी, आप्, तेज, वायु, आकाश हीं पंचमहाभूतें. ९. गुणत्रय=तीन गुण—सत्व, रज आणि तम. १०. आपला—परका, मागें झालेला व पुढें होणारा शाश्वत असा. ११. स्वाद घेण्याची. १२. तृप्ताचें लक्षण=सर्व संसार निवृत्त झाल्यावर ज्याला आपण नित्य मुक्त आहें असें वाटतें तें. (हीच निरंकुशतृप्तिसंज्ञक अवस्था. ही प्राप्त झाली असतां कोणतीही कर्तव्यता न राहिल्यामुळें पुन: दु:ख होण्याचें कारणच नाहींसें होतें. 'निवृत्ते सर्वसंसारे नित्यमुक्तत्वभासनात् । निरंकुशा भवेत्तृप्तिः पुनः शोकासमुद्भवात् ॥' (सार्थ पंचदशी, विद्यारण्यस्वामिकृत, तृप्तिदीप, श्लोक ४७). १३. उपाधिरहित, संसाररहित, उपायरहित. १४. आपणास आपण जाणणें, अन्य संवेद्यरहित, ज्ञानस्वरूप वस्तु. १५. मायेचा भोवरा, जननमरणाचा फेरा. १६. विवर्त=खोट्या वस्तूचे ठायीं खऱ्या पदार्थाचा भास, मिथ्याबुद्धि, भ्रम, भास. १७. संगती. १८. गुणत्रयाचा=सत्व, रज, तम या तीन गुणांचा. १९. तिन्ही गुणरहित. २०. कुंठित झालें. २१. वेद=चार वेद—ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद. २२. योगेश्वर—योगी पुरुष, सिद्ध पुरुष. २३. प्रारंभीं तेंच होतें, अंतींही तेंच राहाणार व जागृतावस्थेंतही ब्रह्मच शाश्वत राहाणारें आहे. २४. मायारूपी जें हें जगत्स्वप्न हें वायां (व्यर्थ) जाणारें आहे. २५. विश्वाचा नाश झाला असतांही जें नाश पावत नाहीं.

अविनाश जें[1]. ॥ १७ ॥ अनंतरूपीं अनंत कळा । अनंत भजनें अनंत लीळा । जयाचिया मुळीं निराळा । द्रष्टा[2] जो कां ॥ १८ ॥ ऐसा जो कां परमेश्वर । परात्पर गुरु दिगंबर । स्वयंप्रकाशें अंबर[3] । व्यापुनि आहे ॥ १९ ॥ जया तेजाचिया दीप्ति[4] । चंद्र सूर्य पैं हारपति । विश्व हारोनि ज्ञप्ति[5] । उरे जो कां ॥ २० ॥ ऐसें जें कां शाश्वत[6] । अव्यय[7] पद सदोदीत । नकळे मन बुद्धीस मात[8] । तेथील पैं ॥ २१ ॥

**व्यापकं सर्वसाक्षित्वं सत्यत्वमजरामरम् ।**
**नियतं नित्यसत्वस्थं सच्चिदानंदनिष्कलम्. ॥ ३ ॥**

आकाश जेणें पंघळ[9] । पवन[10] जयानें चपळ । जयाचेनि अनळ[11] । दाहक पैं तो ॥ २२ ॥ आर्द्रता[12] जयाचेनि जळा । जेणें साक्षित्व महीतळा । पिंड ब्रह्मांडीं कळा । चालक जो कां ॥ २३ ॥ चारी खाणी[13] असंभूत[14] । परस्परें

---

१. जें ब्रह्म. २. पाहणारा, अलिप्त असून जगाची घडामोड पाहणारा. ३. आकाश. [**‘अंबरं** वाससि व्योम्नि कार्पासे च सुगंधके’ इति विश्वः.] ४. प्रकाश, कांती, तेज. ५. ज्ञान, बुद्धि. ६. सदोदित असणारें नित्य. ७. नाश नाहीं असें. ८. गोष्ट, सुभावा. ९. विस्तारलेलें, अवाढव्य. १०. वायु. ११. अग्नि. १२. अतिशय पातळपणा, द्रवण्याचा धर्म. १३. चार प्रकारचे प्राणीः—उद्भिज्ज, अंडज, स्वेदज व जरायुज. उद्भिज्ज म्हणजे भूमि भेदून अंकुरादिरूपानें वर येणारे वृक्ष, तृण इत्यादि; अंडज म्हणजे अंड्यापासून झालेले पक्षी, सर्प इत्यादि; स्वेदज म्हणजे घामानें आणि उबेनें उत्पन्न झालेले मत्कुणादि, आणि जरायुज म्हणजे मनुष्यपश्वादिक प्राणी. ‘जरायु’ नांवाचे चर्मानें मनुष्य पश्वादिकांचे गर्भ वेष्टित असतात, म्हणून त्यांस ‘जरायुज’ म्हणतात. जरायु म्हणजे व्यावहारिक महाराष्ट्र भाषेंत ‘वार’ म्हणतात, तेव्हां ज्या प्राण्यांस उपजतेवेळीं वारेचें वेष्टण असतें ते प्राणी जरायुज. स्वेदज, अंडज आणि उद्भिज्ज यांजविषयीं विशेष माहिती मनुस्मृतींत आहेः—‘पशवश्च मृगाश्चैव व्यालाश्चोभयतोदतः । रक्षांसि च पिशाचाश्च मनुष्याश्च जरायुजाः ॥ ४३ ॥ अंडजाः पक्षिणः सर्पा नक्रा मत्स्याश्च कच्छपाः । यानि चैवंप्रकाराणि स्थलजान्यौदकानि च ॥ ४४ ॥ स्वेदजं दंशमशकं यूकामक्षिकमत्कुणम् । उष्मणश्चोपजायंते यच्चान्यत्किंचिदीरितम् ॥ ४५ ॥ उद्भिज्जाः स्थावराः सर्वे बीजकांडप्ररोहिणः । ओषध्यः फलपाकांता बहुपुष्पफलोपगाः ॥ ४६ ॥ [मनुस्मृति—अ० १.] भावार्थः—पशु, मृग, दोन दंतपंक्तीनें युक्त असे व्यालादिक (सिंहादिक), राक्षस, पिशाच, आणि मनुष्य हे जरायु, म्हणजे गर्भाचें जें आवरणचर्म त्यांत प्रथम होऊन नंतर त्यांतून उत्पन्न होतात, अतएव ते जरायुज होत. पक्षी, सर्प, मगर, मत्स्य आणि कांसव हे प्रथम अंडाचे ठायीं उत्पन्न होतात म्हणून हे अंडज होत. स्थलाचे ठायीं होणारे सरठादिक व उदकाचे ठायीं होणारे शंखादिक ते क्रमानें स्थलज व औदकज जाणावे. डांस, माशा, यूका,

साक्षी वर्तत । [1]असत्य मायेमाजी सत्य । स्वस्वरूप [2]जें ॥ २४ ॥ [3]सद्रुपें पैं [4]गुं-णातीत । [5]चिद्रुपेंचि गुणासहित । [6]दृश्य सांडुनी चिद्रुपीं रमत । तोचि जाण आनंद ॥ २५ ॥ जीवित्वाची न बाधे बाधा । ऐसें आलें जयाचिया बोधा । आपण लागे आपुलिया शोधा । निरंतर पैं[7] ॥ २६ ॥ ऐसें निष्कलंक गहन । जेथें वसे दिव्य ज्ञान । तेथें औपाधिक अज्ञान । कैंचें उरे? ॥ २७ ॥

**विशिष्टं पूर्णसज्ज्ञानमज्ञानांशविनाशनम् ।**
**अतीतमर्थरूपाणामीशमदृश्यतत्पदम्. ॥ ४ ॥**

शबल [9]शुद्धांशीं [10]पूर्ण ज्ञान । [11]निरसी अन्यथा अज्ञान । पंचविषय समाधान । भोगुनि त्यागी ॥ २८ ॥ विषयीं असूनि [12]अतीत । [13]अदृश्य जो कां साक्षीभूत । [14]प्रकृतीघरीं दीप[15]वत् । असे जो कां ॥ २९ ॥

**त्वंपदं भाषितं सर्वं रज्जुसर्पनिराश्रयम् ।**
**संतुष्टं निर्जितश्रांतं त्रैलोक्यभुवनोद्भवम्. ॥ ५ ॥**

---

मक्षिका, ढेंकूण हे घर्मापासून उत्पन्न होतात, अतएव ते स्वेदज होत आणि असे जे दुसरे प्राणी उष्मापासून होतात ते उष्मज होत. बीज व भूमी यांचा भेद करून जे उत्पन्न होतात (वृक्ष) ते उद्भिज्ज होत. ते दोन प्रकारचे आहेत; कितीएक बीजापासून होणारे व कितीएक त्या त्या शाखा भूमींत लावल्यानें होणारे. जे कितीएक [व्रीहि, यव इत्यादि] वृक्ष पुष्फळ फलपुष्पांनीं युक्त होऊन फलें पक्क झाल्यानेंच आपण नष्ट होतात ते औषधि होत. [मनुस्मृति–प्रा० भा०].१४. चारी खाणींतल्या प्राण्यांच्या उत्पत्ति स्थिति लयाशीं अलग=निराळा.

१. खोटी असी माया त्या मायेंत सत्य स्वरूप जो आत्मा. २. परब्रह्म. ३. मायामिश्रित जें ब्रह्माचें स्वरूप तें त्यानें. ४. मायेच्या त्रिविध गुणाहून निराळा. ५. शुद्ध ब्रह्म, ज्ञानस्वरूप. ६. दिसणारें मायामय जग=सद्रुप ब्रह्म सांडून चिद्रूपीं=शुद्ध ब्रह्म, ज्ञानस्वरूपामध्यें रममाण असतो. ['एवं श्रुतिविचारात्प्राग्यथा यद्वस्तु भासते । विचारेण विपर्येति ततस्तच्चिंत्यतां वियत् ॥' पंचदशी–प्रकरण २ श्लोक ६५.] ७. हें वाक्यपूरणार्थ अव्यय आहे. ८. मायिक, अज्ञानांतलें. ९. शुद्ध ब्रह्मांश. १०. परिपूर्ण. ११. नाहींसें करी. १२. निराळा. १३. न दिसणारा. १४. सांख्यशास्त्रांत प्रकृति आणि पुरुष हे शब्द प्रधान आहेत. प्रकृति आणि पुरुष यांच्या संयोगापासून सकल जड सृष्टीची उत्पत्ति आहे. या शास्त्रांत पदार्थाचे दोन वर्ग केले आहेत. एकांत चेतन पदार्थांचा समावेश केला आहे व दुसऱ्यांत अचेतनांचा. चेतन पदार्थ कायतो पुरुष. प्रकृति इत्यादिकांचा समावेश अचेतनांत होतो. याविषयीं सविस्तर वर्णन **'सरलार्थबोधिनी गीता'** पृ० ३१७-३४४ यांत पहावें. [सरलार्थबोधिनी गीता–पुस्तक २ अंक २-३-४.] १५. दिव्याप्रमाणें.

सर्व संसार भासला तरी । सर्प जैसा दोरावरी । तेंवी [1]स्थूल [2]सूक्ष्म [3]पैरी । [4]आभास पैं गा! ॥ ३० ॥ त्रिविध[5]तापीं श्रम झाले । [6]मुमुक्षु वीत[7]रागा आले । ईश्वरें संतुष्ट केले । [8]निजात्मबोधें ॥ ३१ ॥ त्रैलोक्या जेथुनि उद्भव । तो अ-नादि देवांचा देव । देऊं पसरला [9]खेंवें । बाहुविणा ॥ ३२ ॥

**अव्ययं श्रीनिधानं यत्सुलभं दैविसंपदम् ।**

**ज्ञानांजनसुकृतात्समभ्यासाद्योगसंज्ञितात्. ॥ ६ ॥**

जेथें दैवी संपत्तीचे गुण । तया परब्रह्म प्रसन्न जाण । तेंथचि बोधाचें सुलभपण । सहज भावें ॥ ३३ ॥ आत्मज्ञानाचें फल हें जाण । अक्षयचि पावे कल्याण । [10]जंन्ममरणपरिभ्रमण । न पडे पुनः ॥ ३४ ॥ जें [11]अव्यय [12]बीज [13]निधान । [14]सांपडे सुयिल्या ज्ञानांजन । सुकृत समुदायें करून । फळ हेतुविणें ॥ ३५ ॥ जीवशिव ऐक्याची खुण । दावी तोचि [15]अभ्यास जाण । [16]असंप्रदायें करून । निर्मळ पैं तो ॥ ३६ ॥

**यच्चराचरयोः स्थानं पवित्रं यत्परात्परम् ।**

**निर्वाणं निर्भरं धीरं विस्तृतं सहजस्थिरम्. ॥ ७ ॥**

जें परेहुनी [17]परें । दर्शनें जीवाचा उद्धार । [18]पुनरावृत्तीचें घर । मोडुनी सांडी ॥ ३७ ॥ [19]आघवेंचि करी ब्रह्मरूप । [20]अविद्येचें नुरवी पाप । तरंगरूपी

---

१. स्थूलदेह. (अस्थिमय शरीर.) २. पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, पंचप्राण, मन आणि बुद्धि मिळून सत्रा. याला सूक्ष्म शरीर अथवा लिंगदेह म्हणतात. ३. प्रकार. ४. दृष्टदोषादि कारणामुळें असत्य पदार्थाचा जो भ्रम होतो तो, प्रतिबिंब. ५. ताप तीन प्रकारचे आहेत ते असे:–आधिदैविक (देवतांच्या क्षोभापासून होणारा–जसा वीज पडणें), आध्यात्मिक (मनाच्या क्षोभापासून अथवा शरीराच्या रोगापासून होणारा–जसा खरूज, ताप), आणि आधिभौतिक (पृथ्वी, आप्, तेज, वायु आणि आकाश या पंचमहाभूतांच्या क्षोभानें होणारा–जसा भूकंप, अतिवृष्टि, समुद्रमर्यादोल्लंघन.) ६. मोक्षाची इच्छा करणारे. ७. वैराग्यदशेला. ८. मी जीव नव्हे आत्मा आहें असा स्वयंप्रकाश आत्म्याविषयीं बोध होतो त्यानें. ९. आलिंगन. १०. 'पुनरपि जननं पुनरपि मरणम्' या प्रकारची दगदग. ११. नाशरहित. १२. मूळ उत्पत्तीस कारण. १३. ठेवा, भूमीगत द्रव्यनिधि; (पक्षीं) परब्रह्म. १४. सुयिल्या ज्ञानांजन=ज्ञानरूप अंजन–सुयिल्या=घातलें असतां. (जो मनुष्य पायाकडून जन्मतो त्याला पायाळ म्हणतात. एक प्रकारचें सिद्धांजन त्याच्या डोळ्यांत घातलें असतां त्याला भूमिगत ठेवा=द्रव्य दिसून येतें असें मानतात.) १५. योगाभ्यास. १६. आचार, विचार, धर्माचरण केल्यावांचून. १७. चार वाचांपैकीं प-हिली वाचा परा, तिच्याहून भिन्न. १८. पुनर्जन्ममरण. १९. अवघें, एकंदर. २०. मायेचें.

आप[1] । जया परी ॥ ३८ ॥ गंगेमाजी ओहळ पडे । तद्रूप होउनी महिमा वाढे । तेंवी दृश्य[2] द्रष्टा[3] एकचि घडे । दृष्टी पुढें ॥ ३९ ॥ जयामध्यें चराचर[4] । निर्माण झालें गोचर[5] । आंत बाहेर अगोचर । स्वस्वरूप जें ॥ ४० ॥ सकळांसंगें न जाय । सर्व निमालिया उरलें आहे । तेंचि चैतन्य[6] पाहें । निर्वाण[7] जें ॥ ४१ ॥ जया शस्त्रें छेद नाहीं । अग्निसवें न जळे कांहीं । न बुडे महाप्रवाहीं । उदकाचिया ॥ ४२ ॥ किमपि पैं वायूनें न हाले । कालत्रयीं जें न वाळे । जयाची आज्ञा पाळे । लोकत्रय ॥ ४३ ॥ देह चेष्टतां[8] नाहीं झालें । निचेष्टित पडतां नाहीं मेलें । ऐसें पहातें पाहणें झालें । स्थीरस्थ[9] तेणें ॥ ४४ ॥ गगनें[10] व्यापिलिया कांहीं । स्थिरचरीं उरलेंचि नाहीं । तेंवी सर्व सृष्टीच्या ठायीं । विस्तारलें ॥ ४५ ॥ अन्वयासकट तोचि पाहीं । व्यतिरेकें त्यांत नाहीं । ऐसें गुरुगम्य[11] कांहीं । जाणती योगी ॥ ४६ ॥ विकृतीवीण अविकृत । सहज स्थिर तें सतत । देहीं असोनि देहातीत । असणें ऐसें ॥ ४७ ॥

**अभयं सत्वसांनिध्यं नियतं फलनिर्मलम् ।**
**दृश्यतन्मात्रविगतं चिन्मयं भवतारकम्. ॥ ८ ॥**

ईश्वर सत्ता पाहते सत्व[12] । तया सन्निधचि परम तत्वं[13] । हृदयीं वसे साक्षित्व । अभयप्रद ॥ ४८ ॥ निश्चय बैसे तयेठायीं । तेंचि परब्रह्म मी पाहीं । अविनाश फळ तें कांहीं । निर्मळ पैं गा ! ॥ ४९ ॥ दृश्य विषय त्यागुनि । ज्ञानचि उरलें निर्दोनीं । भवार्णवीं कल्पनें वरूनि । बुडालाचि तारी ॥ ५० ॥

**बीजं यत्सर्वलोकानां स्थितिप्रभवयोस्तथा ।**
**सर्वाणां लयबीजं यत्पुनरुद्भवकारणम्. ॥ ९ ॥**

ब्रह्मया रूपें सृष्टी करी । विष्णुरूपें स्थिति धरी । रुद्ररूपें संहरी । निदानीं[14] उरे ॥ ५१ ॥ महाकल्पाच्या[15] अंतीं । मागुती रची भूतजाती । विधातयाची[16] दिनराती । ऐसें होय ॥ ५२ ॥

१. उदक. २. पहाण्याची वस्तु, मायामय जग. ३. पाहणारा. ४. स्थावर आणि जंगम. ५. दृष्टोत्पत्तीस येणें. ६. ब्रह्म (जीव, आत्मा, ज्ञान, चित्त) चेतना, सजीवपणा. ७. मोक्षपद, शेवट. ८. व्यापार करतां. ९. शांतता पावणें, दृढ होणें. [भगवद्गीता–अध्याय २ श्लोक २३ पहा.] १०. आकाशानें. ११. गुरुकृपेनेंच प्राप्त होणारें. १२. खरेपणा. १३. परतत्व, ब्रह्मात्मस्वरूप. १४. कारणीं, शेवटीं. १५. जगदंत महाप्रळयाच्याही नंतर. १६. ब्रह्मदेव.

**अनादिसिद्धशुद्धोऽयं व्योमांतस्यावकाशकः ।**
**सर्वं प्रकाशकं ब्रह्म परमात्मा परात्परः ॥ १० ॥**

ऐसा देव अनादिसिद्ध[1] । निरुपाधि[2] नित्य शुद्ध । आकाशासि सिद्ध । अवकाश जो कां ॥ ५३ ॥ चंद्र जेणें तेजवंत । सूर्य जेणें दीप्तिमंत[3] । अग्नि एवढा मिरवत । जया तेजें ॥ ५४ ॥ जग जयानें शोभिवंत । प्राणीगण मूर्तिमंत । एवं सर्वांशीं जो भगवंत । प्रकाशक ॥ ५५ ॥ जो परमात्मा परात्पर । सर्वव्यापी विश्वंभर । ब्रह्मादिक नेणती पार । तया स्वरूपाचा ॥ ५६ ॥

**परवृद्धिकरं सूक्ष्मं सर्वस्याधिष्ठितं हृदि ।**
**निमग्नं नित्यकालेन संतुष्टं सततं सुखम्. ॥ ११ ॥**

कूर्मी[4] करितां निरीक्षण । पिलियां होय संतोषण । तेंवी सर्ववृद्धीसि कारण । सूक्ष्म सत्ता ॥ ५७ ॥ चुंबकाचें[5] सन्निधान । होतां लोह होय चेतन । तेंवी सकल उद्भवासि कारण । सूक्ष्म सत्ता ॥५८॥ तैसें सकळ झालें सृष्टीं दिसे । परी ईश्वरसत्ता प्रत्यक्ष न दिसे । ते दिसलियावीण असे । सन्निधचि. ॥ ५९ ॥ देहावेगळें मीपण । उठे तें रूप तेंचि जाण, । ते खुण संत विचक्षण[6] । जाणती पैं ॥ ६० ॥ हृदयभुवनामाझारी । चिद्वृत्तीचिया[7] भरीं । साक्षित्व जें निर्धारी । तेंचि रूप. ॥ ६१ ॥ निरूपचारीं[8] निमग्न । मायावसनातीत नग्न । जया स्वरूपीं होय भग्न । पुण्यपाप. ॥ ६२ ॥ आपण रसना आपण रस । आपण घाण आपण सुवास । आपण त्वचा आपण स्पर्श । अव्यक्तपणें.॥६३॥ आपणचि डोळा आपण रूप । आपण गृह आपण दीप । आपण प्रजा आपण भूप । व्यापकपणें. ॥ ६४ ॥ ऐसा स्वसंवेद्य[9] संतुष्ट । प्रतिगृहाप्रति नचले इष्ट । तया आत्मपदाची गोष्ट । ऐसी असे. ॥ ६५ ॥ ऐसें सुख पैं अखंड । जेथ मावळलें पिंडब्रह्मांड[10] । ते खुणचि जाणावी उदंड[11] । बोलोनि काय? ॥ ६६ ॥

---

१. जुनाट, आदिमध्यांतरहित, नित्यसिद्ध. २. उपाधिरहित, संसाररहित. ३. दीप्ति=प्रकाश, तेज. ४. कांसवीनें. असेंच तुकारामानेंही म्हटलें आहे:—'कांसवीचीं पिलीं । कूर्मदृष्टीनें सांभाळी.' ५. अयस्कांताचें. ६. चतुर, ज्ञानी. ७. ज्ञानवृत्ति. ८. उपायरहित. ९. आपणास आपण जाणणारा. १०. जीव सृष्टी, पंचभूतात्मक जीव सृष्टी. ११. दंड् धातूपासून निघालेल्या शब्दांकडे लक्ष दिलें असतां मूळच्या अर्थाचा थोडथोडा संबंध ठेवून कशीं अर्थांतरें होतात तें ध्यानांत येईल. दंड म्हणजे शिक्षा, ती करण्याचें साधन म्हणून काठीलाही दंड नांव पडलें, त्यापासून दांडा शब्द निघाला. काठीचा उपयोग आडवी बांधून धोतर वगैरे

**चिरंजीवं चिदाकाशं चिदानंदं पराशयम् ।**
**सदैव संस्थितं शीघ्रमनिर्देश्यं सनातनम् ॥ १२ ॥**

एकवट भूतें विघडती । तया मरण ऐसें बोलती । ब्रह्म तयातीत म्हणती । अमर ते पैं ॥ ६७॥ आंत प्रतिबिंब वेगळें दिसे । तयावीण आरसाचि असे । तेंवी दृश्य[1] गाळुनि द्रष्टत्व[2] वसे । चिदाकाश[3] तें ॥ ६८ ॥ अदृशी दृश्य आहे। दृश्य दृष्टीं अदृश्य पाहे । उभय दृष्टी माजी राहे । चिदानंद तो. ॥ ६९ ॥ जो परेवाचेच्या ईश । परमात्मा परम प्रकाश । जयाचिया दर्शना अवकाश । न लगेचि कांहीं ॥ ७० ॥ जैसें स्वांगेंहि धन । गुप्त करोनि ठेविलें जाण । व्हावें[4] तेव्हां काढितां क्षण । न लगे जैसा ॥ ७१ ॥ ऐसा पुरातन पैं ठेवा[5] । उघडा जयाचिया दैवा । तो संस्कारहि जाणावा । अविद्यमान[6] ॥ ७२ ॥

**अवस्थितमनाश्रित्यमचुंबितमनागमम् ।**
**सदसच्च विजातीनां विगतस्पृहनिस्पृहम् ॥ १३ ॥**

जया ब्रह्माचे ठायीं । स्वभाव विभाव कांहींच नाहीं । अनाश्रित[7] केवळ पाहीं । निराधार ॥ ७३ ॥ जेथ गमनचि नाहीं मनाचें । स्तवन न चाले वाचेचें । जें निर्विकार सदा साचें । मायेमाजी ॥ ७४ ॥ 'सत्' म्हणतां दिसेनां[8] हें । 'असत्' म्हणतां नाशिवंत नोहे । ऐसें विजातीवीण आहे । निरंतर ॥ ७५ ॥ इच्छा त्यागिली हे जेथें । प्रपंच हर्ष रिघेना तेथें । म्हणोनि निस्पृह म्हणावें तें । परब्रह्म ॥ ७६ ॥

**ज्ञप्तिमात्रकलातीतं शुद्धावस्थोन्मनि स्थितम् ।**
**विमर्षं सर्वनिष्कर्षं वासनातीतवस्थितम् ॥ १४ ॥**

अवस्था पंचमास्ति । ऐसें बोले वेद श्रुति । ते उन्मनी[9] म्हणिजति । शुद्धावस्था; ॥ ७७ ॥ वासनातीत वास । केवळ ज्ञप्ति[10] प्रकाश । सकळ नाम रूपाचा नैराश्य[11] । होतसे जेथ. ॥ ७८ ॥ ऐसें जें कां विमर्ष[12] । नित्य रूप निष्कर्ष[13] । तेथ विषय बुद्धि हर्ष । न होय पैं ते. ॥ ७९ ॥

---

वाळत घालण्यास करतात त्यामुळें दांडा हा शब्द झाला. आतां उदंड याचा अर्थ उंच आहे दांडा ज्याचा तें म्हणजे उंच छत्री वगैरे. यावरून उदंड म्हणजे पुष्कळ असा अर्थ झाला. 'मी खलदंडें उदंड तापतसें'. मोरोपंत—धेनुहरण (व्युत्पत्तिप्रदीप.)

१. दिसणारें प्रतिबिंब. २. पाहणारें. ३. चैतन्यरूप आकाश, ब्रह्म. ४. पाहिजे तेव्हां. ५. पुरून ठेविलेलें द्रव्य. ६. प्रस्तुत नसलेला. ७. अन्य आश्रय नाहीं असा. ८. अक्षर, चिरकालीन. ९. जेथें मनाचा लय होतो अशी पांचवी अवस्था. १०. ज्ञान. ११. निराशपणा. १२. विवेक. १३. सिद्धांत, शेवट.

**शृणोति सर्वमश्रोत्रा सर्वं स्पृशति चात्वचा ।**
**पश्यत्यचक्षुषा सर्वं रसं गृण्हात्यजिन्हया ॥ १५ ॥**

जया कानेवीण ऐकणें । आणि डोळ्यांवीण देखणें । जिन्हेवीण चाखणें । सर्व रसांतें. ॥ ८० ॥ सर्व श्रवणीं एकचि ऐके । सर्व नयनीं एकचि देखे । सर्व रसनीं एकचि चाखे । अव्यक्त रूपें ॥ ८१ ॥ सकल त्वचा एकचि स्पर्शे । स्पर्श घेतां पैं न हर्षे । ह्रदयीं रिघोनि न दर्शे[1] । जिवाला या ॥ ८२ ॥

**घ्रात्वापि सर्वमघ्राता मूको बहुवचोऽपि यः ।**
**अकरः सर्वकर्तापि पादहीनोऽपि सर्वगः ॥ १६ ॥**

सर्व नासिकें गंध घेई । निर्माण करिल्या घ्राण नाहीं; । बहु वाचेनें बोलतां ही । अबोला तो; ॥ ८३ ॥ सर्व हस्तें क्रिया होय । सत्तावंत तो अक्रिय[2] आहे; । आघवे चरणीं चालताहे । परि न चले जो कां. ॥ ८४ ॥

**उपस्थे मन्मथश्चैव पायुः सर्वविसर्जितः ।**
**गुणातीतमसंभाव्यं सर्वेंद्रियविवर्जितम् ॥ १७ ॥**

उपस्थे[3] मन्मथ[4] होय । तेथ नलगे त्याची सोय । भूत संयोगें होत आहे । परस्परें पैं ॥ ८५ ॥ पवनाचेनि माजें । वंशासि लागतां वंश[5] वाजे । तेथ व्यापुनि आहे सहजें । आकाश जैसें ॥ ८६ ॥ हुजरातीचा[6] सरदारी । सहजें जो कां प्रवेश करी । तेंवी मुखें आहार स्वीकारी । तो परिहरे तेथें ॥ ८७ ॥ तेंवी पायुस्थानीं[7] विसर्ग[8] । स्वीकारितां नैसर्ग[9] । कीं हा आघवाचि[10] इंद्रियवर्ग । शरीरयोगें ॥ ८८ ॥ तो सकळ इंद्रियांवेगळा । त्रिगुणीं[11] न मिळे त्याची कळा । असंभाविता[12] निराळा । निरालंब[13]. ॥ ८९ ॥

**नांतःकरणरूपं तन्न संकल्पं न मानसम् ।**
**बुद्धिबोधश्च तन्नैव चित्स्मरणं च नैव तत् ॥ १८ ॥**

अंतःकरणाचें गेह । आश्रित आहे देह । आत्माराम विदेह[14] । अंतःकरण नव्हे ॥९०॥ मनाचें मनोगत दृश्य । तया जाणता अदृश्य । तो मनचि अवश्य ।

---

१. दृष्टीस पडत नाहीं. २. क्रियारहित. ३. शिश्नेंद्रिय. ४. काम, मदन. ५. वेळू, कळक. ६. राजाच्या भरवशाचे फौजेचा मुख्य सेनापती. ७. गुदद्वार. ८. मलविसर्जनक्रिया. ९. स्वाभाविक. १०. एकंदर. ११. त्रिगुणीं=१ सत्व २ रज ३ तम या तीन गुणांत. १२. विचार—मनन करण्यास जो अववड तो. १३. निराश्रय, शून्य. १४. ज्याला स्थान, मान, अपमान कांहीं नाहीं असा.

म्हणणें केंवी? ॥ ९१ ॥ संकल्प विकल्पाचा स्वभाव। मिथ्या भासीं उठे धांव। तया कर्तव्याची हांव। बुद्धिभरें ॥ ९२ ॥ ते अन्यथा नियंत्या पासाव। हें कळे पैं ज्ञानास्तव। तया जाण तयाचा स्तव। हाचि तो कीं. ॥ ९३ ॥ चित्ताचा स्वभाव आठव,। तोहि संसार घेतसे ठाव। तयाहि साक्षित्वाची [1]गंव। सांपडे केंवी? ॥ ९४ ॥

**उदानो नैव प्राणोऽयमपानो नैव निश्चितम्।**
**न च व्यानः समानश्च देहाहंता हि नैव सः ॥ १९ ॥**

मीपण वागवी देहाचें। तेंही नव्हे स्वरूप साचें। व्यानाशीं व्यापणें सर्व संधींचें। तेंही नव्हे ॥ ९५ ॥ समान वायु नाभिस्थान। [2]अधिष्ठित तेंही नव्हे नि[3]दान। आहार पचवी उदान। तोही नव्हे ॥ ९६ ॥ क्रियाशक्तीचा पति प्राण। तोहि नव्हे निर्वाण। अपानाचें [4]शौचपण। तेंहि नव्हे ॥ ९७ ॥ ऐसा पंचप्राणविरहित। आत्मयातें प्रकाशित। हाचि ज्ञानसिद्धांत। सर्वत्र पैं ॥ ९८ ॥

**गृहस्थो नैव संन्यासी भोक्ता त्यक्ता न चैव सः।**
**न वक्ता न हि मूकश्च न ग्राह्यो ग्राहको न सः ॥ २० ॥**

देहसंयोगें गृहस्थाश्रम। देहास्तवचि संन्यासधर्म। हें नाशिवंतांतील कर्म। आहे तें वर्म वेगळेंचि ॥ ९९ ॥ झाला पदार्थ नासे सहज। तयाचा करुनियां [5]बुंज। उपयोगा लाविलें काज। इंद्रियांला ॥ १०० ॥ स्वीकार करितां गृहस्थ दिसे। त्यागिलिया संन्यासी असे। हें एका देहावरीच भासे। अज्ञान दृष्टीं ॥ १०१ ॥ देह नासलिया संन्यास कोठें। आणि कोठें राहिले गृहस्थ मोठे। [6]सत्ते आंगीं नुमटे। दोन्हीही पैं ॥ १०२ ॥ [7]पिंड पदार्थासहित कीं हे। परस्पर वेगळें आहे। म्हणोनि जेथील भोग तेथ पाहे। भोगत्यागाविण ब्रह्म ॥ १०३ ॥ म्हणोनि करिना पैं करवी। देहीं आत्मसत्ता बरवी। हें स्वयें स्वानुभवी। जाणती पैं ॥ १०४ ॥ मुका नोहे, न बोले। याचे विस्तार व्हावे ऐकिले। ज्याचिये [6]सत्तेविण न हाले। तृण तेंही ॥ १०५ ॥ सत्तेनेंचि आकार होय। परि येथिलें तेथ धरितां न ये। जेंवी [8]फेनालाचि तोय। म्ह-

१. गंव—गुप्तपणा, मतलब. हा शब्द कोंकणांत चालतो. २. आश्रयभूत. ३. कारण. ४. मल विसर्जन करण्याची क्रिया. ५. बाऊ, खोटा समज. ६. चैतन्यसत्ता. ७. शरीरास मी म्हणणारा जीव. ८. समुद्राच्या फेणास किंवा पाण्याच्या बुद्बुदांस.

णतां नये ॥ १०६ ॥ अग्निपासाव धूर जाय । परि धूरचि अग्नि म्हणतां नये । तेवीं परमात्म्यापासुनि सकल होय । तें परमात्मा नोहे ॥ १०७ ॥

**नैव नाम न धामं च न चोष्णं शीतमेव च ।**
**न तिमिरं प्रकाशश्च रात्रिर्नैव दिनो न च ॥ २१ ॥**

जेथ नाहीं दिवस राति । उष्ण नोहे शीत ज्योति । तें जाण अक्षयज्योति । परब्रह्म ॥ १०८ ॥ जया नाहीं एक नाम । जया नसे एक धाम । निपटुनि नसे जेथ तम । प्रकाश तोही ॥ १०९ ॥ चर्मदृष्टीचा प्रकाशतम । दिव्य दृष्टीं नुरेचि भ्रम । तो जाण पैं पुरुषोत्तम । परब्रह्म ॥ ११० ॥ जेथ दुजें कांहींच नोहे । तेथ तम प्रकाश कवण पाहे ? । ऐसें होउनि जें राहे । परब्रह्म ॥१११॥

**नायं पुमान्न नारी च क्लीबो नैव न मानवः ।**
**नैनं रूपं न चाकारो न कुक्ष्युदरपृष्ठयः ॥ २२ ॥**

नारी पुरुष उत्पन्न करी । म्हणोनि नोहे दोन्ही वरी । किंवा नैंपुंसक म्हणों तरि । वृद्धि होय ॥ ११२ ॥ स्त्रीपुरुष नैंपुंसक असा । पाहोनि म्हणणें देहाचा ठसा । तया निराकाराला कैसा । आकार म्हणणें ॥ ११३ ॥ म्हणोनि नाहीं रूपरेख । कीं नसेचि तया मुख । पोटपाठी काख । नाहीं तया॥११४॥ बालदशा तारुण्यपण । कीं वृद्धदशा विभूषण । सबळ आणी बळ लक्षण । नव्हे तेथें ॥ ११५ ॥ बुद्धी आणी पिशाचपण । बालादि उन्मत्तता जाण । हें विदेहाला देह लक्षण । कल्पूं कैंचें ? ॥ ११६ ॥ नव्हे लहान नव्हे थोर । वाटोळा ना लांब दूर । चंचल नोहे स्थीर । ऐसें जाण ॥ ११७ ॥ एवं भावाभावातीत । अगोचर जें शाश्वत । तें तत्वज्ञ संत । जाणती पैं ॥ ११८ ॥

**न भक्षन्न रक्षन्न चेक्षन्न साक्षी परोक्षापरोक्षे न दृश्यं न लक्ष्यम् ।**
**न वेद्यं न भेद्यं ह्यखेदंस्त्वमोदमबाधं च न स्वादमेतन्न सर्वम् ॥२३॥**

कपित्थ गिळिलिया गजें । अंतर्गर्भ नाहीं होय सहजें । तेंवि सकल चें-

---

१. नाश नाहीं अशी. २. चर्मदृष्टी=मनुष्याची नजर. ३. अंधकार. ४. षंढ, क्लीब. ५. बालादि उन्मत्तता=१ बाल, २ उन्मत्त ३ पिशाच्च असे योग्यांचे स्थितीचे तीन प्रकार आहेत. ६. देहच नाहीं अशाला. ७. तत्व जाणणारे, ब्रह्मज्ञ. ८. कंवटीचें फळ. हें फळ हत्ती न फोडतां गिळतो आणि तें जशाचें तसेंच त्याच्या मलद्वारांतून बाहेर पडतें. त्याला कोठें छिद्र नसतें परंतु आंतील गर्भ नाहींसा होतो असें सांगतात. पण ही समजूत भ्रांतिमूलक समजली पाहिजे. (जैसें कपित्थ गजभुक्त तशीच हानी—वामनपंडित.) ९. स्थावरजंगमा.

राचरा मावळी जे । जेथील तेथ ॥ ११९ ॥ परी भक्षिता न दिसे डोळां । आणि रक्षिता न दिसे काळा । ऐसी अगम्य[1] कळा । भगवंताची ॥ १२० ॥ स्थूलदृष्टी स्थूल दिसे । तेथ कवण कवणाला पाहतसे । मिथ्यत्वाचा साक्षी असे । कवण तेथ ॥ १२१ ॥ एकदां वृथा जाणलें होय । त्यांत मागुती जाणणें काय । म्हणुनी खेदही न साहे । तयाचा पैं ॥ १२२ ॥ स्वप्नींचें कर्म अकर्म । कवणा निवडणीं पडे भ्रम । मिथ्यत्वेंचि पाविजे क्रम । मृगजलनदी[2] ॥ १२३ ॥ ऐसें ब्रह्मस्वरूप अबाध । कशाचाचि न घे स्वाद । तयासी विषयाचा बाध । कैसेनि होय ॥ १२४ ॥ सर्वां आदींचा आद्य । ब्रह्मस्वरूप अनाद्य[3] । जया वर्णितां वेद । स्तब्ध ठेले ॥ १२५ ॥

**न जातिर्न तथा ज्योतिर्न शुद्धिश्च प्रशंसनम् ।**
**न गानं नैव च ध्यानं न प्रीतिर्न च रीतयः ॥ २४ ॥**

[4]अजन्म्यासि कैंची जाति । [5]अक्रिया कासया ज्योति । निर्मळासि कशानें धूति । [6]अकथ्या न पोथी कथनाची ॥ १२६ ॥ [7]अनिर्वाचिया काय गाणें । अरूपा अगुणा काय पहाणें । एकापाशीं प्रीति धरणें । कवणें येथें ? ॥ १२७ ॥ ध्येयें[8] ध्याता[9] एक होय । तेथ रिती कैंची सोय । सर्व सृष्टी विरहित आहे । अदीक्षा जे ॥ १२८ ॥

**न छेद्यं न बध्यं न गंध्यं सुगंध्यं न निंद्यं न वंद्यं न वश्यं न वर्श्यम् ।**
**न चांगं न संगं न चांतं च भंगं अनंगं ह्यसंगं त्वनंतं ह्यभंगम् ॥ २५ ॥**

दृश्य पदार्थांचा छेद । न पडे जेथ बंध । पवन सुगंधा गंध । हारपे जेथें ॥ १२९ ॥ निंद्य वंद्य नाहीं जेथें । परतंत्रता नलगे तेथें । वर्णव्यक्तिरहीत येतें । अनुभवासी ॥ १३० ॥ अविद्येला कंद नाहीं । म्हणोनि कंदर्प न उठे कांहीं । आहे व्यापुनि सबाह्यीं । असंग पैं गा ! ॥ १३१ ॥

---

१. दृष्टोत्पत्तीस न येणारी, विचित्र, आश्चर्यजनक. २. मृगजल=माध्यान्हकाळच्या सूर्याच्या किरणांमुळें वाळवंटांत वाफा येऊन जलासारखा भास वाटतो व तें पाणीच आहे असें समजून मृगें त्यासाठीं धांवधांवून थकतात. यामुळें याला मृगजल असें म्हणतात. ३. आदिअंत नाहीं असा. ४. जो जन्मालाच आला नाहीं त्याला. ५. क्रियारहिता. ६. ज्याला लिहितां वाचतां येत नाहीं अशाला. ७. मुक्यास. ८. ध्येय=ध्यान करण्यास योग्य. ९. ध्याता=ध्यान करणारा.

**नास्ति वायोर्गतिर्यत्र शशिभान्वोर्न चालयम् ।**
**तत्पदं निर्मलं यांति योगिनः सुकृतात्परात् ॥ २६ ॥**

जेथ पवनाचें गमन नाहीं । चंद्रसूर्य न चले कांहीं । तें पद निर्मळ पाहीं । परात्पर ॥ १३२ ॥ बहुता जन्मांचिये अंतीं । योगी तें पद पावती । मु-[1]मुक्षुदशे आचरती । निष्काम कर्म ॥ १३३ ॥ निष्काम करितां योगकर्म । नासे फल हेतूचा भ्रम । तेणें पुढील जन्माचा श्रम । सहजें राहे ॥ १३४ ॥ ईश्वराची कळा कळति । त्याचिं लक्ष कर्में जळति । आघवीं सुकृतें फल देती । [2]अक्षय ब्रह्म ॥ १३५ ॥ अक्षय [3]शांतीचें घर । संत पावती निरंतर । अखंडैक अंतर । तेंचि होय ॥ १३६ ॥

**तमो नास्ति रजो नास्ति नास्ति सत्त्वं स्वसत्कृतम् ।**
**न जीवाश्चैव भेदाश्च शबलं शुद्धकल्पितम् ॥ २७ ॥**

सृष्टीच मिथ्या होय । तेथ तामस संहारी काय? । ईश्वरी सत्ता ते एकचि आहे । दुजेन विणें ॥ १३७ ॥ आघवेंचि पावलिया नाश । कैंचें सुख भोगी राजस? । तेंवी सर्वांसि ज्याचा प्रकाश । तेंचि उरे ॥ १३८ ॥ पुण्यपापाचा मेळ । दृश्यींच अवघा खेळ । गुणत्रयांसि वेळ । क्रमणें येथें ॥ १३९ ॥ पुण्य करितो सत्वगुण । पुण्याचें फल मिथ्याचि जाण । ओळखितां मी हा कवण । कांहींच नुरे ॥ १४० ॥ जाऊनि जीवांचें लघुत्व । येणेंचि पावणें महत्व । [4]उपाधि त्यागें [5]परमतत्व । आपणचि आहे ॥ १४१ ॥ [6]घट मठींचा [7]आभास । संकोच पावे अवकाश । तें मोडलिया आकाश । सहजीं आहे ॥ १४२ ॥ अलंकारिंचीं [8]अभिधानें । सहजीं असे तें सोनें । तेंवी द्विविध[9] [10]उपाधि भिन्नें । जीवशिव नामें ॥ १४३ ॥ अविद्योपाधिक जीव । मायोपाधिक शिव । उपाधिनिरसनीं स्वयमेव । परब्रह्म ॥ १४४ ॥ सबळ शुद्ध भेद नासे । आत्मस्वरूप प्रकाशे । तेंचि परब्रह्म विश्वासें । बाणलें होय ॥ १४५ ॥

**न व्योम न च भूमिर्नानलं न जलमारुतौ ।**
**ब्रह्मांडं नैव पिंडश्च न प्रचंडमुदंडितम् ॥ २८ ॥**

जेथें पैं आकाश नाहीं । तेथ पृथ्वी कोठील कायी । पाहातां तये ठायीं ।

---

१. मुक्तदशा. २. अविनाश. ३. इंद्रियांचें दमन होऊन चित्स्वरूपाचे ठायीं तल्लीन वृत्तीनें राहणें. ४. संसारयातना. ५. परब्रह्म. ६. जग, सृष्टी. ७. मिथ्याभ्रांति. ८. नांवानें. ९. दोनप्रकारची. १०. जग, संसार, प्रसंग, माया.

तेज कैंचें? ॥ १४६ ॥ जेथ नाहीं मारुत[1] । तेथ कैंचें भूतजात[2] । ब्रह्मांडही मावळत । तया स्वरूपीं ॥ १४७ ॥ तेथें काळ कैंचा प्रचंड । तेथें कवण पावतसे दंड । आत्मज्ञान उदंड । ऐसें दावी ॥ १४८ ॥

**सप्तद्वीपानि खंडानि पर्वताः सागरास्तथा ।**
**आवरणानि सर्वाणि प्रलये नैश्वराणि वै ॥ २९ ॥**

प्रलय कालाच्या ठायीं । कांहींच पैं उरणें नाहीं । सप्तद्वीपें[3] नवखंडांही[4] । नुरेचि भेद ॥१४९॥ समुद्र आणी पर्वत । समग्र पृथ्वी[5] आंत । जें जें कांहीं वर्तत । कांहींच नुरे ॥ १५० ॥ मेदिनी वेष्टन उदकाचें । उदका पांघुरण तेजाचें । तेजा सभवंतें वायूचें । आवरण असे ॥ १५१ ॥ वायू भवंतें आकाश । वरी सत्वाहंकाराचें[6] दुस[7] । वरी महत्तत्वाचा[8] आश्लेष[9] । असे जे कां ॥ १५२ ॥ हें आघवेंचि हारपोनि जाय । परब्रह्म अविनाश आहे । ऐसें पाहोनि तेथ राहे । ज्ञान कीं हें ॥ १५३ ॥ स्वप्नीं अनेक पैं पाहे । जाग्रति होतां आपणचि आहे । हें ज्याचें त्यासिच होय । जयापरी ॥ १५४ ॥

**न च स्थूलो न सूक्ष्मश्च महाकारणकारणे ।**
**सर्वं चराचरं नास्ति कैवल्यमेव शाश्वतम् ॥ ३० ॥**

जें स्थूल देहांचा विस्तार । मावळलाची सविस्तर । तेथ लिंगदेहाचा[10] प्रकार । न संभवेचि ॥ १५५ ॥ पंचविषय[11] वासना । अनुक्रमें वर्ते नाना । तेथें स्थूल देह उपर्जना[12] । कारण होय ॥ १५६ ॥ आश्रय कारण अज्ञान । तेंही नुरे झालिया ज्ञान । स्वस्वरूप अनुसंधान । महाकारण ॥ १५७ ॥ चराचर सर्व नासे । तेथें केंवी उरती चारिही[13] ठसे । ययांतीत[14] जें शाश्वत[15] असे । कैवल्यपद[16] ॥ १५८ ॥

---

१. वायु. २. प्राणीमात्र, जीवसमूह. ३. १ जंबुद्वीप २ शंखद्वीप ३ कुशद्वीप ४ क्रौंचद्वीप ५ श्वेतद्वीप ६ पुष्करद्वीप ७ शालमद्वीप. ४. १ भरतखंड २ व्रतखंड ३ रम्यखंड ४ द्राक्षमालखंड ५ मालखंड ६ हरिखंड ७ विधिखंड ८ वंशखंड ९ हर्णखंड. ५. पृथ्वी. ६. सात्विक अहंकार. ७. वस्त्र, वेष्टन, तंबू. ८. मूळमाया तीन गुणांची साम्यावस्था. ९. आलिंगन. १०. शरीराचा. ११. १ शब्द २ स्पर्श ३ रूप ४ रस ५ गंध. १२. उपर्जना=वृद्धी, उत्कर्ष, भरभराटी—हा शब्द कोंकणांत सर्वत्र चालतो. १३. चार प्रकारच्या मुक्ति=सायुज्यता, समीपता, स्वरूपता, सलोकता. १४. या चार मुक्तींच्या पलिकडे. १५. अविनाशी. १६. मोक्षपद.

**देवो भक्तो न यत्रैव बद्धमुक्तौ तथा न तु ।**
**न च स्नानं न संध्या च स्थानमानादि नैव तत् ॥ ३१ ॥**

जेथ नाहीं देवभक्त । जेथ नाहीं बद्ध मुक्त । जेथें नचले युक्त । मन बुद्धीची ॥ १५९ ॥ स्नान संध्या कर्मठपण । जेथ नाहीं प्रयोजन । जेथ नाहीं स्थानमान । लक्ष अनुसंधान तेथें कैंचें? ॥ १६० ॥

**ऋद्धिर्नैव न सिद्धिश्च न प्रबुद्धिर्न वेदनम् ।**
**न च ज्ञानं न चाज्ञानं न शिष्यो नैव सद्गुरुः ॥ ३२ ॥**

ऋद्धिसिद्धीचिया[1] सामर्थ्यी । आघवा[2] खेळ दृश्यपदार्थी[3] । संसारिका स्वार्थी । चमत्कार दिसे ॥ १६१ ॥ तेथ नाहीं त्रिशुद्धी । जेथ नचले देह बुद्धी । तेचि सहज[4] समाधि । सदैव असे ॥ १६२ ॥ अज्ञानाज्ञान जेथ गेलें । गुरु शिष्या ऐक्यत्व झालें । ऐसें स्वानुभवा आलें । जेथिचिया ॥ १६३ ॥

**नैव सौख्यं न दुःखं च न च कामो न कल्पिता ।**
**भावाभावौ न विद्येते तस्मिन्ब्रह्मनिरंजने. ॥ ३३ ॥**

विषय सुखाची हर्ष बुद्धी । जेथ नुरेची त्रिशुद्धी । तेथ दुःखार्णवाची आवधि । नाहींच पैं ॥ १६४ ॥ जेथ कामना नाहीं कल्पिता । भाव नाहीं अभावता । तें जाण पैं तत्वता । निरंजन[5] ब्रह्म ॥ १६५ ॥

**न निद्राजागरौ यत्र नैव मुद्रा न धारणम् ।**
**नैव त्यागो न भोगश्च तस्मिन्ब्रह्मनिरंजने. ॥ ३४ ॥**

जेथ निद्रा नाहीं जागणें । सांपडेना मुद्रा धारणें । त्यागणें ना भोगणें ।

---

१. अष्ट महासिद्धि, गरिमा लघिमादि यांच्या प्राप्तीनें पाहिजे ती वस्तु प्राप्त करून घेणें. २. सर्व. ३. मायामय जगांतील दिसणाऱ्या वस्तु. ४. आठवतां नाठवतां निरंतर ब्रह्मरूप स्थिति ती. (समाधि तीन प्रकारची आहे, सहजसमाधि, निर्विकल्प समाधि, सविकल्प समाधि या दोहोंच्या योगें निःशंकपणें जो सिद्धांत ठसला त्याचे ठायीं एकसारखें जें चित्ताचें स्थापन त्याला समाधि म्हणजे श्रवण, मनन, निदिध्यास म्हणतात. या निदिध्यासाची जी परिपक्वदशा तीच समाधि होय. या निदिध्यासामध्यें ध्याता, ध्यान, ध्येय ही त्रिपुटी भासते. तेथील ध्याता व ध्यान योगाभ्यासानें क्रमानें परित्यागून चित्त जेव्हां केवळ ध्येयरूपच होऊन निर्वातस्थळीं ठेवलेल्या दिव्याप्रमाणें निश्चळ राहतें त्याला समाधि म्हणतात. (ध्यातृध्याने परित्यज्य क्रमादध्यैकगोचरम् । निवातदीपवच्चित्तं समाधिरभिधीयते ॥ ५५ ॥ विद्यारण्य–सार्थपंचदशी तत्वविवेक प्र० १ पृ० १२.) ५. मायारहित शुद्ध ब्रह्म.

जेथ पैं गा! ॥ १६६ ॥ जेथ सुषुप्ती निद्रा निघाली । तेथ जागृतीही सर्वे गेली । सहज मुद्रा लागली । एकचि जेथें ॥ १६७ ॥ सबाह्याभ्यंतरीं ब्रह्मचि कळे । जेथ दुजेपण मुद्रा सहज गळे । समुद्रीं गंगा मिळे । जया परी ॥ १६८ ॥ चालती जे कां जागृति । स्वप्न सुषुप्ती गाळुनि घेति । तरीच पैं जाण प्राप्ती । ब्रह्मत्वाची ॥ १६९ ॥ आहे म्हणों तरी न दिसे दृष्टी । आणी दृष्टी पाहतां दिसे सृष्टी । नामरूपें दिधली पुष्टी । जेथें तेथें ॥ १७० ॥ हें आघवेंचि आलें नाशिवंतपणा । ईश्वर अविनाश म्हणवी आपणा । ऐशिया आस्तिक्याची खुणा । जाणती विरळा ॥ १७१ ॥ दृश्यीं लुब्ध त्या न दिसे दृष्टी । म्हणउनि बोले पाषांड गोष्टी । दृश्यावरील उडाली दृष्टी । तो तेंचि पाहे ॥ १७२ ॥ असणें नसणें याचा निर्णय । हाचि जाणावा अभिप्राय । ययासाठीं संतांचे पाय । सांडूं नये. ॥ १७३ ॥ ते अधिकारपरत्वें पाहती । हृदयींच दावुनी देती । मग अव्यय सुखाची होय प्राप्ती । तें ब्रह्म निरंजन. ॥ १७४ ॥

**रुद्रो नैव च विष्णुर्न नैव ब्रह्मा तु निर्मिताः ।**
**नैव मंत्रो न तंत्रं च तस्मिन्ब्रह्मनिरंजने ॥ ३५ ॥**

रुद्र नोहे विष्णु नोहे । हें व्यापारासिच नाम आहे । ईश्वरसत्ताचि निर्मिताहे । निमित्त ब्रह्मा ॥ १७५ ॥ वृथा आघवे मंत्र तंत्र । मिथ्या माया विचित्र । सेवट उरे एक चिन्मात्र । तें ब्रह्म जाण निरंजन. ॥ १७६ ॥

**नैव विप्रो न राजन्यो न च वैश्यो न शूद्रता ।**
**देवेऽजे सर्वजाते तु तस्मिन्ब्रह्मनिरंजने ॥ ३६ ॥**

मनुष्ययोनि आंत । ब्राह्मण क्षत्रिय वैश्य म्हणत । शूद्राचरणीं बोलत । शूद्र ऐसा. ॥ १७७ ॥ सर्वघटीं एक ज्योति । त्यासि कैंची कुळ याति। योगी जेथ तद्रूप होती । तें ब्रह्म जाण निरंजन. ॥ १७८ ॥ गृह पुसतां निवे ज्योति । कवणाचिये घरीं वाती । लाविलिया दीपचि म्हणती । तैसा सर्वाभूतीं ईश्वरू. ॥ १७९ ॥

---

१. गाढ निद्रा (योगनिद्रा). या अवस्था तीन आहेत. जागृति, स्वप्न, सुषुप्ति. २. नदी. ३. अस्तित्व, आहेपणा. ४. मायिक सृष्टींत. ५. पाखंडवाद, मिथ्यावाद. ६. अविनाशी. ७. ज्ञानस्वरूप. ८. क्षत्रिय. ९. तेज (सूक्ष्म सत्ता). ज्योति=धूर.

**नैवावरणवर्णौ त्वप्रसरणमसंक्षितम् ।**
**ज्ञानमयं च सर्वज्ञं दिव्यं ब्रह्मनिरंजनम् ॥ ३७ ॥**

जया नलगे प्रावर्णे[1] । जया नाहीं व्यक्ति वर्णे । जया नाहीं प्रसरण । द्वैतभाव. ॥ १८० ॥ नामचि नाहीं जयाला । कांसया ज्ञान व्हावें तयाला? । म्हणोनि किमर्थ पैं झाला । ज्ञाता येथ. ॥ १८१ ॥ वनाविरहित वसंत । तरंगाविना[2] सागर शांत । कीं दुजें नलगतां असे गुप्त । हुताशन[3] जैसा. ॥ १८२ ॥ मायेपासोनि तया नाम । तो तंव सहजींच अनाम । जया वसविता ग्राम । एकहि नोहे. ॥ १८३ ॥ मायेचें स्वरूप आकार । म्हणोनि म्हणती निराकार । आकारीं असती विकार । निर्विकार म्हणणें तयासि. ॥ १८४ ॥ नाश पावे दिसतें दृश्य । म्हणोनि म्हणणें अदृश्य । नयनीं दिसे तें लक्ष्य । म्हणोनि म्हणणें अलक्ष्य. ॥ १८५ ॥ उत्पन्न होय तें गणों येतें । म्हणोनि अगण्य म्हणणें त्यातें । देहसंगें एकमेकातें । म्हणोनि म्हणणें निःसंग ॥ १८६ ॥ मायायोगें सर्व दिसे । सर्वीं तोचि पैं प्रकाशे । शेवटीं सकलहि नासे । तोचि[4] उरे. ॥ १८७ ॥

**नियामकं दुराधर्षं निराकर्षं निषूदनम् ।**
**न च लिप्तमलिप्तत्वात्तच्च ब्रह्मनिरंजनम् ॥ ३८ ॥**

महाकाळातें आकळिता । ऐसा समर्थ जो का नियंता[5] । तया सारिखी सत्ता । आणिकां नाहीं. ॥ १८८ ॥ आकर्षणाला कांहीं । आपणावीण उरलें नाहीं । शासनधर्म जया ठायीं । जिराला पैं. ॥ १८९ ॥ लिप्त[6] नोहे अलिप्त । प्रकट नोहे गुप्त । पूर्णज्ञान होय प्राप्त । तें जाण ब्रह्म निरंजन. ॥ १९० ॥

**इति श्रीसिद्धांतसंहितायां सोहिराविरचितायां सदात्मस्वरूपयोगो नाम प्रथमोऽध्यायः संपूर्णः ॥**

---

## अध्याय दुसरा.

**अस्मिन्ब्रह्मनिराकारे जातो मायासमुद्भवः ।**
**अहं ब्रह्मास्मि तस्माच्च महत्तत्वं तु कारणम् ॥ १ ॥**

या निरंजनाचे पोटीं । इच्छा उद्भवली मोठी । मी ब्रह्म ऐशी उठी । अहं-

---

१. पांघरूण (वेष्टन). २. लाटांविना. ३. अग्नि. ४. परमात्मा. ५. सकल जगाचें नियमन करणारा. ६. झांकलेला.

पणाची ॥ १ ॥ तेंचि मायेसि मूळ । सृष्टी रचावया टवाळ[1] । महत्तत्व[2] सबळ । उमटतें झालें. ॥ २ ॥ जैसें निर्मळ पयामाजी । तक्र पडलिया सहजीं । दधी ऐशी नावाजी । जाहली तेथ. ॥ ३ ॥ कीं शांत उदकांत । अवचट कांहिं-एक पडत । तत्क्षणीं पैं उठत । नाद तेथें ॥ ४ ॥ आकाश निश्चळा आंत । मेघ आधीं गडगडत । मग वृष्टी ते होत । पृथ्वीवरी. ॥ ५ ॥ तेंवी प्रथम इच्छा होय । तेथ गुण[3] झाले अधिकारि त्रय । मग अनुक्रम होय । सृष्टीचा पैं. ॥ ६ ॥

**तत्रैव शबलांशात्त्वादौ रुद्रस्य समुद्भवः ।**
**तद्योगाद्द्रव्यशक्तिश्च तस्यां विष्णोः सुसंभवः ॥ २ ॥**

तेथ शबलांशाचिये[4] पोटीं । रुद्र जन्मला धूर्जटि[5] । द्रव्यशक्ति मोठी । उमटती झाली. ॥ ७ ॥ तये द्रव्यशक्तीचेनि योगें । विष्णु जन्मला तये संगें । लीलाधारी अनेक सोंगें । साभास[6] कल्पी ॥ ८ ॥ साभास कल्पने पोटीं । स्थिति वासना उटे मोठी । तेथ दुग्ध जैसें ओटीं । गुप्त राहे ॥ ९ ॥ जेंवी दुग्धीं साय वेगळी होय । परी दुग्धचि होउनि आहे । तैसी निराकारी राहे । वैष्णवी माया. ॥ १० ॥ तेथ चातुर्य आघवें निघतां, । सहजेंचि येतसे सा-वधता । मग सत्वगुण तत्वता । उटे तेथ. ॥ ११ ॥

**अहंकाराच्च सत्त्वात्तु ज्ञानशक्तेः सुसंभवः ।**
**तदुत्पन्नविधाता च जायतेऽत्र क्रिया ननु. ॥ ३ ॥**

तया सत्व अहंकारा पोटीं । ज्ञानशक्ती उठली मोठी । रचना संधान पोटीं । संभवतें होय ॥ १२ ॥ मग शबल भावना उदरीं । विधाता पैं जन्म धरी । सावयव[7] रचना करी । सृष्टीची पैं. ॥ १३ ॥ आघवेंचि पैं कर्म धर्म । सकल सृष्टीचा आक्रम । तेथें आरंभिला संभ्रम[8] । क्रियाशक्ती. ॥ १४ ॥ केल्या वांचुनि कहीं । सहजीं न मिळे कांहीं । क्रियाशक्ती इहीं । ओळखावी ॥ १५ ॥

---

१. मिथ्या. २. मूळमाया–शुद्धसत्वात्मक, तीन गुणांची साम्यावस्था. ३. मायेचे तीन गुण–सत्व, रज, तम. (त्रिविध अहंकार–सात्विक, राजस, तामस.) ४. अविद्यात्मक मलिनांश कीं शबल ब्रह्म अव्याकृत–महदहंकार पृथ्व्यापस्तेजोवाय्वाकाशात्मकत्वेन ब्रह्मरूपेणांडकोशेन कर्मज्ञानार्थं भासमानसकलशक्त्युपबृंहितं शबलं ब्रह्म. (निरालंबोपनिषद्). ५. शंकर. ६. दोराच्या ठिकाणीं सर्पाचा भास होणें. ७. अवयवयुक्त, आकारयुक्त. ८. भ्रांति.

पापपुण्य बीजावरी । ब्रह्मा सृष्टीचा खेळ करी । कर्मक्रियागुणधारी । होतसे पैं ॥ १६ ॥ तेंचि प्राणियां होय [1]संचित । क्रियमाणचि वेंचित । पुनती संग्रहीं पडत । तेंचि तें कीं. ॥ १७ ॥ कर्मानुसारें गुण उठती । गुणानुरूपें क्रिया होती । हे क्रिया भूत जाति । मनुष्ययोनी. ॥ १८ ॥

**सत्त्वं विष्णू रुद्रस्तमो रजस्तु कमलासनः ।**
**सर्वं त्रिगुणसंयुक्तं विस्तृतं सृष्टिकारणम् ॥ ४ ॥**

[2]सात्विकें विष्णु शोभे । [3]राजसें ब्रह्मा लोभे । [4]तामसें महेश [5]क्षोभे । सेवटियें ॥ १९ ॥ सत्वें वासना राहे । रजें स्थूलाकार होय । तमें संहार आहे । सान थोरां. ॥ २० ॥ तिहीं गुणावांचुनि लीला । यथास्थित न पडे डोळां । म्हणोनि भगवंतीं सोहळा । दाविला होय. ॥ २१ ॥ सत्वावांचुनि पुण्य न घडे । रजावीण अर्थ न जोडे । तमावांचुनि शासन न घडे । अन्यायासी. ॥ २२ ॥ संत सेवे सत्व व्हावा । प्रपंच साधना रज असावा । धैर्यावसानीं तम ध्यावा । कार्यावरी ॥२३॥ हे गुण असावे तेथें असती । तरी कैसेनि दोष वसूं येती । आणीकां पैं घडेल संगति । गर्भवासाची. ॥ २४ ॥ ऐशियां खेळावया [8]आंगण । नाहींच पैं आकाराविण । म्हणोनि शरिराचें [9]निर्माण्य । योजिलें [10]त्यांनीं. ॥ २५ ॥

**महत्तत्वाख्यमाया या अहमीश्वर एव च ।**
**संजातनिश्चयो यस्तु तमःक्रियासमुद्भवः ॥ ५ ॥**

तये [11]महत्तत्व मायेमाजी । मी ब्रह्म ऐसें सहजीं । संभवलें तें पैं उमजी । ईश्वरी सत्ता. ॥ २६ ॥ स्वयंभू रूपाचा विसर । पडलिया अहंकार उठला

---

१. क्रमाक्रमानें जन्मजन्मांतरांत घडत आलेल्या पुण्यपापाचा संचय. (अनंत जन्मींचें सांचलेलें कर्म.) २. सात्विक अहंकारानें, सत्वगुणानें. ३. राजस अहंकारानें, रजोगुणयुक्त. ४. तामस अहंकारानें, तमोगुणानें. ५. संहार करतो. ६. सेवटियें=जगत्प्रलयकालीं. ७. जन्ममृत्यूची. ८. आवार, जागा. ९. निर्माण करण्यास योग्य. १०. त्या त्रिविध अहंकारांनीं. ११. महत्तत्व माया=मूळ शुद्धसत्वात्मक माया, तीन गुणांचि साम्यावस्था, प्रकृति. जिचे मध्यें सच्चिदानंद ब्रह्माचें प्रतिबिंब आहे व जीमध्यें सत्व, रज, तम, हे तिन्ही गुण सारख्या मानानें आहेत ती. (चिदानंदमयब्रह्मप्रतिबिंबसमन्विता । तमोरजःसत्वगुणा प्रकृतिर्द्विविधा च सा ॥ १५ ॥ विद्यारण्य–सार्थपंचदशी पृ० ४). स्वयंभू=मूळ स्वरूप शुद्ध निखिल ब्रह्म.

क्रूर । मग पडला अंधकार । अज्ञानाचा. ॥ २७ ॥ तेचि वेळां अविद्या । अधिष्ठिली स्वसंवेद्या । भूलचि पडली सैद्या । तये स्थानीं. ॥ २८ ॥ तेथ अवस्था उठे सुषुप्ति । ना संसार अथवा मोक्षप्राप्ति । आघवेचि जाणते प्राप्ति । मूढत्वाची. ॥ २९ ॥ नेत्र झांकितां जैसें । सबाह्यांतरीं शून्यचि दिसे । तेंवी आत्मस्वरूप न प्रकाशे । दृश्य तमें ॥ ३० ॥ जेंवी अंधारीं गांठी सुटे । तेंवी द्रव्यशक्ति तेथें उठे । तें गगन पैं कोंदाटे । तियेकाळीं. ॥ ३१ ॥

**तस्माच्च प्रथमं शून्यं गगनोदरसंभवम् ।**
**पंच तन्मात्रमुत्पन्नं कुतोऽग्रे तदिदं शृणु ॥ ६ ॥**

तयाचिया योगें प्रथम । अवकाशीं व्यापिलें व्योम । प्रथम तो संभ्रम । कांहींच न दिसे ॥ ३२ ॥ जेथ चंद्रसूर्याचा टांक न पडे । तंव दिशांचा भेद न सांपडे । चराचर दृष्टि न पडे । पृथ्वीविण ॥ ३३ ॥ प्रजेविण नृपति देख । सहजेंचि होतो म्लानमुख । कीं प्रतिकूळीं पावे दुःख । तृष्णा जैसी ॥ ३४ ॥ तेंवी मी ब्रह्म ऐशी अहंकृति । उठतां न देखे भूतजाति । किं दिसेना हे ज्ञप्ति । मुळींच कीं ॥ ३५ ॥ मग मायारूपें अज्ञान । अन्यथा दावी समाधान । मग पंचविषय अनुसंधान । निर्माण करी ॥ ३६ ॥

**गगने तु भवेच्छब्दो रसस्त्वभवदप्सु च ।**
**स्पर्शरूपौ च वाय्वग्न्योर्गंधोऽयं मेदिनीगुणः ॥ ७ ॥**

शब्द स्पर्श रूप रस । गंध पृथ्वीचा अंश । शब्दरूपें गगनांश । जाणपें गा! ॥ ३७ ॥ स्पर्शरूपें पवन । रूपाचें रूप दहन । एवं पंच विषय समाधान । कल्पिलें आधीं ॥ ३८ ॥ हे विषय पंच तन्मात्रें । भोगावया मांडिलीं यंत्रें । ईश्वरसत्तेचीं सूत्रें । बुझें कैशीं ॥ ३९ ॥ आपण असोनियां वेगळा । पिंड कैसा बांधिला गोळा । चरित्र दाविलें डोळां । एकमेकां ॥ ४० ॥

१. वर जी प्रकृति महत्तत्व माया सांगितली तिचे दोन प्रकार आहेत; जी मध्यें शुद्ध सत्व गुण अधिक असून इतर दोन गुणांनीं तो गढूळ जाहलेला नसतो तिला माया असें म्हणतात व जीमध्यें तो गुण इतर दोन गुणांनीं गढूळ जाहलेला असतो तिला 'अविद्या, म्हणतात. २. मूल कारणभूत झाली. ३. आपणास आपण जाणणारा जो त्याला (परमात्म्यास). ४. लागलीच. ५. गाढ निद्रा (कारणदेहांतील प्रथमावस्था). ६. आकाश. ७. भ्रांति. ८. ठसा. ९. स्थावर जंगम. १०. प्राणिगण, पृथ्वी, आप्, तेज, वायु, आकाश हीं. ११. ज्ञप्ति=ज्ञान. १२. पंचविषय=शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध. १३. सूक्ष्म भूतें. १४. समजून घे. १५. शरीराम मी म्हणणारा जीव.

जन्मलेचि जन्म पावती । मेलेचि पुन्हां मरती । खादलेंचि खाती । मिळालें तें ॥ ४१ ॥ व्योम असे व्योमाकडे । धरा धरेवरी हिंडे । ऐसें जया दृष्टी न पडे । अज्ञान तें कीं ॥ ४२ ॥ पंचभूतांचे पृथक् अंश । नातुडतां[1] पैं पिंड वेषें[2] । अतीत[3] ऐसा जगदीश । चालवी जो कां ॥ ४३ ॥

**सात्विकज्ञानसंयोगादंतःकरणपंचकम् ।**
**सप्राणमिंद्रियाधीनं तच्च प्राक्तनयोगतः ॥ ८ ॥**

सात्विकाचेनि प्रसंगें । ज्ञानशक्तिचेनि संयोगें । प्रसवला पंचआंगें[4] । अंतःकरण ॥ ४४ ॥ प्रारब्धभोग[5] जो निघाला । तो अंतःकरणामाजि आला । मग तयाचि सारिखा झाला । वृत्तिभेद[6] ॥ ४५ ॥ तेथूनि वृत्ति बाहेर निघे । मग प्राणपंचकीं[7] रिघे । तदनंतर वळघे[8] । ज्ञानेंद्रियीं ॥ ४६ ॥ मग कर्में-[9]द्रियीं प्रवर्त्ते । भोगांचिया[10] आंवर्तें[11] । सावयव विलासीं रते । विषयांचिया ॥ ४७ ॥ म्हणोनि लिंगदेहीं[12] आधिष्ठान[13] । अंतःकरण मुख्यसि जाण । येरें[14] तत्वें कारण । आज्ञांकितें ॥ ४८ ॥

**अंतःकरणव्योमांशं निर्विकल्पं स्थितं तथा ।**
**वायोरंशान्मनश्चात्र संकल्पकविकल्पकम् ॥ ९ ॥**

अंतःकरणाचा स्वभाव । निर्विकल्प[15] निरभाव[16] । प्रपंच परमार्थी उगव[17] । न होय जेथें. ॥ ४९ ॥ नाहीं आकार अनुसंधान । नलगे निराकारीं ध्यान । तैसें स्तब्ध कीं मौन्य । पडे तेथें. ॥ ५० ॥ तयांतूनि उठे मन । तें पवनाचें उद्भवन । संकल्पविकल्पीं गमन । तयाचें पैं ॥ ५१ ॥ जें इंद्रियांमाजी श्रेष्ट । जें चंचलचि आहे स्पष्ट । जयाचिये संगें जीवासि कष्ट । कीं सुखही भोगी. ॥ ५२ ॥ मनाचा स्वभाव चपल । कल्पनें वेंटाळी ब्रह्म गोल । संकल्पसृष्टीचा खेळ । आवडे तया. ॥ ५३ ॥ मनासी रजोचें[18] बळ । म्हणोनि इच्छा

---

१. न सांपडतां. २. आकार. ३. निराळा, अलग. ४. अंतःकरणाचे पांच प्रकारः—१ अंतःकरण २ मन ३ बुद्धि ४ चित्त ५ अहंकार. ५. हें तीन प्रकारांनीं गणलें जातें. संचित, क्रियमाण, प्रारब्ध. ६. वृत्तीचे भेद दोन. ७. १ व्यान २ समान ३ उदान ४ प्राण ५ अपान. ८. फिरे. ९. कर्मेंद्रिय पंचक. १ वाचा २ पाणि ३ पाद ४ शिस्न ५ गुद. १०. प्राक्तन भोगाच्या. ११. भोंवऱ्यानें. १२. पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, पंचप्राण, मन, आणि बुद्धि, मिळून एक सूक्ष्म शरीर आहे, त्यालाच लिंगदेष म्हणतात. याविषयीं अन्यही एक मतभेद आहे. १३. मूलरूप. १४. बाकीचीं. १५. विकल्परहित. १६. हेतुरहित. १७. उगव=उपज, उत्पन्न. १८. रजोगुणाचें.

वाढली प्रबळ । विषय वासना मळ । न फिटे कदां. ॥ ५४ ॥ आंधळें जैसें धांवे । तेंवि स्वैरें[1] पदार्थीं भरे हांवे[2] । विषयाचिये[3] मावे[4] । न देखे तें. ॥ ५५ ॥

**तेजःसंभूतबुद्धेश्च स्वभावो निश्चयात्मकः ।**
**चित्तस्योदकभूतस्य स्वभावः स्मृतिकारकः ॥ १० ॥**

बुद्धी तेजापासूनि झाली । म्हणोनि देखणिकेला[5] आली । निश्चयाच्या सेलीं[6] । बैसली ते ॥ ५६ ॥ पुण्यपापातें जाणें । हें योग्य योग्य म्हणे । संसारीं मरणें जिणें । सर्वजाणे. ॥ ५७ ॥ चित्त उदकें झालें जाण । तयाचा व्यापार आठवण । विसर पडलिया स्मरण । सुचवूनि देतें. ॥ ५८ ॥ चित्तासी सत्वाचें बळ । म्हणोनि आठवतें सकळ । हें जाण तूं केवळ । द्रष्टत्वपणें[7]॥५९॥

**अहंकारो महीभूतो बद्धतायाश्च कारणम् ।**
**इति प्रकरणं चोक्तं सत्वाहंकारसंयुतम् ॥ ११ ॥**

•अहंकार पृथ्वीचा अंश । म्हणोनि जाड्यता[8] तयास । तयाचिया योगें बुद्धि क्लेश । जीव भोगी. ॥ ६० ॥ सहजें कीं जाहलें असे । भगवत्सत्ता प्रकाशे । तें आपण करितों ऐसें दिसे । मूढपणें. ॥ ६१ ॥ भलतया कर्मीं जाण । आपण राहतो दर्म्यान[9] । बद्धतेसी कारण । तेंचि होय. ॥६२ ॥ स्थूल[10] देहाला मीच म्हणे । द्रष्टा[11] वेगळा कवण नेणे । अन्यथा[12] ज्ञान मूर्खपणें । भ्रंशता[13] पावे. ॥ ६३ ॥ दृश्य[14] पदार्थीं नटे निका[15] । कधीं न मोडेचि बैसका[16] । संसार घोर असका[17] । पोटाळुनी[18] बैसे. ॥ ६४ ॥ एवं सात्विक अहंकारापासुनी । अंतःकरण-पंचक निवडुनी । परिसे राजसा विद्यमानीं । कवण झालीं. ॥ ६५ ॥

**राजसं कारणोत्संगं क्रिया[19]शक्तिसमन्वितम् ।**
**ज्ञानेंद्रियसमुत्पन्नं तथा यत्प्राणपंचकम् ॥ १२ ॥**

---

१. स्वच्छंद. २. हांवरेपणा, फार इच्छा, आशेला. ३. पंच विषयांचे (स्त्रीधनादिक विषयांचे). ४. कपटास. ५. दृष्टोत्पत्तीस. ६. वाटणीस, वांट्यास. ७. द्रष्टत्वपणें=ज्ञानदृष्टीनें. ८. जडपणा. ९. चिकटून. (हा शब्द कोंकणांत फार चालतो. जर्मानजुमल्याचे कागदपत्रांत दरम्यान मातीची मेर, आडा असें लिहितात.) १०. लिंगशरीराला, जड देहाला. ११. पाहाणारा, साक्षिभूत परमात्मा. १२. ज्ञान=मिथ्याज्ञान, प्रपंचज्ञान, व्यवहारज्ञान. १३. भुलून जाणें. १४. भासणारे मायिक पदार्थ. १५. नीटनेटका. १६. बैसका=निरुद्योगी, रिकामा. १७. एकंदर, सर्व. (हा शब्द कोंकणांत चालतो.) १८. पोटाजवळ घट्ट धरून. १९. कर्मप्राधान्य सत्ता.

रजोगुणाचिया संगें । क्रियाशक्तिचेनि योगें । ज्ञानेंद्रिय पंचांगें । उमटतीं झालीं. ॥ ६६ ॥ श्रोत्र त्वचा चक्षु घ्राण । आणि जिव्हेंद्रिय जाण । ज्ञानेंद्रिय प्रकरण । त्यातेंचि म्हणती. ॥ ६७ ॥ आतां प्राणपंचकाचें विवरण । कवण तें पैं जाण । हें जाणितलिया द्रष्टत्वपण । दृष्टीसि ये. ॥ ६८ ॥ मग द्रष्टत्व चढलिया हाता । यया कवण मी साक्षी पाहतां । पाहतें पाहणें ठेकतां । तेंचि होय. ॥ ६९ ॥ एक वायु दशविध जाहला । ठायिं ठायिं नाव पावला । पिंडीं पंचक वहिला । ऐक भेद. ॥ ७० ॥

**प्राणोऽपान उदानश्च समानो व्यानसंज्ञितः ।**
**वाचा तु पाणिपादौ चोपस्थं च गुदमेव हि ।**
**पंचकं प्राणवायोश्चेदं कर्मेंद्रियपंचकम् ॥ १३ ॥**

प्राणासि नासिकीं स्थान । क्रिया शक्ति प्रबल त्याचेन । गुदस्थानीं अपान । शौच्य करी. ॥ ७१ ॥ कंठमंडळीं उदान । पचन करी पैं भोजन । नाभिस्थानीं समान । संधि चाली ॥ ७२ ॥ व्यान सर्व संधिव्यापक । वृष्टी करी शरीरादिक । ययापरी पंचक । व्यापार जाण. ॥ ७३ ॥ अथवा कर्मेंद्रियांचा प्रकार । व्हावया पैं गोचर । तरी तेंचि पैं अवधार. । पंचविध ॥ ७४ ॥ प्रथम जे कां वाचा । नट नाट्य होय शब्दाचा । स्वतःभाव नाहीं ज्ञानाचा । बोलविलें बोले. ॥ ७५ ॥ तथा हास्य जे कां म्हणति । ते करविलेंचि पैं करिति । सकळ रसानें भरति । परि स्वाद नेणें ॥ ७६ ॥ आणि तैसेचि ते चरण । चालविल्या चालती जाण । ठाया ठाय प्रमाण । नाहीं तयां. ॥ ७७ ॥ तेंविचि तें उपस्थ । कल्पनेनें अस्ताव्यस्त । त्यासही सतत । ज्ञान नाहीं. ॥ ७८ ॥ गुदस्थान मलद्वार । तेथ विसर्गाचा व्यवहार । एवं जाण प्रकार । कर्मेंद्रियांचा. ॥ ७९ ॥

**पंचविंशतितत्वान्येवं च कर्मेंद्रियैः सह ।**
**तान्याश्रित्य तु जीवाख्या ज्ञानान्मुह्यत्ययं ननु ॥ १४ ॥**

ऐशीं हीं पंचवीस तत्वें । जीवासि अनुसरती साह्यत्वें । म्हणोनि पिंडामाजि महत्वें । मिरवला तो. ॥ ८० ॥ जेव्हां विषयांचें कार्य पडे । तेव्हां आ-

१. कर्मप्राधान्य सत्ता. २. दृष्टिसमोर उभे राहतां. ३. १ प्राण २ व्यान ३ समान ४ उदान ५ अपान. (१ धनंजय २ कूर्म ३ कृकुल ४ नाग ५ देवदत्त.) ४. जड शरीरांत. ५. जाण, समज. ६. शिश्नेंद्रिय. ७. मलमूत्रविसर्जनक्रिया.

घर्वी मिळती एकीकडे । एकमेकांचेनि निवाडें । साहित्य करिती. ॥ ८१ ॥ ययांचा वेगळा जीव स्वामी । तो अज्ञानें पडला भ्रमीं[1] । म्हणीतलें कर्म केलें मीं । ऐसें म्हणे. ॥ ८२ ॥ यया नियंतपणाचा[2] ठेसा । न कळुनी सोडिलें विश्वासा । म्हणोनियां गर्भवासा । आलों गमे. ॥ ८३ ॥

**आकाशसंभवं श्रोत्रं त्वक्च वायुसमाश्रिता ।**
**तेजोरूपं तु चक्षुश्च रसना जलमाश्रिता. ॥ १५ ॥**

श्रवण गगनाचें घर । त्वचा वायु करि बिऱ्हाड । नयन तेजाचे अग्रहार[4] । जाण पैं गा! ॥ ८४ ॥ उदक रसनेचा आश्रय करी । अवघेच रस पैं स्वीकारी । तेथुनी शरीरी करी । पैलोवेली[5]. ॥ ८५ ॥ तेजही तयाच परी । रूपा घरीं भिक्षा करी । पवन त्वचेच्या बाजारीं । सौदा[6] करी. ॥ ८६ ॥ गगन कर्णाच्या बिळीं[7] । शब्दाचि पैं पिलें गिळी । निःशब्दें मान पिळी । अर्थाची पैं. ॥ ८७ ॥

**पृथ्वी भूतमिदं घ्राणं गंधरूपेण सोज्वलम् ।**
**एवं च कथितं सर्वं ते ज्ञानेंद्रियकारणम् ॥ १६ ॥**

पृथ्वी घ्राणरसाचे घरीं । गंधविषयाची ग्राहकी करी । एवं ज्ञानेंद्रियपंचक वरी । निरोपिलें. ॥ ८८ ॥ रस गंध वसे एके ठायीं । ऐसा पदार्थ जो कांहीं । तो स्वीकारी आपणही । वरी रसनेंहि दे. ॥ ८९ ॥ रूप स्पर्श दोन्हि भागा । एकचि विषय आला पैं गा! । तेज भोगुनी करि त्यागा । पवना घरीं. ॥ ९० ॥ तेंवि स्पर्श शब्दाचा । पदार्थ असे तो दोघांचा । वायु आणि आकाशाचा । विभाग तेथें. ॥ ९१ ॥

**व्यानो गगनसाहार्थं व्याप्तः सर्वशरीरगः ।**
**पवनांशः समानस्तु नाभिस्थानसमाश्रितः ॥ १७ ॥**

गगनकाजा पवन । गेला तया नांव व्यान । स्वतंत्र कार्य समान । अभिधान पावे. ॥ ९२ ॥ तयासि आश्रय नाभिस्थान । करी हस्तपादादि-

१. उपाधींत, संशयांत. २. नियमनकर्तृत्वाचा. ३. उद्भिज्ज–वृक्षादि, स्वेदज–कीटकादि जाति, अंडज–पक्ष्यादि आणि जरायुज–मनुष्यादि हा ठसा, चार प्रकारचा छाप. ४. देवांस किंवा ब्राह्मणास दिलेला गांव इत्यादि इनाम. ५. वृद्धी, वाढ. ६. सौदा=उदीम, व्यापार. ७. बिळीं=कर्णद्वयांत.

वलन । त्याचेनि योगें धांवे मन । क्रियेवरी. ॥ ९३ ॥ तयावांचूनि कांहीं । शरिरीं होतचि नाहीं । श्वासोच्छ्वास तेही । सर्व त्यानें. ॥ ९४ ॥ योग साधन पैं आघवें । तयाचि योगें जाणावें । ब्रह्मरंध्रीं स्थिर व्हावें । त्याचेनि पैं गा! ॥ ९५ ॥ ऐसा समान श्रेष्ठ मध्यभागीं । कीं चालावया ऊर्ध्व मार्गीं । मृत्युलोकींहुनि स्वर्गीं । जया परि. ॥ ९६ ॥ ईडा पिंगळा ऐकवट । करोनि ओलांडिजे त्रिकुट । ब्रह्मरंध्रीं नीट । निघणें जें कां. ॥ ९७ ॥ म्हणोनि समानीं सर्व काज । समानीं समाधी सहज । हेंचि पैं उमज । ज्ञानयोगें. ॥ ९८ ॥

उदानस्तेजयुक्तोऽयं ग्रीवामंडलमाश्रितः ।
आहारसेवनं कृत्वा पाकं नयति सर्वदा. ॥ १८ ॥

दहनाचिया कामा । पवन झाला उदान नामा । वास केला कंठधामा । जयानें पैं. ॥ ९९ ॥ जो नित्य आहार स्वीकारी । तेवढाहि पैं पचन करी । एवढीही जाण थोरी । तयाची पैं. ॥ १०० ॥ ईश्वरसत्ता नित्य गुप्त । व्यापारें नाम पावे नैमित्य । वर्तन घडे तें अनित्य । मृगजल जैसें. ॥ १०१ ॥ अरूपासाक्षिणी कळा वसे । तिहूनि वेगळें तिशीं दिसे । कर्तृत्वीं अभिधान ऐसें । सहज पावे. ॥ १०२ ॥ मृत्तिका एक अनेक भांडीं । एक लोह अनेक खाडी । एक काष्ठ हांतुलें मांडी । अभिधान पावे. ॥ १०३ ॥

प्राणश्चोदकसंयुक्तो नासिकस्थानमाश्रितः ।
रसभोक्तृत्वसंतुष्टः क्रियाशक्तिः सुसंगतः ॥ १९ ॥

नासिकीं प्राणासीं स्थान । तेथूनि करी गमनागमन । रस सेविल्या संतोषपण । तया होय ॥ १०४ ॥ केलियावांचूनि कांहीं । जीवासि समाधान पैं नाहीं । ते क्रियेवीण पाहीं । कवणिये परी ॥ १०५ ॥ मौन्य धरितां

१. क्रिया=कांहिना कांहीं उद्योग करीत राहाण्याचा मनुष्याचा धर्म (कांहिना कांहीं केल्यावांचून क्षणभरही कोणी राहूं शकत नाहीं.) प्रकृतीचे गुण प्रत्येकाकडून बळेंच कर्म करवितात. (नहि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् । कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ गीता-अ० ३ श्लो० ५.) कां कीं, कांहींना कांहीं केल्यावांचून क्षणभरही कोणी राहूं शकत नाहीं । प्रकृतीचे गुण प्रत्येकाकडून बळेंच कर्म करवितात. [सुबोधचंद्रिका-पृष्ठ ५३.] २. ब्रह्मरंध्र=तालुस्थान, दहावें द्वार. ३. नरदेहांतील डावी नाडी. ४. उजवी नाडी. ५. इडा-गंगा, पिंगळा-यमुना, सुषुम्ना-सरस्वती या तिहींचा एकवट एक प्रवाह. ६. स्थूल. ७. आठव नाठवतां ब्रह्मरूपस्थिति ती. ८. चैतन्यकळा. ९. नाम.

समाधान । कांहीं नोहे बोलिल्यावांचुन । स्पर्श न करितां संतोषपण । न होय जैसें ॥ १०६ ॥ कांहीं तरी देखिल्याविना । नेत्र झांकोनि राहवेना । कांहीं एक सेविलें ना । तरी संतोष नाहीं ॥ १०७ ॥ सुगंधाचें देखतां रान । राहूं न शके प्राण । म्हणोनियां प्राणासि कारण । क्रियाशक्ति ॥ १०८ ॥

**अपानो मेदिनीभागो गुदमेंढ्रसमाश्रितः ।**

**विसृष्टमलमूत्रश्च शरीरशुद्धिकारकः ॥ २० ॥**

पवन मिळे मेदिनी[1] कामा । म्हणोनि अपान पावला नामा । शरीराचिया सोज्वळ कर्मा । लागि पैं तो. ॥ १०९ ॥ मल मूत्र विसर्जन करी । तेवढेनि जिवा संतोष वरि । हें कर्म परमेश्वरीं । लाविलें तया. ॥ ११० ॥ जंव जीव वसे शरीरघरीं । तंव चांगला प्रतिपाळ करी । आयुष्य पुरलिया नलगे क्षणभरी । आकर्षितां. ॥ १११ ॥ जंववरि तें काष्ठ असे । अग्नी तयानें आरक्त दिसे । सेखीं[2] काष्ठचि पावलिया विभूतिदशें । अदृश्य अग्नि. ॥ ११२ ॥ तेंवि चैतन्यदीपज्योत । तंवचि जीवित्व शोभिवंत । ते ज्योति जाहलिया गुप्त । प्रेत दिसे. ॥ ११३ ॥ म्हणोनि पंचप्राण अनुक्रम । हा ईश्वरसत्तापराक्रम । हें नेणें म्हणोनियां बाधे श्रम । अज्ञानयोगें. ॥ ११४ ॥

**वाचा तु व्योमसंभूता करावनिलसंगतौ ।**

**पादौ तु तेजसौ जातौ भारं देहस्य वाहकौ. ॥ २१ ॥**

आतां कर्मेंद्रियपंचकांत । कैशीं मिळती एकमेकांत । तेंचि निरूपण प्रस्तुत । कथन करूं. ॥ ११५ ॥ आकाश मिळे वाचेआंत । म्हणोनि शब्दासि नाहीं अंत । पवन भरे म्हणोनि हात । चळे पैं तो. ॥ ११६ ॥ चरणा मिळे दहन । यास्तव चरणा स्पर्शज्ञान । एकमेका संवाहन[3] । करिती जेथ. ॥ ११७ ॥ ऐसें द्रैष्ट[4] दृष्टी यावें । तरीच लिंगदेह निमावें । मग सहज तें पावावें । मोक्षपद. ॥ ११८ ॥ जेथुनी शब्द ये पैं गा! । तें लक्ष्य जपतचि राहे जो, गा! । मग विश्व[5] नाहीं ते तेथ जागा । राहिला जो कां. ॥ ११९ ॥ जें कां वाचेचें मूळ । तें अधिष्ठानचि अढळ । तेथ तद्रूपता केवळ । पावे जो कां. ॥ १२० ॥

---

१. पृथ्वी. २. शेवटीं. ३. साह्य, चोळणें, चेपणें. ४. साक्षित्व. ५. विश्व हें मायामय आहे तेव्हां अर्थात् विनाशि आहे, त्याचा नाश जाहल्यावर ब्रह्म शाश्वत—नित्य त्या ठिकाणीं जागा—जागृत.

**उपस्थं मन्मथोपेतं जलतत्त्वाच्च जायते, ।**
**महीतत्त्वाद्गुदं जातं वै कर्मेंद्रियकारणम्. ॥ २२ ॥**

[१]उपस्थामाजी मन्मथ । हे तत्व जलस्तंबचि होत । दैवत तेथ प्रजापत । चेतविते. ॥ १२१ ॥ आप हें नारायण । पृथ्वी ब्रह्मारूपें जाण । म्हणोनि बिंदूचें[२] जन्मस्थान । उदकचि होय. ॥ १२२ ॥ उदकास्तव अन्न । अन्नापासोनि रेत जाण । रेतास्तव प्राणिगण । जन्म पावे. ॥ १२३ ॥ रेत उदकाचें स्वरूप । करी पृथ्वीचा साक्षप । म्हणोनि मैथुना आप । कारण होय. ॥ १२४ ॥ पायूप्रति पृथ्वी राहे । विसर्ग[३] अवघा करीत आहे । ऐशिया प्रकारें पाहे । कर्मेंद्रियें. ॥ १२५ ॥

**द्रव्यशक्त्या तमोऽसूत पंचतन्मात्रसंज्ञितम् ।**
**शब्दस्पर्शौ रसो रूपं सुगंधश्चेति संज्ञितः ॥ २३ ॥**

तामस द्रव्यशक्ती सवें । पंच[४]विषय कैसा प्रसवे । तें पैं परिसावें । साधकजनीं. ॥ १२६ ॥ शब्द स्पर्श रूप रस । आणि गंध पृथ्वीचा अंश । हे पंचतन्मात्र बहुवस । निर्माण करी. ॥ १२७ ॥ मेदिनीविना संतोष । नोहे चहूंहि भूतांस । म्हणोनि पृथ्वीची कास । धरिली त्यांहीं. ॥ १२८ ॥ चारी भूतें कारण । पृथ्वी सर्वांचें कार्य जाण । तेणेंचि परतंत्रपण । प्राणिजातां[५]. ॥ १२९ ॥ पृथ्वीविना उत्पन्न नसे । पृथ्वीवरीच सर्व भासे । पृथ्वीविना कवणचि न दिसे । मेला ऐसा. ॥ १३० ॥ ऐसा पृथ्वीचा उपकार । थोर आहे सर्वांवर । परि प्राणी उपकार । न स्मरे हा. ॥ १३१ ॥ पृथ्वीपासाव ब्रह्मज्ञान । पृथ्वीमुळेंचि अज्ञान । एवं सर्वांसि उद्भवन । पृथ्वीच हे. ॥ १३२ ॥

**अंतराश्रितबीजं तु व्यानांशेन विवर्धितम् ।**
**खे वचः प्रभवेत्तत्र श्रोत्रद्वारमपावृतम् ॥ २४ ॥**

आतां शब्दाचा अंकुर । उठे तो कैसा प्रकार । अंतःकरणें महीवर । बीज पडे. ॥ १३३ ॥ तयास व्यान वायु वाढवी । क्षण एक उभारोनि दावी । कर्णाचिया गांवीं । शब्दरव दावी. ॥ १३४ ॥ मग अर्थस्वार्थाचीं गर्भपानें । एकसरां उठती वाचेनें । तीं गगनाचिया मानें । विस्तारती. ॥ १३५ ॥ जों-

---

१. शिश्नेंद्रियाचे ठायीं कामरूपानें. २. बिंदूचें=शून्याचें. ३. मलमूत्रविसर्जनक्रिया. ४. पांच विषयांचीं नांवें:—१ शब्द, २ स्पर्श, ३ रूप, ४ रस, ५ गंध. ५. जीवसमुदायाला.

वरी शब्दाची चाड । अन्वय ज्ञानाची वाट । तंव आत्मज्ञानाचा निवाड । नेणेचि तो. ॥ १३६ ॥ इच्छेचेनि भरें । वक्तृत्व निघे पैं निगुरें । मग निंदास्तुतीचीं अग्रहारें । घेउनी बैसे. ॥ १३७ ॥ कीं जन्मांतर संस्कार नांदे । तरी शब्दाशब्दीं अर्थ साधे । मग वाच्यांशचि ब्रह्मानंदें । नांदवीतो. ॥१३८॥ एवं मोक्ष संसाराकारण । शब्दार्थचि पैं जाण । परी पूर्वसंचित प्रमाण । असे तें पैं. ॥ १३९ ॥

**मनः समानसंयुक्तं त्वगिंद्रियसमाश्रितम् ।**
**पाणियुक्तमगच्छत्तु स्पर्शगुणं च मारुतम् ॥ २५ ॥**

स्पर्श इच्छा मना भेटे । मग निघे समानाचिये वाटे । तेथुनी पैं कोंदाटे । त्वचेमाजी. ॥ १४० ॥ मग कराब्जीं प्रवेशे । अधिष्ठीजे स्पर्शें । तेथूनि पैं पैसे । पवनामाजी. ॥ १४१ ॥ तेथ गुणत्रयभेदकारण । पुण्यपाप जोडे जाण । तेथही अधिकार प्रमाण । प्रारब्धाचा. ॥ १४२ ॥ स्पर्श होय साधू चरणा । तरी ज्ञानाधिकारी होती जाणा । स्पर्शरीती पराविया धना । आणि परस्त्रिये तरि निरैय पावे. ॥ १४३ ॥ ऐसी जीवाला आवघी । जडली आहे उपाधि । तंव आत्मशुद्धी । आठवेना. ॥ १४४ ॥

**उदानसंयुक्ता बुद्धिः पादेंद्रियसमन्विता ।**
**चक्षुर्युक्ता च संयाति गुणरूपं तु तैजसम्. ॥ २६ ॥**

रूपालागीं पैं केतुलीं । तत्वें मिळोनि साहित्या आलीं । तींच पैं उमजिलीं । पाहिजेती ॥ १४५ ॥ बुद्धि आन उदान । चरणालागीं सांगोपन । मग तेजाचें रान । वेंळंघिती पैं. ॥ १४६ ॥ रिघोनि चक्षूचिया उदरीं । रूपा घरिंचि भिक्षा करी । अनुक्रमेंचि दीक्षा धरी । प्रपंचाची ॥ १४७ ॥ तेणेंचि उपजे लोलुपता । कधींच नाहीं तृप्तता । असंतुष्टें संतुष्टता । सदां आथी ॥ १४८ ॥ देखणेंचि झालें स्वल्प । तेणेंचि उठती अनेक कल्प । मग अज्ञानें करितां जल्प । आयुष्य गेलें. ॥ १४९ ॥

---

१. अमुक गोष्ट असली तर अमुक असलीच पाहिजे असा जो नियम त्यास अन्वय असें म्हणतात. त्या अन्वयाचें ज्ञान तें. (अभाने स्थूलदेहस्य स्वप्ने यद्भानमात्मनः । सोऽन्वयो व्यतिरेकस्तद्भानेऽन्यानवभासनम् ॥ (सार्थपंचदशी–पृष्ठ ८.) २. प्राक्तन, पूर्वजन्मांत क्रमाक्रमानें सांचत आलेलें कर्म, पूर्वार्जित. ३. भरून जातो, शिरतो. ४. नरक. ५. आत्म्याची ओळख. ६. कोणकोणतीं. ७. आणि. ८. संरक्षण. ९. आश्रय करून राहतात, आलिंगिती. १०. मार्ग. ११. लुब्धता, आसक्ति. १२. आहे. १३. कल्पनातरंग.

**चेतः प्राणप्रयुक्तं च जिव्हेंद्रियसमाश्रितम् ।**
**उपस्थसहितं वारितत्वमायाति सौरसम्. ॥ २७ ॥**

आतां रसविषयाकारणें । कोणी मिळोनि साहित्य करणें । तें अनुक्रमें जाणणें । लागे येथें. ॥ १५० ॥ चित्त प्राणाचिये घरीं । रिघोनिया बळातें वरी । मग रसनेचिये माघारीं । लागे पैं तो. ॥ १५१ ॥ रसना हे पैं आपुली वरी । आणि रस धातूतें उदरीं भरी । आणि शुक्रपुष्टी पुरती करी । अंगामाजी. ॥ १५२ ॥ तें उपस्थामाजी उतरे । तेणें मैथुनकळा संचरे । उदकाचिया आधारें । होय ऐसें. ॥ १५३ ॥ एवं आप तत्वाचें विवरण । लिंगदेहीं मिसळलें जाण । यास्तवचि प्रकरण । सांगीतलें. ॥ १५४ ॥

**अहंकृतिस्त्वपानेन युक्ता घ्राणगुदान्विता ।**
**गंधगुणं च भूतत्वं प्रविशति सुखाश्रितम्. ॥ २८ ॥**

आतां सर्व संयोगें गरिमा । अहंकार आला पैं नामा । तया साहित्याचिया कर्मा । मिळाले कोण्ही. ॥ १५५ ॥ अपान काया निरुजा करी । म्हणोनि अहंकार रिघाला तया घरीं । मग घ्राणाचें द्वार पैं धरी । प्रवेशावया ॥१५६ ॥ प्रवेशे पायूशीं विसर्ग । गंध घेणें नैसर्ग । मग पुण्यगंधाचा स्वर्ग । हाचि मानी. ॥ १५७ ॥ ऐसा स्वल्प भोगा दीर्घ मानीं । एवं व्यापिला अज्ञानीं । मिठीच अन्यथा ज्ञानीं । दिधली ज्यांहीं. ॥ १५८ ॥ सुगंध घेतां सावकाश । त्यांत उपजे पैं विलास । तेणेंचि तया गर्भवास । पुनरपि पडे. ॥ १५९ ॥ ऐसी पंचमहाभूतांची वेणी । त्यांत गुणत्रयाची कसणी । ऐशियाचिये घंसणीं, । पडियेला जो ॥ १६० ॥

**एवं तु सूक्ष्मभूतानां संगमः कर्दमो महान् ।**
**परतंत्रकरश्चायं कार्यकारणसंभवः. ॥ २९ ॥**

ऐसा सूक्ष्म भूतांचा कर्दम । अवघियांचा एक संगम । मग शरीर ऐसें नाम, । पातले तें. ॥ १६१ ॥ एक एकास्तव पराधीन । झालीं विषयांच्या स्वाधीन । सर्व मीनलियाविना समाधान । होईच ना. ॥ १६२ ॥ चरण व्हावे

१. विस्तार, वेष्टन. २. गुरुत्व, मोठेपणा. ३. नि—नाहीं, रुजा—व्याधि (व्याधिरहित करी. रुजा हा शब्द कोंकणांत चालतो. रुज्, रुजा—रोग असा संस्कृतही शब्द आहे.) ४. स्वभाव. ५. संगतीला. (घसण हा शब्द कोंकणांत प्रचारांत फार आहे.) ६. पंक, चिखल. ७. एकत्र मिलाफ झाल्यावांचून.

चालावया। हात व्हावे ध्यावया। नयन पाहिजेति पाहावया। वस्तुजात[1]. ॥१६३॥ श्रवण आधिं ऐकावया। वाचा व्हावी बोलावया। मन वांच्छा करावया। असावें आधिं. ॥ १६४ ॥ बुद्धि अर्थ साधावया। चित्त व्हावें शोधावया। अहंकार पाहिजे राखावया। मिळाली वस्तु. ॥ १६५ ॥ एकें स्वामित्व घेतलें। एका प्राधान्यत्व दिलें। एका भोक्तृत्व आलें। सहज भागा. ॥ १६६ ॥ एकें प्रजात्व अंगिकारिलें। एकें केवळ जाड्यत्वचि घेतलें। एवं सर्वांनींच काज केलें। एकमेकांचें. ॥ १६७ ॥ एक एकाचे कार्यीं पडला। तेथ प्रपंच सहजचि वडला। तेथ जीवासि बंध पडला। दृष्टत्वाविण. ॥ १६८ ॥ तेथ कवण कवणा मिळालीं। कार्यकर्तीं कैशीं जाहलीं। तीं ज्ञानदृष्टीं ओळखिलीं। पाहिजे येथें. ॥ १६९ ॥

**व्योमहेतुश्च व्यानस्तु युक्ततेजोऽभवच्छ्रुतिः।**

**स एव जलमाश्रित्य शब्दतां याति विस्फुटाम्. ॥ ३० ॥**

पवनकार्या जाणें व्योमा। तेथ पातलें व्यानापनामा। त्यांशीं तेज मिळतां समागमा। श्रोत्र झालें. ॥ १७० ॥ त्यासी आपतत्व भेटों गेलें। शब्दसृष्टीं भरियलें। वाचानाम पावलें। तये स्थानीं ॥१७१॥ शब्दसृष्टीचीं बीजें। सूक्ष्म राहिलीं तया वोजें। मग अर्थजात[2] निजें। पृथ्वीवरि. ॥ १७२ ॥ शब्दांकुर साभास। बाह्य न पडे प्रकाश। मग पाहते जाहलें वास। महीचा पैं. ॥ १७३ ॥

**गगनं च महीयुक्तं शब्दाहंकारमाश्रितम्।**

**स्वतःसिद्धमिदं रूपमंतःकरणसुस्थिरम् ॥ ३१ ॥**

मग पृथ्वीला पैं मीनलें[3]। तेथें शब्दाभिमाना पावलें। मग अंतःकरणरूपें राहिलें। स्वतःसिद्ध पैं. ॥ १७४ ॥ गगनामाजी सर्व झालें। साकार साभास विरूढलें। म्हणोनि श्रेष्ठत्व आलें। तया लोकीं. ॥ १७५ ॥ सर्वां अधिष्ठुनि आहे। सर्व गेलिया तें न जाये। शून्यपणेंचि[4] राहे। सदोदित. ॥ १७६ ॥ शून्यत्वजयाचेनि मोडे। येरवीं सर्व तयांतचि मांडे। अवकाशावीण केंवी घडे। विषयभोग. ॥ १७७ ॥ गगनींच ब्रह्माचा आभास। गाळुनी पाहाणें स्वप्रकाश। सकळ पाहाणेंचा[5] नैराश्य। जाहलियावरी. ॥१७८॥

१. नानावस्तूंचा समुदाय. २. अर्थजात=शब्दज्ञानाचा समुदाय. ३. मीनलें=मिलाफ झालें, मिळालें. ४. शून्यपणें=निराकार म्ह० आकाशाला कांहीं आकार नाहीं, परंतु सकल जगाच्या उद्भवाचा समावेश आकाशांतच होतो. ५. सर्व पाहाणें=दृश्य—जगत् त्याविषयीं नैराश्य=निराशपणा.

**अतिक्रांतो मनोवेगो गगनोदरसंभवः ।**
**तेजः समानयुक्तोऽयं त्वक्चैवं जायते खलु. ॥ ३२ ॥**

पवन गगनीं मिळे । तेथ संकल्प विकल्प प्रबळे । तेथ जाणावें अवलिळें[1] । मानस ऐसें. ॥ १७९ ॥ दूर धांवे अनुसंधान । तें केवळ जाणावें मन । स्वयें काजा समान । म्हणणें तया. ॥ १८० ॥ त्वचा योगें देहनीं[2] वसे । म्हणोनि स्पर्शज्ञान आपैसें । तयाहुनि अनारिसें । होउनी पाहणें. ॥ १८१ ॥ पवनासि सूक्ष्मकळा । तेथ पडे तयाच्या डोळां । तो सकल शून्याचा गोळा । सहजें करी. ॥ १८२ ॥ ठायिं ठायिंचा व्यापार । शरिरीं ओळखे जो नर । तोचि ज्ञानाचें घर । पावला होय. ॥ १८३ ॥

**पाणींद्रियेण वायुश्च जलतत्वं च गच्छति ।**
**स एव स्पर्शयोगाच्च भूतत्वमधिगच्छति ॥ ३३ ॥**

हस्ताचेनि योगें । पवन जळामाजी रिघे । स्पर्शाचिया आंगें । पृथ्वी मिळे. ॥ १८४ ॥ उदकापासोनि मही होय । म्हणोनि ते क्रिया करांच्या ठायिं ये । यास्तव पवन उदकाची सोय । हस्तयोगें. ॥ १८५ ॥ पवनाचिया नेटा । सर्वेंद्रियां वसवटा[3] । मग तेजाचा दिवटा । आंत फिरे. ॥ १८६ ॥ जीवन हाले तयानें । पृथ्वी नांदे समाधानें । म्हणोनि पवन महिमानें । वाढेच कीं. ॥ १८७ ॥

**बुद्ध्यावकाशतत्त्वं तूदानांशेनैव चानिलम् ।**
**तेजसः संगमो जातो त्वगिंद्रियेण चोदकम्. ॥ ३४ ॥**

आतां तेज पांचाचिये घरीं । रिघे कैसें परिवारीं । तें सविस्तर अवधारीं । चतुर तूं पैं. ॥ १८८ ॥ बुद्धियोगें आकाशीं । उदानें वायूशीं । त्वचेंद्रियें उदकासी । तेज मिळे. ॥ १८९ ॥ तेज आकाशीं मिळे । सहजें व्यापकत्व पघळे । तेथ बुद्धि ऐशिये कळे । उपज होय. ॥ १९० ॥ अनुक्रमें सर्व वोळखे । साकार[4] साभास[5] दोन्हि देखे । हें होय पैं आसकें[6] । व्योमास्तव. ॥ १९१ ॥ चपलता पैं पवनें । तेजासि दीधली सन्मानें । स्थिरता जीवनें । ठेली तेथें. ॥ १९२ ॥ पृथ्वीनें दीधलें क्षेमा । तेथें बुद्धीची वाढली महिमा । एवं तेजाचिया अनुक्रमा । निरोपिलें. ॥ १९३ ॥

---

१. सहजें. २. सूक्ष्मभूतमय देह. ३. वास्तव्य, वसणुक, वसति. ४. आकारयुक्त स्थूल देह. ५. भासमात्र=सूक्ष्मदेह. ६. एकंदर. हा शब्द कोकणांत प्रचारांत आहे.

**पादेंद्रियेण पृथ्व्यां तु रूपेण चक्षुषोः स्थिरम् ।**
**उदके नावकाशं च प्राणैः पवनसंयुतम्. ॥ ३५ ॥**

चरणाचिया सवें । तेज पृथ्वीमाजि संभवे । चक्षूंमाजी स्वभावें । स्थीर झालें. ॥ १९४ ॥ उदक आकाशा भेटे । तेथें चित्त ऐसा स्वभाव उमटे । आणि प्राणाचिये वाटे । पवना मिळे. ॥ १९५ ॥ म्हणोनि शरीर संतोषाकारण । प्राणचि एक पैं जाण । म्हणोनि एवढें भूषण । आपास्तव[1]. ॥ १९६ ॥*उदकाचिया संगतीविणें । पृथ्वी भोगाचा स्वाद नेणें । म्हणोनि उदका आवंतणें[2] । दिधलें सर्वी. ॥ १९७ ॥ आंत उदकाची नसे वोपें[3] । चांगलें न दिसे पैं रूप । तेलाविणें दीप । जयापरी. ॥ १९८ ॥

**जिव्हेंद्रियेण तोयं च तेजोयुक्तं भवेत्तनु ।**
**स्वतंत्रोपस्थसंयुक्तं रसमात्रेण भूयुतम्. ॥ ३६ ॥**

रसनेवाटे उदक । तेजीं मीनलें असे निष्टंकें[4] । म्हणोनि रसना स्वाद अधिक । सर्व तेणें ॥ १९९ ॥ उपस्थीं राहिलें स्वतंत्रें । मेदिनी[5] मिळालें रसमात्रें । ऐशीं जाण पैं सूत्रें । उदकाचीं. ॥ २०० ॥ रसनेंत राहिलें स्वभावें । म्हणोनि सूक्ष्म पदार्थ आघवे । न लगतीच पैं भिजवावे । सेवितां पैं. ॥२०१॥ वरील[6] अमृताचेनि ओलांशें । जिव्हा नित्य आरक्त दिसे । तियेचें मूळ कैसें असे । तें जाणती योगी. ॥ २०२ ॥ योगियांसीच तें गमे । योगी आत्मस्वरूपीं रमे । हें नेणेंचि तो भ्रमें । देहाभिमानें. ॥ २०३ ॥

**भूनभःसंयुतोऽहंकारोऽपानो ह्येव संज्ञितः ।**
**सतेजो घ्राणसंयुक्तो गंधो नीरेण मिश्रितः ॥ ३७ ॥**

पृथ्वी मीनली आकाशा । तेथ झाला अहंकार ऐसा । तो सर्व कर्मासरिसा । बांधी जीवा. ॥ २०४ ॥ व्योमाची न धरितां सोय । जाड्यत्व[7] कवणिये जागां राहे । म्हणोनि तयासी विनय । होउनी पडे. ॥ २०५ ॥ तेंवी पैं आकाशीं नाद । पृथ्वीविना उमटे शब्द । म्हणोनि असे साद[8] । घातला तियें. ॥ २०६ ॥ पवनासि देता खेमें[9] । अपान ऐसें पावला नाम । करी निर्मळत्वाचें

---

१. उदकास्तव. २. आमंत्रण–बोलवणें. ३. कांति–तेज. ४. निष्टंक=निश्चयानें. ५. पृथ्वीला. ६. वरील अमृताचेनि ओलांशें=ब्रह्मरंध्रस्थितज्ञानकळा (सत्रावी कळा) अमृतसंजीवनी तिजपासून मिळणाऱ्या ओलांशें=शीत अंशानें. ७. जडपणा, अभिमान. ८. हाक मारणें याअर्थी हा शब्द कोकणांत वापरतात. ९. आलिंगन.

काम । मही घरीं. ॥ २०७ ॥ घ्राणें तेजासि मिळे । म्हणोनि गंधाची परीक्षा कळे । तदुपरी उदकासि मिळे । पायुस्थानीं. ॥ २०८ ॥

**स्वतंत्रं गंधरूपं तु पायुस्थजलमिश्रितम् ।**

**एवमन्योन्यकृद्भूतसंघः कर्दम एव हि ॥ ३८ ॥**

पायुसंगें उदकीं जाय । स्वतंत्र गंधरूपीं राहे । ऐसा कर्दम पैं पाहे । सांगात भूतां ॥ २०९ ॥ सर्व भूतांनीं आवंतिलें । देह ऐसें रूपा आलें । तेथ पैं कारण झालें । संसारा यया ॥ २१० ॥ परि हीं अवघीं तत्वें निर्जिव । तीं व्हावयालागीं संजीव । ईश्वरें हा जीव । निर्माण केला. ॥ २११ ॥ न जन्मता पैं जन्मला । आणि न भरितां पैं आंत भरला । अंतीं न मरतां मारिला । कौतूक कैसें? ॥ २१२ ॥ यया तत्वां भोक्ता कल्पिला । तो आत्मबोध पैं विसरला । प्रतिबिंबरूपें झाला । देहधारी कीं ॥ २१३ ॥

**तत्वसंघे प्रधानं तु स्वंतःकरणपंचकम् ।**

**त्रिपंचकं तु भृत्यत्वं सिद्धं विषयपंचकम्. ॥ ३९ ॥**

पंचवीस तत्वांमाजी । रिती कैसी वर्ते सहजीं । ते अवधारोनि उमजीं । कवणियेपरी ॥ २१४ ॥ अंतःकरणपंचक । तया स्वामित्व निष्टंक । आणिक ते तीन्ही पंचक । सेवक जाण ॥ २१५ ॥ तीं न पंचकें तीं कवण । पांच ज्ञानेंद्रियें पंचप्राण । कर्मेंद्रिय पंचक जाण । तिसरें तें पैं ॥ २१६ ॥ आणी चौथें पंचक विषयांचें । येणेंचि लिंगदेह साचें । अविद्या काम कर्माचें । कारण जेथ ॥ २१७ ॥ यांत [1]गुणत्रयांचा आवर्त । [2]शक्तित्रयांचा विवर्त । तो परम सांगात । धरिला जीवें ॥ २१८ ॥

**एवं च पंचभूतानां संभ्रमः सूक्ष्मसंभवः ।**

**बोधेनास्य त्रितापाश्च नश्यंति तदिदं शृणु. ॥ ४० ॥**

ऐसा पैं हा सूक्ष्म । अंश पंचभूतांचा संभ्रम । महाभूतांचा उगम । उगवे जेथें ॥ २१९ ॥ यया योगें त्रिविध[3]ताप । सुखदुःखाचा विक्षेप । बोधें त्याचा

१. सत्व, रज, तम या तीन गुणांचा भोंवरा. २. स्थूल देह, सूक्ष्म देह, कारण देह यांच्या शक्तीचा विवर्त=खोट्या वस्तूचे ठायीं खऱ्या पदार्थाचा भास, मिथ्यामति, भ्रम, भास जसें रज्जूचे ठिकाणीं सर्पाचा भास होणें. ३. ताप तीन प्रकारचे आहेत, ते:-आधिदैविक (देवतांच्या क्षोभापासून होणारा-जसा वीज पडणें, भूतबाधा, ग्रहपीडा), आ-

साक्षेप । नाहीं जया ॥ २२० ॥ अज्ञानाचें पडळ । दृष्टीवरी आलें केवळ; । तेथ भवनदी गढूळ । झाली जया ॥ २२१ ॥ ययाभूतांचेनि संगें । जीवें घेतलीं अनेक सोंगें । विपरीत वासना संगें । रंगाथिला.॥ २२२ ॥ ऐसिया देहाचिया सांगडी । जीवा पडियली भ्रांतीची बेडी । केवळ बुद्धि जाहली वेडी । अन्यथा ज्ञानीं ॥ २२३ ॥

**इति श्रीसिद्धांतसंहितायां सोहिराविरचितायां भूतकर्दमसंगमो नाम द्वितीयोऽध्यायः संपूर्णः ॥**

---

## अध्याय तिसरा.

**ब्रह्मांडरूपं वैराजमव्ययं यस्य दैवतम् ।**
**हिरण्यगर्भसूक्ष्मं तत्पिंडानामाधिदैवतम् ॥ १ ॥**

विराट देह ब्रह्मांड । त्याचें प्रतिबिंब पैं पिंड । तेथ पैं उदंड । दैवतें आथी. ॥ १ ॥ विराट पुरुषाचे अवयव । तेंचि जीवात्मयाचें अधिदैव । पिंडवर्तनीं स्वभाव । वोळखणें कैसे ॥ २ ॥ पिंडाचिया इंद्रियस्वभावा । सोय कैसी अधिदैवा । तोचि आधीं जाणावा । अभिप्राय ॥ ३ ॥ अधिदैवताचें साह्य । वर्ते देहाचिया बाह्य । तरि तें प्रकरण लवलाह्य । ऐकावें कीं ॥ ४ ॥

**अध्यात्मं चाधिभूतं तु जीवानां देहमाश्रितम् ।**
**अस्य संगेन भुंजंति सुखदुःखेन विस्मिताः ॥ २ ॥**

प्रथम अध्यात्म म्हणणें । तें कवण दशें पै जाणणें । सहज स्वभावतः राहाणें । इंद्रियांचें ॥ ५ ॥ चंदनाचिये आंगीं जैसें । सुगंधत्व आधींच असे, । कीं उदकामाजी वसे । आर्द्रता, ॥ ६ ॥ दीपासवेंचि पाहें । प्रकाश कीं

---

ध्यात्मिक (मनाच्या क्षोभापासून अथवा शरीराच्या रोगापासून होणारा—जसा खरूज, ताप, भूक, शोक), आणि आदिभौतिक (पृथ्वी, आप्, तेज, वायु आणि आकाश या पंचमहाभूतांच्या क्षोभानें होणारा—जसा भूकंप, अतिवृष्टि, समुद्रमर्यादोल्लंघन.)

१. रंगाथिला=रंगविला. २. सर्वरूप, विश्वाला व्यापून असणाऱ्या विश्वेश्वराचें स्वरूप तें (पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः । नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च. ॥ (गीता—अ० ११ श्लो० ५) या श्लोकांत ईश्वराच्या समग्र ऐश्वर्याचें वर्णन आहे. ३. प्रतिच्छाया. ४. पुष्कळ. ५. देवता. ६. असतात. ७. सत्वर.

सहजचि आहे । तैसा स्वभावता राहे । अध्यात्मामाजी ॥ ७ ॥ तैसाचि अधिभूताचा प्रकार । जाण पैं गा सविस्तर । वासना दुराग्रह थोर । इंद्रिय धर्मी ॥ ८ ॥ तेथुनि निर्विकल्पता मागें पडे । ईच्छा तेचि पुढां वाढे । तेथ जाण निवाडें । अधिभूत ऐसें ॥ ९ ॥ ऐशियाचिया संगें । जंव आथिला मिथ्याभोगें । मग सुखदुःख भवरोगें । विस्मित होय ॥ १० ॥

**कथयामि विचारं तं त्वमेकाग्रेण शृण्विमम् ।**
**तेन च ज्ञानलब्धं त्वां साक्षात्कारश्च जायते ॥ ३ ॥**

म्हणोनियां तयाचें कथन । करावया अज्ञानमथन । एकाग्र देइजे अवधान । ययाप्रति. ॥ ११ ॥ तेणें होय पां निरुति । मनन करितां ज्ञानप्राप्ति । अन्यथा ज्ञानाची व्याप्ति । राहील जेणें. ॥ १२ ॥ आणि आत्मयाचा साक्षात्कार । येणेंचि होय पैं सत्वर । मग वृथाचि आकार । चरित्र दिसे ॥ १३ ॥ आणि नित्य स्वरूपाचें दर्शन । संकल्प होईल निरसन । रूपीं अरूपाचें चिंतन । ध्यान लागे ॥ १४ ॥ स्वहित स्वानुभव सहज जागे । आणि जेवढें कर्म केलें मागें । तें आघवेंचि जळों लागे । ज्ञानाग्नीनें. ॥ १५ ॥ एवढी ज्ञानसिद्धीची महिमा । जीवें पाविजे अक्षय धामा । मागुतीं न पडेचि पैं भ्रमा । जन्ममृत्यूचिया. ॥ १६ ॥ म्हणोनि त्रिविध अनुसंधान । ऐक त्याचेंचि कथन । जेणें होय पैं मथन । देहबुद्धीचें ॥ १७ ॥

**अंतःकृन्निर्विकल्पं त्वध्यात्मादित्रिपुटीयुतम् ।**
**विष्णोस्तु ज्ञानशक्त्या च सुखदं च विराजितम् ॥ ४ ॥**

अंतःकरणाचिये पोटीं । निर्विकल्पता असे मोठी । तेंचि आपण पैं दिठी । अधिभूत ऐसें ॥ १८ ॥ निर्विकल्पाचें सुख । ज्ञानावीण घेतसे देख । तेथें

---

१. कल्पनारहित तत्पदवाचक ब्रह्मरूपता. (जगतो यदुपादानं मायामादाय तामसीम् । निमित्तं शुद्धसत्त्वां तामुच्यते ब्रह्म तद्गिरा ॥ ४४ ॥ यदा मलिनसत्वां तां कामकर्मादिदूषिताम् । आदत्ते तत्परं ब्रह्म त्वंपदेन तदोच्यते ॥ ४५ ॥ पंचदशी—तत्वविवेक—श्लोक ४४।४५). २. कल्पना—सविकल्पता. ३. सर्वभूतांना आकळून राहणारा जो नश्वर भाव म्हणजे नाशवंत शरीर तें अधिभूत होय (अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् । अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ (गीता—अ० ८ श्लोक ४) या अधिभूतासंबंधीं जो जीवास ताप होतो तो आधिभौतिक होय. ४. आहे या अर्थी. ५. निरुति=खरोखर. ६. अक्षयस्वरूप ब्रह्म. ७. नाश. ८. दृष्टीस=अनुभवास.

स्थिरता जैंवि राख। धरिली सत्वें ॥ १९ ॥ ते अन्यथा ज्ञानशक्ति । टाकुनि आली एवढीये व्यक्ति। परि तेणेंचि करोनि मुक्ति । न पवे तो पैं. ॥ २० ॥ तेथिलें कीं अधिदैवत। वैकुंठपती कीं मिरवत । तेव्हां सत्वगुणाचा अंकित। जीव होय ॥ २१ ॥ मग सत्वें सत्क्रियाचि करी । तरि सुख पावे जन्मवरि। परतंत्रता संसारीं। बहूत न पडे. ॥ २२ ॥ आतां त्रिविध अनुसंधान । धरूनि कैसें वर्ते मन। तया विवेरा अवधान। देइंजे निकें ॥ २३ ॥

**मनस्तु सर्वजीवानां कारणं सुखदुःखयोः ।**
**तत्राधिदैवसंयोगाद्यातं वृद्धिं च लाघवम् ॥**
**ते अध्यात्माधिभूते द्वेऽब्धय इवेंदुनैव हि ॥ ५ ॥**

मनाचा स्वभाव चपळ । त्यांत अधिभूताचा खेळ । तेथ अधिदैवत प्रबळ। चंद्रमा कीं ॥ २४ ॥ चंद्रकळा वाढती तुटती। तैसेच मानसीं स्वभाव उठती। मग धर्माधर्में लुटती। विषयपेंठा ॥ २५ ॥ पदार्थमात्रीं हांव भरे। कधींच तृष्णा न म्हणे पुरे। जेथ केला विवेकधुरे। पँदच्युत ॥ २६॥ ऐसा मोह जडलिया मना। सावयवा वेडी होय भावना । तेणें स्वात्मानुसंधाना। विस्मय पडे ॥ २७ ॥ नाथिलीच भ्रांति पडे । वायांचि कर्तव्यता वाढे। शेखीं जीवाला सांकडें। मनायोगें ॥ २८ ॥

**अध्यात्मबुद्धिसंयोगमधिभूतं च वेदितम् ।**
**विरंचिर्दैवतं तत्र राजसं गुणसंज्ञितम् ॥ ६ ॥**

बुद्धि अध्यात्माची कळा। निश्चयेंचि रिघिजे डोळां । तेथ उठतें अवलीळा। अधिभूत म्हणियें ॥ २९ ॥ इच्छेचेनि वेगें । इंद्रियांघरीं रिघे। तेथ पैं निवडों लागे। विधिनिषेध ॥ ३० ॥ तेथ ब्रह्मा पैं दैवत । रजोगुणें मिरवत। बहुतेकें हेत। दृश्यवरी ॥ ३१ ॥ विशेष दृश्याचिये चोंडी ।

---

१. सिद्ध होऊन. २. सविस्ताराला. ३. लक्ष. ४. बाजार. ५. इच्छा, ईर्षा. ६. विवेकधुरे=मुख्यत्वाला, पुढारीपणाला. ७. स्थानभ्रष्ट होणें, ढळणें. ८. अवयवयुक्त सूक्ष्मपदार्थ—स्त्रीधनादिक सुखोपभोगाचे पदार्थ. ९. बुद्धिअंतःकरणवृत्ति. १०. विरोध, भ्रम. ११. नसतीच. १२. शेवटीं. १३. दुःख, संकट. १४. प्रविष्ट होईल. १५. सहज. १६. म्हटलें जातें. १७. बरेंवाईट, खरेंखोटें. १८. दृश्य जगतांतील पदार्थावर. १९. लुब्धता—छंदास.

गुंततां बुद्धी होय वेडी । मग जीव करोनि काबाडी । हिंडवी पैं ॥ ३२ ॥ संसाराचिया आशा । लावुनी हिंडवी दाही दिशा । आणि आघवियाही क्लेशा । पात्र करी ॥ ३३ ॥ एवं बुद्धीमाजि त्रिविध । तापेंचि पडे पैं विबंधे । येणेंचि केवळ अंध । जीव होय ॥ ३४ ॥

**चित्तमध्यात्मसंयुक्तमधिभूतविवर्धितम् ।**

**नारायणाधिदैवं च दृश्यस्मरणपूर्वकम्. ॥ ७ ॥**

चित्ताचा स्मरणभाव । चेतवी सर्वेंद्रियाचा स्वभाव । मग इंद्रियां भरे हांव । विषयांचि ॥ ३५ ॥ तेथ नारायण अधिदैवत । जीव संगें मिरवत । न करावें तेंचि करवीत । जीवाकरवीं ॥ ३६ ॥ वृथा स्मरवीत दृश्यातें । आत्मस्वरूप नुमजे त्यातें । क्षरचि अधिभूतातें । जाण ऐसें ॥ ३७ ॥ अधिभूत पैं बळ धरी । तयाचें अधिदैवतें साह्य करी । हें जाण पैं तूं परिकरीं । ज्ञानदृष्टी ॥ ३८ ॥ ऐसा चित्तांतील भेद । सांगीतला पैं त्रिविध । तेंवी अहंकाराचाहि शोध । करणें आधीं ॥ ३९ ॥

**अहंताध्यात्मयुक्तेयं चाधिभूतविवर्धिता ।**

**गौरिपत्याधिदैवा च साहंकर्त्रीतिभराषिणी. ॥ ८ ॥**

आतां अहंकाराचा झाडा । त्रिविधतापांचा निवाडा । करणें कैसें सुरवाडा । ज्ञानबुद्धि ॥ ४० ॥ भलतया कर्मातें गोंवी । अहंकाराची वोज बरवी । मग मनाकरवीं करवी । स्वैर राब ॥ ४१ ॥ मीं ब्रह्म ऐसी जाती । मुदलिचि जयाची होती । तेथ अधिभूतें घातली भ्रांती । देह मी ऐसी ॥ ४२ ॥ तेणें सोऽहं होतें लोपलें । आणि कोऽहं ऐसें उमटलें । मग दृष्टीपुढें देखिलें । शरीर कीं हें ॥ ४३ ॥ तेणें वासनाबद्ध झाला । जीवत्व पंथातें आला । परतंत्रता पावला । परीं बुद्धी ॥ ४४ ॥ श्रवणी ऐके पदार्थ । मानसीं उपजे स्वार्थ । जयासी पैं परमार्थ । दुरावला ॥ ४५ ॥ एवं अंतःकरणपंचक । निवडिलें पैं निष्टंक । तैसेंचि ज्ञानेंद्रिय कौतुक । अवधारिजे ॥ ४६ ॥

---

१. हेलकरी—हुकूमबंदा. २. दृढ बंधन. ३. स्फुर्ति, हुटहुटी. ४. दृश्यातें=अविद्या—मायामयातें. ५. क्षरचि=नाशवंतच. ६. सविस्तर, चमत्कारिक. ७. १ आधिदैविक, २ आधिभौतिक, ३ आध्यात्मिक. ८. स्वच्छंद. ९. राबणूक. १०. परतंत्र बुद्धि.

**श्रोतव्यं श्रोत्रमध्यात्मसान्निध्यादाधिभौतिकम् ।**
**दिगाधिदैवमावृत्य शेषं यत्सावकाशकम् ॥ ९ ॥**

श्रोत्राची स्वभावता आद[1] । ऐकों येतो कवणहि नाद । परि तयाचा अर्थभेद । नाहींच्च तया ॥ ४७ ॥ मग तेथ जाणीव उमटे । ते लागे भेदाचिये वाटे । तेथ अवचटेंच इच्छा उठे । अधिभूत तें पैं ॥ ४८ ॥ मग अर्थाचिये घरीं रिघे । त्यांत गुण उठती तिघे । आणि तेथुनियां निघे । दृश्यावरी ॥४९॥ वृत्तीनुरूप स्वीकार करी । आवडे तेंचि श्रवण वरी । तेथ अधिदैवत साहाकारी । दश दिशा पैं ॥५०॥ दिशा झालिया सानुकूल । मधील गेलें माया अडल । मग एकसरां पोकळ । ऐकवीतें ॥५१॥ एवं श्रोत्रा आंतील विवरण । तुज केलें पैं श्रवण । आतां त्वचेंद्रियप्रकरण । परिसवूं तुतें ॥ ५२ ॥

**त्वक्चैवाध्यात्मसंयुक्ता त्वधिभूतेन संगता ।**
**स्पर्शेच्छा जायते चात्र त्वधिदैवेन वायुना ॥ १० ॥**

त्वचेमध्यें अध्यात्मबळें । सहज झालिया स्पर्श कळे । मग अधिभूत पैं मेळें । तया आंत ॥ ५३ ॥ तेव्हां स्पर्श इच्छा उठी । प्रारब्धभोग त्यांत उमटी । तेथ जीव हा मिठी । देऊनि राहे ॥ ५४ ॥ दुराग्रह उठे बहुत । तेंचि जाणिजे अधिभूत । तेथें अभिमान अधिदैवत । पवन पैं गा ॥ ५५ ॥ पवनास्तव स्पर्श होय । म्हणोनि अधिदैवत तेंचि आहे । ऐसें जो निरंतर पाहे । तत्ववेत्ता ॥ ५६ ॥ ऐसें त्वचेचें प्रकरण । तुज सांगीतलें संपूर्ण । वरि चक्षूचें विवरण । ऐक कैसें ॥ ५७ ॥

**चक्षुरध्यात्मसंयुक्तं दृष्टत्वमाधिभौतिकम् ।**
**सूर्याधिदैवयुक्तं च दाहकत्वं स्वभावजम् ॥ ११ ॥**

चक्षूंमाजी सहज घडे । मोहेरें[2] आलें दृष्टी पडे । तया आंत इच्छा वाढे । तेंचि निववे अधिभूत ॥ ५८ ॥ संकल्पें सुखदुःख भोगी । तेंचि अधिभूत म्हणती योगी । जें कुपथ्य सेवुनि रोगीं । रुसणें जैसें ॥ ५९ ॥ जेथ जेथ कल्पना जाय । आणि जे जे करी उपाय । तेथुनि पैं घेऊनिये । सुखदुःख ॥ ६० ॥ उगेंचि न दिसे नयनांला । बाह्य तेज व्हावें कीं तयांला । दिवसा

१. आद्य=आधिं. २. अभिमुख, समोर.

सूर्य आथिला । रात्रीं दिवा ॥ ६१ ॥ म्हणोनि अधिभूताचे निर्वासाये । नैयनांसि निघति पाय । मग तेथुनियां काय । एक दिसे ॥ ६२ ॥ इंद्रियां घरीं बरवी । चक्षूची हे ठाणदिवी । संतोषाचि रोणिवी । सर्वावयवां ॥ ६३ ॥ ऐसें चक्षूचें देखणें । शुद्ध होतें पहिलियेपणें । तेथ त्रिविध पडलें ठाणें । अन्यथा पैं ॥ ६४ ॥ तैसें जिव्हेमाजी जाण । त्रिविध आहे वेष्टन । तयाचें व्हावें परीक्षण । पुरतें आर्धीं ॥ ६५ ॥

**रसनाध्यात्मयोगोऽयमधिभूतरसस्त्वयम् ।**
**आधिदैवजलाधीशो जलाश्रितप्रवर्त्तकः ॥ १२ ॥**

रसनेचा सहज गुण । पडेल त्याचें परीक्षण । कल्पनेवीण कारण । होय पैं तें ॥ ६६ ॥ तीक्ष्ण भेटतां स्वभावें लागे । गोड कडू सहज सांगे । अध्यात्म जियेचिये अंगें । ओळख ऐसें ॥ ६७ ॥ अमुक पदार्थाची इच्छा करी । तेथ अधिभूत पैं बळ धरी । वोळखावें निर्धारीं । हेंचि तेथ ॥ ६८ ॥ मग वरुण अधिदैवत । जिव्हेमाजि मिरवत । म्हणोनि रसस्वाद कळत । सर्व पैं गा ! ॥६९॥ मग हटनिग्रहें इच्छा करी । भक्षणा संसार हारी । ते अधिभूताचिपरी । जाण पैं गा ! ॥ ७० ॥ ऐसा रस स्वादें व्यापिला प्राणी । अनुकूळें मांडितसे गाणीं । आणि प्रतिकूळीं परम हाणी । ते दिनीं मानी ॥ ७१ ॥ ऐसा जिव्हेमाजि प्रकार । निरोपिला पैं सविस्तर । आतां घ्राणेंद्रिय आकार । अवधारिजे ॥ ७२ ॥

**घ्राणाध्यात्मयुतं चैव गंधत्वं चाधिभौतिकम् ।**
**अश्विनावाधिदैवं च गंधरूपेण वर्धनम् ॥ १३ ॥**

आतां घ्राणामाजी सहज । स्वभाव कैसा उमज । न कलिपतां बूज । अध्यात्म तेथें. ॥ ७३ ॥ सुगंध दुर्गंध सहजां कळे । तेथ सुगंधाचेचि उठति डोहळे । तें जाण पां अवलीळे । अधिभूत. ॥ ७४ ॥ अधिभूताचें पडतां पालाण । इच्छाभूत होय घ्राण । तेथ तळमळे प्राण । सुगंधासाठीं ॥ ७५ ॥ तेथ अधिदैवत जाण । अश्विनीकुमार आपण । महीतें करी स्पर्शन । वायु-

१. संपन्न, थोर. २. सहवासानें, बरोबरीनें. ३. डोळ्यांस पाय फुटतात म्ह० डोळ्यानें दिसूं लागतें, दृष्टत्व येतें हा भाव. ४. ठाण=स्वरूप, दिवि=दिवा. (कोंकणांत बहुतेकांचे घरीं एक ठाण्यावरचा म्हणून टांगलेला कायम दिवा असतो त्याला ठाणदिवा म्हणतात.) ५. राज्य. ६. अनुकूल प्राप्ति झाली असतां गातो. ७. समज. ८. आरूढ होणें.

रूपें ॥ ७६ ॥ ऐसा घ्राणरंध्रा आंतिल । अनुभव मानशीं शिरेल । मग संसारचि बातील[1] । दिसों लागे ॥ ७७ ॥ ऐक आतां कर्मेंद्रियांचा । त्रिविधपणा झाला साचा[2] । मग तेथ पैं नेमाचा । हात न लागे. ॥ ७८ ॥

**वागध्यात्मयुतं चैव वक्तव्यमाधिभौतिकम् ।**

**अग्न्याधिदैवयुक्तं च प्राधान्यं व्योमसत्वजम्. ॥ १४ ॥**

आतां वाचेचिये भीतरी । अध्यात्म वर्ते निरंतरीं । कल्पनेविरहीत अंतरीं । उठती शब्द ॥ ७९ ॥ गाढमुढें[3] निद्रिस्त जो । निद्राभरें वोसणें[4] जो । तो कांसयाची करिजे जो । कल्पना तेथ? ॥ ८० ॥ सहज वाचेच्या ठायीं । शब्द उठती पैं पाहीं । मग कल्पना करोनि कांहीं । बोलणें जें. ॥ ८१ ॥ निंदा अथवा स्तुति । वक्तृत्वीं होय पैं वस्ति । तेथ कीं निरुति । अधिभूत जाण ॥ ८२ ॥ जें दंभाचें बोलणें । कीं विषादें अलंकारणें । तें जाण कीं विद्यमानें[5] । अधिभूत पैं ॥ ८३ ॥ वाचेचें विवरण । निरोपिलें संपूर्ण । ऐक आतां वर्तन । हस्तांठायीं ॥ ८४ ॥

**हस्ताध्यात्मयुतं चैव क्रियत्वमाधिभौतिकम् ।**

**इंद्राधिदैवयुक्तं च प्रभुत्वं वायुसत्वजम्. ॥ १५ ॥**

हस्ताचा पैं सहज गुण । निर्व्यापार राहती नां[6] जाण । तेथ निरीक्षावी[7] खुण । अध्यात्माची. ॥ ८५ ॥ येथ आग्रहेंकरोनि करणें । तया अधिभूत ऐसें म्हणणें । स्पर्शविपयीं लुब्ध होणें । जयाचें कीं. ॥ ८६ ॥ तेथ अधिदैवत सुरपति[8] । सानकूल होय हस्तशक्ति । तयाचेनि येती व्यक्ति । सर्व क्रिया ॥ ८७ ॥ क्रियेनेंचि जोडे पुण्यपाप । क्रियेंचि स्वरूपाचा साक्षप[9] । क्रियेनेंचि संसार माप । भरे पैं गा! ॥ ८८ ॥ क्रियेनेंचि जोडे सत्संगति । क्रियेनेंचि जोडे अधोगति[10] । म्हणोनि क्रिया असे त्रिविध ती । जाण पैं हें. ॥ ८९ ॥

**पादाध्यात्मयुतं चैव गंतव्यमाधिभौतिकम् ।**

**उपेंद्राधिदैवयुक्तं तु तेजः क्रमणसत्त्वजम्. ॥ १६ ॥**

आतां चरणाचिये ठायीं । सहजगति असे पाहीं । तेंचि अध्यात्म पैं सा-

---

१. रद्द, नाहींसा होणें, व्यर्थ. २. सत्य, खरोखर. ३. अतिशय अज्ञानेंकरून निजलेला. ४. झोपेंत बरळणें. ५. असलेलें. ६. नाहीं या अर्थीं हा शब्द कोंकणांत गोमांतकप्रांतीं फार योजतात. ७. पहावी. ८. इंद्र. ९. पक्षपात, आग्रह. १०. दुर्गति, नरकवास.

हायीं । तेथ पैं तें. ॥ ९० ॥ मग कल्पना करोनि जाणें । वासना जे ही कां होणें । तें येथ पैं जाणणें । अधिभूत ॥ ९१ ॥ अभिमान वागविणें कर्माचा । संग्रह करणें रजतमाचा । कवणही अधिभूताचा । भावचि हा. ॥ ९२ ॥ चरणांचेनियोगें होय । दुरिलाचि विषय जवळींच ये । तरी हाचि पैं अभिप्राय । अधिदैवाचा. ॥ ९३ ॥ एवं चरणाचिये ठायीं । त्रिविध सांगितले पाहीं । आतां उपस्थाचिये[1] कांहीं । ऐक ते पैं गा! ॥ ९४ ॥

**उपस्थाध्यात्मयुक्तं तु मन्मथेनाधिभौतिकम् ।**
**प्रजापत्याधिदैवं च जलस्वभावसत्वजम्. ॥ १७ ॥**

उपस्थाचिया माझारी । सहज स्वभाव अवधारीं । मन्मथाच्या[2] विचारीं । असे जें कां. ॥ ९५ ॥ तारुण्य वयसायोगें[3] । भूत संयोग मागें[4] । मैथुनभाव ना जागे । सहज ते पैं. ॥ ९६ ॥ तोचि अवध्यास[5] वागवी । मानस मैथुनातें[6] जागवी । मग जीवालागीं भोगवी । इंद्रियद्वारें ॥ ९७ ॥ तें अधिभूतबळ संपन्न । लौकिकाचें न देखे न्यून । त्याचि अभ्यासें हृदयशून्य । केवळ पैं तो. ॥ ९८ ॥ ऐसा नर मैथुनीं अवगे । तेथ रज तम संचरती आंगें । मग नारी देखोनि भिक्षा मागे । मन्मथाचि. ॥ ९९ ॥

**पाय्वध्यात्मयुतं चैव विसृष्टत्वाधिभौतिकम् ।**
**निर्ऋतेराधिदैवं च मेदिनीभूतसंभवम्. ॥ १८ ॥**

तरी यया गुदस्थानीं । अध्यात्मिक ऐसें मानीं । तें पाहा पैं समाधा विसर्गाचा. ॥ १०० ॥ तेथ विटावीट आघवी । होइजे जे स्वभावीं । ते अधिभूताचिये संभवी । होतसे जेथ. ॥ १०१ ॥ जेथ निर्ऋति[7] आधिदैवत । मेदिनीयोगें[8] मिरवत । तेथ संतोष पैं घेत । विसर्गाचा. ॥ १०२ ॥ तें द्वार आपुलें पृथ्वीभागा । म्हणोनि सर्व जारण[9] तया जागां । तें सूक्ष्मदृष्टीं उमगा । शरीरीं इया. ॥ १०३ ॥ ऐसी त्रिविधताप उपाधि । लिंगदेहाची आवधि[10] । पडे म्हणोनि तया त्रिशुद्धि । पुनति जन्म. ॥ १०४ ॥

---

१. शिश्नेंद्रिय. २. कामाच्या. (मन्मथ=स्त्रीविषयक इच्छा.) ३. वय. ४. वाटेनें, मार्गानें. ५. अविधि वर्तनाचा हव्यास. ६. फटफजिती. ७. दक्षिण व पश्चिम या दोन दिशांमधील दिशेचा अधिपति. ८. पृथ्वी. ९. जिरून जाणें, खाक होणें. १०. आव-धि=आव=महत्व, प्रतिष्ठा, धि=बुद्धि, (म्ह० त्रिविधतापाच्या उपाधीनें लिंगदेहाचे ठायीं प्रतिष्ठाबुद्धि मानिली, म्हणून जीवाला जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडणें प्राप्त झालें.)

**एवं हिरण्यगर्भं च लिंगदेहसमन्वितम् ।**
**विराजश्चास्य ब्रह्मांडे पिंडानां पृथगुद्भवम्. ॥ १९ ॥**

एवं हिरण्यगर्भचरित । जीव हा लिंगदेह वरित । म्हणोनि शोधावें त्वरित । तेंचि आधीं. ॥ १०५ ॥ ब्रह्मांड रचिलें आधी । पिंडाचेनि कार्य साधीं । मग आरंभिली उपाधि । प्रपंच हा. ॥ १०६ ॥ विराटाचे अवयवांश । तयांत पाहोनि सारांश । पृथक पिंडविशेष । उत्पन्न झाले. ॥ १०७ ॥ म्हणोनि ब्रह्मांडसत्तामात्रें । पिंडीं वर्तती एकसूत्रें । सकल जीव पंच तन्मात्रें । संतोष होती. ॥ १०८ ॥ गुणत्रयाचा अभिमान । वाढवूं लागती महिमान । एकमेकां गुमान । न धरिती पैं. ॥ १०९ ॥

**विष्णोरंशाभिमानं च प्रविविक्तं तु तैजसम् ।**
**प्राप्तस्वप्नावभासं च ग्रीवामंडलमाश्रितम्. ॥ २० ॥**

लिंगदेहीं पैं तैजस । अभिमानी विष्णूचा अंश । प्रविविक्त भोग उद्देश । तयाचेनि. ॥ ११० ॥ तेथ स्वप्नावस्था प्राप्त होती । निद्रावशें भांबावती । तेणें आत्मरूपाची विस्मृति । पडे जीवा. ॥ १११ ॥ लघु स्वप्नाचिया प्रमाण । दीर्घस्वप्न न दिसे जाण । म्हणोनि पैं भ्रमण । पडे तया. ॥ ११२ ॥ वासना वोसंडुनी मन । करूं नकळेचि पैं गमन । म्हणोनि तया पतन । मागुतीं घडे.

---

१. मायाप्रतिबिंबित ईश्वर, तो जेव्हां लिंगशरीराचा अभिमानी होतो तेव्हां त्यास हिरण्यगर्भ असें म्हणतात. २. पांच सूक्ष्म भूतांच्या योगानें. ३. १ सत्व, २ रज, ३ तम हे तीन गुण त्यांचें. ४. लिंगशरीरामध्यें मी मी असें म्हणणारा जो जीव त्याला तैजस असें म्हणतात. त्याला तैजस म्हणण्याचें कारण हेंच कीं अंतःकरण स्वतः तेजोमय आहे. तें अंतःकरण या शरीरामध्यें मुख्य असल्यामुळें त्याच्या अभिमानी जीवास तैजस हें नांव दिलें. (सार्थपंचदशी—पृष्ठ ६.) ५. प्रविविक्त भोग=जीवाला होणारी सुखदुःखात्मक उपाधि. (या सूक्ष्मभूताख्य विचारांत कारणभूत अवस्था आहेत त्या येणेंप्रमाणें:—१ तैजस अभिमानी, २ सत्वगुणात्मक विष्णुदैवत्य, ३ प्रविविक्त भोग सुखदुःखात्मक, ४ स्वप्नावस्था, ५ कंठस्थान, ६ मध्यमावाचा, ७ उकारमात्रा.) ६. जाग्रदवस्थेमध्यें जीवास जें विषयज्ञान होतें त्याचाच संस्कार ज्या अवस्थेंमध्यें पुनः इंद्रियांच्या साहाय्यावाचून निद्रेंत होतो तेंच लघुस्वप्न. स्वप्नांतील पदार्थ केवळ भासरूप असून त्यांचा कालांतरानें कांहीं उपयोग नसतो. ७. न दिसे जाण=म्हणजे जाग्रदवस्थेमध्यें भासणारे विषयः—१ शब्द, २ स्पर्श, ३ रूप, ४ रस, ५ गंध इ० हेही कालांतरानें लघुस्वप्नवत् भासमात्र आहेत हें जीवाला दिसत नाहीं. ८. टाकून.

॥ ११३ ॥ अन्यथाज्ञानाचा[1] विस्तार । जीवासि झाला प्रियकर । म्हणोनि तयावरि पडे भार । संसाराचा. ॥ ११४ ॥

**अन्यथाज्ञानमित्युक्तमात्मरूपस्य विस्मृतिः ।**
**सुखदुःखयुतोऽहं तदविद्यामयसंभवम्. ॥ २१ ॥**

अन्यथाज्ञानाचेनि मिसें । जीवासि लागलें परम पिसें[2] । सूक्ष्म तत्वें पंचविसें । भ्रमिष्ठ केला. ॥ ११५ ॥ तेणेंचि पावला विस्मृति । अंतरली आत्मप्राप्ति । संसारसंगें कधीं तृप्ति । नाहींच जया. ॥ ११६ ॥ तेथ अविद्या[3] पैं संभवली । तेथ अज्ञानें मिठी दिधली । मग सुखदुःखाचिये भेळीं[4] । मींच मीं म्हणें. ॥ ११७ ॥ म्हणोनि जीवित्वें कळासिला[5] । त्रिविधतापें त्रासिला । प्रपंचानें ग्रासिला । समूळ तया. ॥ ११८ ॥ हें पूर्व पापाचें फळ । क्रियमाण होतें निर्फळ । मग हृदय धर्मी अविकळ । प्रबळ होय. ॥ ११९ ॥

**विधिहीनो दुराचारः साधिभूतबलाश्रयः ।**
**रजस्तमोयुतोऽयं तु पूर्वजन्मनि दुष्कृतात्. ॥ २२ ॥**

पूर्वजन्माचें बहुत पाप । तेणें अधिभूताचा प्रताप । मग तयाचि सारिखा कळाप[6] । क्रियांचा होय. ॥ १२० ॥ जेथ रजतमचि प्रबळ । शरीरीं होती केवळ । मग मनीं घालिती गोंधळ । वासनेचा. ॥ १२१ ॥ तेथ विधिमार्ग राहिला नीट[7] । मग अवघाचि अव्हांटा[8] वसवट । तेथ कर्माचा कसवट[9] । लागतीं करूं ॥ १२२ ॥ परद्वारादिकगमन[10] । करूं लागती मद्यपान । काहीं सानुसंधान[11] ।

१. मिथ्याज्ञान, प्रापंचज्ञान; जसें शिंपीच्या ठायीं रौप्याचा निर्णय करणें. २. वेड. हा शब्द कोंकणांत गोमांतक प्रांतीं सर्वत्र चालतो. ३. माया. हिचे दोन प्रकार आहेत. जीमध्यें शुद्ध सत्वगुण अधिक असून बाकी दोन गुण (रज, तम) यांनीं तो गढूळ झालेला नसतो ती माया व जीमध्यें तो गुण इतर दोन गुणांनीं मिश्रित असतो तेव्हां तिला अविद्या म्हणतात. (सत्वशुद्ध्यविशुद्धिभ्यां मायाविद्ये च ते मते। सार्थपंचदशी–तत्वविवेक प्र० १ पृष्ठ ४.) ४. भेळीं=मिश्रणानें. ५. घट्ट केला. शिल्पकारागीर इ० लांकडादिकांचा सांधा अगदीं जुळण्यासाठीं एक प्रकारच्या हत्यारानें खुणा करतात त्याला कळासी असें म्हणतात. ६. समुदाय. ७. राहिला नीट=शास्त्रसंमत मार्ग नीट=चांगला तो राहिला. ८. अव्हांटा=आडमार्ग. वसवट=वसणूक (म्ह० उत्तम मार्ग सुटून आडमार्गास जीव भ्रमूं लागला–हा भाव.) ९. कसवट=शेताची कमाविशी. शेतकरी पेरणीसाठीं जमीन नांगरून तयार करतो त्याला कोंकणांत कमाविशी किंवा कसवट म्हणतात. १०. परस्त्रीसंगादि. ११. कांहीं सानुसंधान, राबतें पैं=वर जो जीवाचा अविद्योत्पादक अ-

राबतें पैं ॥ १२३ ॥ [1]क्रूर क्रुत्रिमी हे दोघे । [2]मीनती एकमेकां सगें । मग मानस पैं रिघे । अधर्मा घरीं ॥ १२४ ॥ मन चंद्रमा कलंक हें कीं । आशा तृष्णा ययाच्या लेकी । वाढविती कौतुकीं । मोहें करूनि ॥ १२५ ॥ मग त्या जें जें मागती । तयांचा [3]लळा हें पाळिती । तेथ समूळ [4]उपटिती । वेदआज्ञा ॥ १२६ ॥ भगवद्भक्तांचें न्यून । पाहाती संतांचें [5]पैशून्य । ते सर्वांगत्वें [6]शून्य । जन्म घेती. ॥ १२७ ॥

**आजन्मपापबीजानि वर्धंत इह जन्मनि ।**

**निरयं प्राप्नुवंतस्ते पतंति जन्मजन्मसु. ॥ २३ ॥**

आजन्मींचीं पापबीजें । इया जन्मीं वाढती सहजें । तेणें अधर्मचि हा [7]बुंजे । सुख ऐसें ॥ १२८ ॥ जेंवि व्याधिचेनि मिसें । कुपथ्यचि सेवावें दिसे । तेंवी पापाचेंचि [8]पिसें । पापिया लागे ॥ १२९ ॥ दुर्गंधीच कीटका प्रिय । सुगंध स्पर्शतां मृत्युप्राय । तेंवी दुराचारिया धरणें सोय । अधर्माची. ॥ १३० ॥ पापें पापचि पैं जोडे । पुण्यें पुण्य [9]आगळें वाढे । म्हणोनि सत्कर्म आवडे । अधिक तेणें ॥ १३१ ॥ पुण्याचेनि प्रभवें । रज तम नासती स्वभावें । मग सत्वाचिये धावे । [10]हांव भरे ॥ १३२ ॥ सत्वें सत्कर्म पैं साधे । भगवंताचिया आराधें । मग संतांचीं [11]वृंदें । वंदीत जाय. ॥ १३३ ॥

**पूर्वपुण्यस्य संघात्तु सत्वे शीघ्रं प्रवर्त्तनम् ।**

**अनेन ज्ञानसंयुक्तो मोक्षोपायप्रयोजकः. ॥ २४ ॥**

बहुत सुकृतें एक जागां । निष्काम [12]मींनलें वीतरागा । म्हणोनि झाला जागा । इये जन्मीं ॥ १३४ ॥ इतर योनी मूढ । ईश्वर तयांला गूढ । मनुष्ययोनि [13]रूढ । प्रसिद्ध असे ॥ १३५ ॥ सकळ ऐकती ईश्वर । परि घेतचि नाहीं समाचार । दृष्टीसि दिसलें चराचर । गोड वाटे. ॥ १३६ ॥ तयां ब-

---

विधि प्रकार सांगितला त्याला कांहीं सानुसंधान=कांहीं अनुसंधान=सूत्र, राबतें आहे. त्याचें अनुसंधान पुढील ओंवींत आहे.

१. क्रूर क्रुत्रिमी हे दोघे=रज आणि तम. २. मीनती=मिलाफ होती. ३. आवड, लालन. ४. उल्लंघन करतात, निर्मूळ करतात. ५. दुष्टत्व, निंदा. ६. जड. ७. वाटतें. ८. वेड. ९. अधिकाधिक. १०. ईर्षा, स्फुरण. ११. समुदाय. १२. एकत्र झालें. १३. मुख्यसाधनसंपन्न.

हुतांमाजी विरुळा[1] । कानीं घेत ते चित्कळा[2] । मग प्रत्यक्षची डोळां । पाहाता होतो. ॥ १३७ ॥

**विसरणं च वृत्तीनां प्रपंचो भ्रममूलकः ।**
**न निद्राति न जागर्ति चिंतयति सुखं निजम्. ॥ २५ ॥**

सर्व वृत्ती विसरला । तेणें संसार सत्यचि वाटला । मग भ्रांतिसमुद्र दाटला । सर्व जेथें ॥ १३८ ॥ जेणें विश्वासें भ्रमविलें । आत्मत्व हातींचें गमविलें । मोहाचें बळ दमविलें । विवेकें जेणें. ॥ १३९ ॥ जेथें निद्रा नाहीं जागृति । स्वप्न नाहीं सुषुप्ति[3] । तेथें चौथी[4] ब्रह्मप्राप्ति । इच्छितसे जो ॥ १४० ॥ जया पासोनि सर्व झालें । पाहतां त्याणें न केलें । ऐसें स्वरूप ज्याणें चिंतिलें । भगवंताचें. ॥ १४१ ॥ सकळ सृष्टीवेगळा पाहे । सर्वचि ज्याणें वाढताहे । सर्व नाशुनि उरला आहे । सदोदीत. ॥ १४२ ॥

**योगभ्रष्टो मुमुक्षुस्तु जातः पुण्येन भाग्यवान् ।**
**रजस्तमःप्रयुक्तस्तु जातः पापेन दुर्भगः ॥ २६ ॥**

ऐसा जो कां मुमुक्षु[5] । योगभ्रष्ट पैं प्रत्यक्षु । त्याचेंचि लागे लक्षु । ईश्वरावरी ॥ १४३ ॥ जो जनाचें पैं वीट धरी । रिझेना[6] इंद्रियां घरीं । प्रारब्धाचें[7] करणें करी । परि उदास जो पैं. ॥ १४४ ॥ यया विरहित तो ऐक श्रवणीं । अनधिकारिया[8] रजोगुणी[9] । तयाची[10] निरोधिजे करणी । अन्यथा ज्ञानीं ॥ १४५ ॥ प्रपंचींचा मुकुटमणि । विरूढला[11] पैं अज्ञानीं । तो दुःखचि तें सुख मानी । मूढपणें. ॥ १४६ ॥ कैसी तयाची धाटी[12] । जो प्रपंचमार्गीं राहाटी[13] । आणि तयाचिये दिठी[14] । दिसे कैसें ॥ १४७ ॥

---

१. क्वचित्, एखादा, विरळ. २. ब्रह्मकळा. ३. गाढनिद्रा. ४. सप्त भूमिका (१ शुभेच्छा, २ विचारणा, ३ तनुमानसा, ४ सत्त्वापत्ति, ५ संसक्ति नामका, ६ पदार्थभाविनि, ७ तूर्यगा स्मृता) यांतून चौथी सत्वापत्ति=सुखेन ब्रह्म संस्पर्शमत्यंतम्. ५. जन्ममरणरूप संसारापासून मुक्त होऊं इच्छिणारा. ६. रममाण होत नाहीं. ७. प्रारब्धाचें करणें करि, परि उदास जो पै=(संतां प्राक्तन कर्म जडे । परि तो भोग तयां न घडे ॥ ध्रु० ॥ पद निगडीकर रंगनाथ. ८. अपात्र अयोग्य मनुष्याला. ९. राजसो मानवांशस्तु सत्वे धार्यं मनो यतः (शुक्रनीति—पृष्ठ ५.) सत्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च. (भगवद्गीता—अ० १४ श्लो० १७.) १०. मुमुक्षूवांचून इतर जो त्याची करणी=कृत्य अन्यथाज्ञान=अविद्योत्पादक खोट्या ज्ञामाचे ठायीं निरोधिजे=कोंडली जाते. ११. विस्तारला. १२. वागणूक, वर्तनाची पद्धत. १३. राबणूक, वागणूक. १४. दृष्टीस, नजरेस.

**कलत्रपुत्रवित्तानां मायामोहेन ग्रासितः ।**
**शाश्वतं मन्यते दृश्यमंतवंतमशाश्वतम्. ॥ २७ ॥**

स्त्रियेलागीं लुब्ध । जेंवि भुजंग[1] नादीं लुब्ध । कानीं पडतां तियेचा[2] शब्द । मोहे जो कां. ॥ १४८ ॥ मक्षिका जैसी गुळा, । कीं भ्रमर जेंवी कमळा, । तेंवी स्त्रियेचिया स्पर्शअनळा[3] । सुखावे जो कां. ॥ १४९ ॥ देखोनि तियेचा मुखदीप । जेंवी पतंग कवळी दीप । तेथ सरडा[4] देखोनि कुंप[5] । चढे जैसा. ॥ १५० ॥ तैसाच पुत्रावरी मोहो । परम जयाचा पहा हो ! । योगक्षेमाचा[6] निर्वाहो[7] । आपणचि करी. ॥ १५१ ॥ वित्ताशा[8] सूये[9] दिठीं[10] । परम करूनि आटाआटी[11] । व्यवहार खटपटी । करी कांहीं. ॥ १५२ ॥ ऐसा मायेचिया मोहग्रासा । जया फिरवी संसार वेळसा[12] । कीं सत्यचि मानुनि मृगजळ जैसा । धांवे मृग. ॥ १५३ ॥ तेंवी क्षणिक हा संसार । सत्यचि दिसे साचार । तयाहूनि व्यभिचार[13] । अधिक मानी. ॥ १५४ ॥ म्हणोनि स्त्रियेचें प्रेम । चित्तीं मानी अनुपम । मग राजसा[14] नियम । कोठें उरे? ॥ १५५ ॥

**प्रमदाध्यासनिष्ठोऽयं तद्रूपस्य विचिंतकः ।**
**तच्छृंगारद्रष्टा पिशाचमुखवत्तु चंचलः. ॥ २८ ॥**

निजध्यासें[15] नारी । विसंबेना क्षणभरी । दृष्टीमाजी धरी । तेंचि रूप. ॥ १५६ ॥ उंच नेसलीसे चीरें[16] । आणिक भूषिलीसे सर्व शृंगार । भाळीं[17] रेखिलें केशर । किं जाण पैं मृगमद[18] ॥ १५७ ॥

**सुंदरीं युवतीं गौरां सर्वशृंगारसंयुताम् ।**
**योषितं दिव्यवस्त्रां च कामयते रजोगुणात्. ॥ २९ ॥**

गौरकांति तारुण्यभार । माळिले सुगंध पुष्पांचे हार । ऐसिये वनितेशीं

---

१. सर्प. सापाची नादलुब्धता सुप्रसिद्ध आहे. २. त्या स्त्रीचा. ३. अग्नीस. ४. पालीच्या वर्गातला एक प्राणी. पाल ही घराच्या आश्रयानें राहते व सरडा हा वृक्षादिकांच्या आश्रयानें राहतो. ५. शेताच्या संरक्षणासाठीं केलेलें कुंपण. ६. योगक्षेम=प्रपंचराहाटी. योग=प्राप्ति, क्षेम=प्राप्त वस्तूचें रक्षण. ७. खटाटोप. ८. द्रव्याची आशा. ९. असते, वास करिते. १०. दृष्टीला. ११. फार श्रम घेणें. १२. पाण्याचा भोंवरा, फेरा. १३. परदारादिक. १४. राजसा नियम कोठें उरे?=मग रजोगुणाचें नियम=नियमन करण्याचें कोठें उरे?=एकाच बाजूस राहिलें–असा भाव. म्ह० रजोगुणामध्यें जीव अगदीं भडकून गेला–हें तात्पर्य. १५. निजध्यास=अतिशयेंकरून ह्व्यास, नाद. १६. उंची लुगडें. १७. कपाळीं. १८. कस्तुरी.

मैथुनाचार । करावा कीं. ॥ १५८ ॥ ऐसा मनामाजी अंकुर । वाढे जयाचिया थोर । तो जाण पैं बंडीवार । राजसाचा. ॥ १५९ ॥

**रसाहारातिलुब्धोऽयं भोगमात्रेण संयुतः ।**
**गर्भवासाधिकारी च रजोगुणस्वभावतः ॥ ३० ॥**

आणि जितुका असे पैं रस । तया आवडे बहुवस । तया गुणें गर्भवास । घडे जीवा ॥ १६० ॥ जैसें शेळीचें चरणें । हुताशाचें जाळणें । उदकानें संतोषणें । सर्वांशींच पैं. ॥ १६१ ॥ जो मिळेल पैं तयासि । स्वैरिणी स्त्री मिळे विलासी । कीं भिक्षुकासि । सर्व घरें. ॥ १६२ ॥ दुष्टाला सर्वचि विषम । तस्कराला सर्वचि ग्राम । संसारिकां सर्व काम । आथि जैसें ॥ १६३ ॥ तेंवी राजसगुण अभिलाषी । भलतिये पदार्थी कळासी । जैसा गळ घालुनि जळासि । मीन साधी. ॥ १६४ ॥ आर्जवें मानवां आराधी । कैसेहि पैं विषय साधी । कीं मृगालागीं पारधी । वनीं जैसा ॥ १६५ ॥ म्हणोनि गर्भवासाचे कष्ट । पडती तया स्पष्ट । जरि कां गुरुगम्य गोष्ट । नाणी मना. ॥ १६६ ॥ ययापरि कीं राजस । कथिला तुज बहुवस । आतां ऐक तो तामस । कवणियेपरी. ॥ १६७ ॥

**महदुराग्रही चैव पुण्यमार्गे पराङ्मुखः ।**
**पापकर्मणि युक्तोऽयं तमोगुणस्वभावतः. ॥ ३१ ॥**

आतां तामसाचा प्रकार । तुजला कळावया विकार । वृत्तिसारिखें क्षणभर । मानस होय ॥ १६८ ॥ तेथ दुराग्रह म्हणणें कवण । जाण तयाचें लक्षण ।

---

१. संगमोत्सुकता. २. बढाई, प्रशंसा. ३. रज हें अंजनरूप आहे. यापासून पदार्थांच्या ठायीं आसक्ति आणि विषयांच्या प्राप्तीची इच्छा हीं उत्पन्न होतात. 'रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् । तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥' (भगवद्गीता—अ० १४ श्लो० ७.) रज हें रंजनरूप आहे असें जाण । यापासून प्राप्तीची इच्छा आणि प्राप्त पदार्थांच्या ठायीं आसक्ति हीं उत्पन्न होतात । हे कौंतेया, तें देहीला कर्माची संगति लावून देतें. (सुबोधचंद्रिका.) ४. अग्नीचें. ५. जारिणी. ६. आथि=आहेत याअर्थी. ७. ठोकून घट्ट करणें. ८. सद्गुरूपासून समजून घेतलेली. ९. तामसाचा प्रकार=जेव्हां तमाची विशेष वृद्धि होते तेव्हां विवेकाचा नाश, उद्योगाचा कंटाळा, दुर्लक्ष, आणि मोह म्हणजे भलतीच समजूत हीं उत्पन्न होतात. ('अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च । तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन ॥' भगवद्गीता—अ० १४ श्लो० १३.)

हें ऐकतां विचक्षण । त्यागूं पाहती. ॥ १६९ ॥ देखोनी पैरावी नारी । वेळ पाहूनि बलात्कार करी । परी देखिलिया कवणहि मारी । हें न स्मरेचि जो ॥ १७० ॥ कीं ठाणेया भेद करिती । कळलिया तोफेच्या तोंडा देती । ऐसें ऐकोनि स्वभाव स्थिति । नै संडी तो ॥ १७१ ॥ किंवा चाहाडिया मान नाहीं । हें ऐकिलें असतां कांहीं । परि त्याचि स्वभाव डोहीं । मागुतीं बुडे. ॥ १७२ ॥ चोरी कीं व्यभिचार । जितुका अवलक्षण प्रकार । ऐके देखे परि सिनार । न सोडी पैं. ॥ १७३ ॥ ऐकतां बधिर देखोनि अंध । ऐसा तामस मतिमंद । अपकीर्तीचा दुर्गंध । घेतचि बैसे. ॥ १७४ ॥ पुण्याविषयीं पांठिमोरा । साधुसंता पाहुनि झुरा । तया आपणचि दिसे धुरा । पृथ्वीमध्यें. ॥ १७५ ॥

**संततं क्रोधयुक्तोऽयं विक्षेपकः सुकर्मणि ।**
**निद्रालस्यविसंमूढोऽतःशून्यो मोहसंयुतः ॥ ३२ ॥**

आतां क्रोधाचा संन्निपात । चढला जयासि सतत । तयानेंचि विक्षेप पडत । सुकृतासी. ॥ १७६ ॥ सुकृताची बुद्धि । नयेचि पैं त्रिशुद्धी । कीं आत्मशुद्धीची सिद्धि । नाहींच तया. ॥ १७७ ॥ निद्रा आलस्य बहु तया । मूढत्वेंचि असणें जया । सुंषुप्तिचिया ठाया । नित्य रमे. ॥ १७८ ॥ ऐसा हृदयगर्भचि ग्रासिला मोहें । म्हणोनि कशाचिहि नकळे सोय । हा जाण पैं अभिप्राय । तामसाचा. ॥ १७९ ॥

**निंदकश्च विषादी च शोकाकुलितमानसः ।**
**कामी स बहुमानी च निमग्नः स्वस्तुतौ सदा. ॥ ३३ ॥**

निंदा करितां हर्ष भरे । विषादें अखंडचि झुरे । आणि कवणाहि वरी

---

१. परकीय. २. ठाणेया भेद करिति=किल्ल्यादिकांवरचा ठाणेदार लोभानें लांच वगैरे घेऊन ठाण्याचा भेद शत्रूस कळवितो अशा प्रकारच्या साहसाचें कर्म. ३. न संडी=सोडीत नाहीं. ४. कुटुंबांतील इतर मनुष्यांस न कळतां द्रव्यादिकांचा आपमतलबानें कोणी मनुष्यानें केलेला सांठा त्याला 'सिनार' म्हणतात. हा शब्द कोंकणांत सर्वत्र आहे. हा शब्द मोलस्वर्थकृत कोशांत आढळत नाहीं. ज्यांचा समावेश या कोशांत झाला नाहीं असे पुष्कळ शब्द आहेत त्यांचा संग्रह नवीन कोशकारांनीं अवश्य केला पाहिजे. ५. पराङ्मुख. ६. झुरणें=निघून जाणें, निसटून जाणारा, साधूंचा तिरस्कार करणारा. ७. धुरा=आपणच मोठा, मी काय तो थोर. ८. सन्निपात वायु, त्रिदोष—कफ, वात, पित्त, या तीन दोषांचा एकत्रपणा. ९. अडथळा, विपरीत ज्ञान. १०. गाढतम, गाढनिद्रेंत. ११. झुरणीस लागतो, दुःखी होतो.

गुरगुरे । श्वान जैसा ॥ १८० ॥ विषादें वंगलें[1] तोंड । मनीं शोक काढी उदंड । लोक भाग्याचें बंड । पाहोनि श्रेमीं[2]. ॥ १८१ ॥ आपुली स्तुति आपण करी । आपणामध्येंचि थोरपण धरी । आणि आचरण तैसें न धरी । ही न बुद्धि ॥ १८२ ॥ क्रूर कृतघ्न स्पष्ट बोले । तयाचें दर्शन नव्हे भलें । दिठी[3] पडलिया वाळिलें । व्हावें त्यासी. ॥ १८३ ॥ तयासि पैं संभाषण । सहसा करूं नये जाण । हें सांगितलें लक्षण । चित्तीं धरीं. ॥ १८४ ॥

**मया तु सदृशो नास्ति भूतेषु सर्वतो भुवि ।**
**इतीयमज्ञता जंतोर्मोहता च मदांधता ॥ ३४ ॥**

अवघिया त्रिभुवना माझारी । माझी कवणचि न पवे सरी । पुरतें अज्ञान अंगिकारी । म्हणोनि जल्पे. ॥ १८५ ॥ मदांधपणें मोहिलें मन । तेणें आहे असावधान । आपणामाजीचि मग्न । मूर्खबुद्धि. ॥ १८६ ॥ ऐसा अवघियांकडून । लांछनाचें लेणें[4] लेवून । आपुलें दृष्टत्व[5] नसे म्हणुन । ऐसा झाला॥१८७॥ ऐसा जीव पैं परम । पावलासे संसारभ्रम । मग धरोनि अनुक्रम । वर्तों लागे. ॥ १८८ ॥ पराधीन हें मनुष्यदेह । तेथ पडती सकळ संदेह । योगक्षेम निर्वाह[6] । सांकडें[7] पडे ॥ १८९ ॥ अकिंचनाचि हे आहे[8] । धनवंता रोग होय । कासयाचें तरि दुःख आहे । मनुष्यलोकीं. ॥ १९० ॥

**एवं च त्वंपदं सर्वं निर्बंधस्यानुकारणम् ।**
**लुप्तज्ञानमधैर्यं च तथा च भ्रांतिमूलकम्. ॥ ३५ ॥**

यया सर्वांसि आश्रय त्वंपद[9] । तोचि जीवात्मया बंध । निरुपचारीं आनंद । न लभे तया ॥ १९१ ॥ निर्मावया सामर्थ्य । नाहींच कीं इच्छिला अर्थ । म्हणोनि तया परमार्थ । अवघडचि झाला ॥ १९२ ॥ अधैर्यें[10] आधिष्ठिलें[11] मन ।

---

१. अनिवार झालें. २. खिन्न. ३. दृष्टीस. ४. दागिना, अलंकार. ५. आपुलें दृष्टत्व=स्वस्वरूपज्ञान. ६. उदरनिर्वाह. ७. दुःख, संकट. ८. अकिंचनाचि हे आहे=निर्धनता, दारिद्र्यदुःख हें आहेच. ९. त्वंपद=शुद्धब्रह्म जेव्हां मलीन सत्वप्रधान रजस्तम मिश्रित आणि कामकर्मादिकें करून दूषित अशा अविद्येचा स्वीकार करतें तेव्हां तें 'त्वंपदानें' दर्शविलें जातें. (यदा मलीन सत्वां तां कामकर्मादि दूषिताम् । आदत्ते तत्परं ब्रह्म त्वंपदेन तदोच्यते ॥४५॥ सार्थ पंचदशी–पृष्ठ १०.) १०. अधैर्यें=धृति=धारणाशक्ति तिचा जेथें अभाव–नसणें. ११. मूलरूप केलें म्ह० अधृतीनें मनास पछाडून टाकिलें–असा भाव.

तेणेंचि गेलें अवसान । सर्व द्रष्टात्मकज्ञान । गुप्त झालें ॥ १९३ ॥ परब्रह्म ऐसें पैं नित्य । वरी पिंड झालें नैमित्य । परि मिथ्या भ्रमण भ्रांत । पडली जेथें ॥ १९४ ॥ ऐसें सुगम असोनि ब्रह्मज्ञान । वरी बळावलें पैं अज्ञान । म्हणोनि नावडे सज्ञान । अवरुची जैसी ॥ १९५ ॥

**आत्महितं न जानाति परमार्थे पराङ्मुखः ।**

**न करोति मनःस्थैर्यं सद्भावं नाचरेत्कदा. ॥ ३६ ॥**

ज्याला आत्महित पैं न कळे । विषयविलासीं बुद्धि विकळे । दृष्टीं पाहोनि सकळें । सृष्टीसोगें. ॥१९६॥ नाहीं परमार्थाची आर्त । सांगो न कळे हृदयींचा अर्थ । क्षणभरी स्थिर नोहे व्यर्थ । फिरों लागे. ॥ १९७ ॥ सद्भाव पोटीं नाहीं बरवा । कांहींच न घडे सेवा । तया आत्मसुखाचा ठेवा । सांपडे केंवी ? ॥ १९८ ॥

**योगक्षेमरता नित्यं चिंताक्रांता हि सर्वदा ।**

**असंतुष्टा विहर्षास्तूदासीनो ज्ञानमार्गणे ॥ ३७ ॥**

**ज्ञानं च कथमेतेषां तरिष्यति भवात्कथम् ।**

**यांति ते भवपारं च साधुसंगाच्च सेवनात्. ॥ ३८ ॥**

जयां संसाराची परम चिंता । निरंतर पैं सखेदता । हृदयीं असंतुष्टता । सर्वकाळ. ॥ १९९ ॥ तेणें हर्ष नासला जाय । अर्थ न मिळे करूं काय । आपण आपणासीच खाय । चिंतायोगें. ॥ २०० ॥ ऐसिया कैसेनि ज्ञानप्राप्ति । उपाय कैसे उमजती । भवसागर हा तरती । कवणियेपरी. ॥ २०१ ॥ करावी संतांची सेवा बरवी । संतपरीक्षा चांगली घ्यावी । आणि निंदा पैं न करावी । पुनरपि पैं. ॥ २०२ ॥

**इति श्रीसिद्धांतसंहितायां सोहिराविरचितायां त्रिविधतापकथनं नाम तृतीयोऽध्यायः संपूर्णः ॥**

---

**अध्याय चवथा.**

**केवलं मूढजंतूनां स्वेषां च मोक्षसाधनम् ।**

**सद्गुरोः सेवनं सद्यश्चानन्यभावतन्मयम्. ॥ १ ॥**

---

१. द्रष्टात्मकज्ञान=सर्वसाक्षि आत्म्याचें ज्ञान. २. आवड, इच्छा. ३. द्रव्य, इच्छा, काम. ४. समजती. ५. चांगली.

केवळ जीव जे कां मूढ । अज्ञान जैसे दगड । घेउनी उठती पाषांड[१] । भलतेंचि. ॥ १ ॥ जे वैराग्याचिया शिंवे[२] । पावतीच ना कीं स्वभावें । विवेकाचिया नांवें । झुरती[३] सदां. ॥ २ ॥ विरक्ती कैसी नेणती । विषयांसाठीं पैं शीणति[४] । दुःखचि आघवें जिंणति[५] । निसूकपणें[६].॥ ३ ॥ नेणती मोक्षाचें साधन । करिती संसार आराधन । सदोदीत अवधान[७] । निंदेमाजी. ॥ ४ ॥ जे परम चिंतेनें व्यापिले । अज्ञानभूतानें[८] खेपिले । आत्मज्ञानें पैं लोपिले । अन्यथा ज्ञानी. ॥ ५ ॥ ऐशियांतें मोक्षासाठीं । बहुत पडली आटाआटी[९] । लाभेल न लभेल शेवटीं । कवण जाणे. ॥ ६ ॥ प्रथम संताची सेवा । त्याणें करावी विनयभावा । सर्वांठायीं गर्वा । सांडुनियां. ॥ ७ ॥ परि तेथ असे एक भ्रांति । समर्थ ऐसे न दिसती । आपणा समानचि वसती । मनोभावें. ॥ ८ ॥ शरीरधर्म पैं आघवे । सर्वांसारिखे स्वभावें । तें कांहींच पैं नसावें । तरिच साधु. ॥ ९ ॥ सर्व प्राणियां अन्न व्हावें । त्याणें निराहार[१०] असावें । सर्वांचेंचि सोसावें । निंदिती तें. ॥ १० ॥ कांहीं चमत्कार असावा । तरीच साधु ऐसा म्हणावा । न्यून पदार्थ तो द्यावा । मागेल त्या. ॥ ११ ॥ फुटला डोळा फिरोनि द्यावा । गेला जीव मागुती यावा । दारिद्र्य आलिया वैभवा । द्यावें त्याणें. ॥ १२ ॥ वचनें त्याच्या रोग जावा । वांझेसि पैं पुत्र द्यावा । ऐसें असेल तरीच म्हणावा । समर्थ ऐसा. ॥ १३ ॥ जयाचिया मनीं ऐसें वसे । ऐसियासि साधु कैसेनि दिसे । बहुतेकां पिसें । ऐसेंचि असे पैं. ॥ १४ ॥ समयीं ऐसियाचेंहि दर्शन । झालियाहि करिती आराधन[११] । परि योजिती पैं साधन । संसाराचें. ॥ १५ ॥ ऐसें अज्ञान जीवीं वसे । तंव साधु कोठेंचि पैं न दिसे । पळविलिया[१२] पैं पिसें । आंगिचें तें. ॥ १६ ॥

**जडत्वमन्नपाने चैतत्सामान्यं नृभिः समम् ।**

**वासनाभिश्च मुक्तोऽसावनंतज्ञानवानयम्. ॥ २ ॥**

---

१. पाखंड—मिथ्यावाद. २. शिव=ग्रामादिकांची हद्द, मर्यादा. ३. मत्सरग्रस्त होतात. ४. कष्टी होतात, दुःख पावतात. ५. जिंकिति. ६. निर्लज्जपणें. 'निसुक' हा शब्द कोंकणांत चालतो. ७. लक्ष. ८. भूतानें पछाडले, त्रासिले. ९. परिश्रम, कष्ट. १०. निरशन, अन्नरहित, भक्षणरहित. ११. पूजन, अर्चन. १२. पळविलियाहि पिसें, आंगिचें तें=प्रसंगवशात् अज्ञानी जनांस जरि साधु भेटला तरि संसारसाधनाची त्यापासून ते इच्छा करतात, मग तें आंगिचें पिसें=वेड पळविल्यावांचून कसा दृष्टीस पडेल.

बांबुळी[1] त्यागुनि जीवन । अभ्रगमनीं जेंवी तैपन[2] । धूम्रप्रयाणीं[3] दीपन । देखणें जैसें. ॥ १७ ॥ अवरुची काढोनि रसना । पारखीजे रस नाना । कीं लोभ निरसूनियां दाना । पहावी बुद्धि.[4] ॥ १८ ॥ पुर गेलिया पैं नदी । अज्ञान गेलिया सद्बुद्धि । योग सरलिया समाधि । देखणें जैसी. ॥ १९ ॥ तेंवी सांडुनि मानवधर्म । साधूचें पाहणें आंतलें वर्म । हें जाण पैं कर्म । साधकाचें. ॥ २० ॥ सर्वांसमान अन्नपान । परि सर्वां न दिसे भगवान् । त्याचें नित्य लागे जया ध्यान । तोचि साधु. ॥ २१ ॥ स्थूलदेह सर्वांचें एक । परि वासना असती अनेक । सुख दुःख पंचभौतिक[5] । आकारासी. ॥ २२ ॥ ययाची बद्धता जयासि नोहे । तो साक्षी अनारिसा[6] आहे । तोचि मी कीं येथ पाहे[7] । सोहं ब्रह्म. ॥ २३ ॥ हें देखणें पैं जया असे । निरंतर हृदयीं तेंचि वसे । हें जयाचिये दृष्टी दिसे । तोचि शिष्य. ॥ २४ ॥ आपणासही तेंचि व्हावें । म्हणोनियां तैया[8] शरण जावें । ऐसें जयाचिया स्वभावें । दाटलें होय. ॥ २५ ॥

**चंदनस्य तु रूपं चैतत्सामान्यं द्रुमैः समम् ।**
**अन्यत्रागंधभावोऽत्र समीचीनः स विद्यते. ॥ ३ ॥**

दृष्टीचेनि मिसें[9] दिसे । तरी वृक्ष चंदनत्वेंचि असे । आंगीं सुगंध गुत वसे । तो प्रकटे घ्रांणा.[10] ॥ २६ ॥ पक्षिया बैसणेचें काम । तया चंदन कुटजासम । भुजंगा[11] परिमळाचें प्रेम । ते चंदनींच जडती ॥ २७ ॥ तेंवी जया आवडी विषय व्हावे । साधूनें म्हणे तेचि द्यावे । जया हृदयीं ज्ञान ध्यावें । तो न स्मरेचि हें ॥ २८ ॥ जेथ समुद्राची भेट घ्यावी । तेथ स्नानाची इच्छा करावी । तेथ तृषा पुरती हरावी । हे मूर्खबुद्धि ॥ २९ ॥ सर्व वृक्षां सुगंध नाहीं । म्हणोनि चंदनचि नांमार्थें[12] पाहीं । तेंवी सर्वचि जीवां ज्ञान नाहीं । संतांविणें ॥ ३० ॥

१. तलावादिकांतील पाण्यावर दाट असणारी सूक्ष्म वनस्पतिविशेष, जिला कोंकणांत 'शेवाळ' असें म्हणतात. २. सूर्य. ३. धुराचा कल्लोळ गेल्यावर अग्नीचें दीपन=प्रकाशणें. ४. लोभ निरसूनियां दाना, पाहावी बुद्धि=द्रव्यलोभी मनुष्याकडून दान देणें कसें संभवेल? लोभ टाकिल्यावर मग त्याची धर्मबुद्धि पहावी. ५. पंचमहाभूतसंबंधीं शरीर, लिंगदेह. ६. निराळाच, भिन्न. ७. तोचि मी कीं येथ पाहे=सर्वसाक्षी आत्मा तोच येथें जीवात्मभावें करून नटला आहे असें पाहतो. ('अहं ब्रह्मास्मि' यजुर्वेद.) ८. त्या साधूला. ९. निमित्तानें. १०. नाकास. ११. सापाला. १२. नामनिर्देशानें.

**लोहं नयति हेमत्वं परिसः प्रस्तरोऽपि च ।**
**सद्गुरुः सेवकं तद्वज्ज्ञानिनं कुरुते सदा. ॥ ४ ॥**

पाषाण जाति परिसाचि । परि काळिमा लोपवी लोहाची । आर्द्रता[1] जाति अमृताचि । मृत्यु हरि ॥ ३१ ॥ मर्कट स्वरूप मारुतीचें । परि आंगीं बळ ईश्वराचें । तेंवी मनुष्यरूप साधूचें । चिद्रूपत्वें[2] ॥ ३२ ॥ साधूचें सामर्थ्य पैं गाढें[3] । समग्र अज्ञान पैं मोडे । परि ऐसें पहाणार थोडे । जनामाजी ॥ ३३ ॥ जयां अज्ञानें भुलविले । बहुत जन्म घेवविले । श्रमी करूनि फिरविले । बहुकाळ. ॥ ३४ ॥ जें द्रव्य वेंचिलिया न[4] वजाय । जयासि पैं न लगे घाय । सूक्ष्म रीतीं आहे । म्हणोनियां ॥ ३५ ॥ ऐसें अज्ञान पैं दुर्घट । तयाची साधु लाविती वाट । शिष्यासि शेवट । दाविती पैं ॥ ३६ ॥ पंरीस[5] लोहाचें करी सोनें । तेंवि अज्ञान प्रकाशिलें ज्ञानें । देहबुद्धिसि आत्मध्यानें । लाविली पैं ॥ ३७ ॥

**जातिरूपं परित्यज्यात्मज्ञं सद्गुरुमाचरेत् ।**
**मनोधर्मं परीक्षेत स्वरूपं न विचारयेत्. ॥ ५ ॥**

सद्गुरूचें आकार स्वरूप । दिसे तें न गणी चिद्रूप । जेंवि कां नमस्कारिजे दीप । समयीं सहित ॥ ३८ ॥ तो तेथ वंदिजे वन्ही । वांचुनी तेलवातीतें कवण मानी । तेंवी आत्मज्ञानेंचि वंदनीं । येइजे साधु ॥ ३९ ॥ तुलसी नमितां पैं झाड । तेथ भावार्थ धरिजे वाड[6] । तेंवी जातीचें कंवाड[7] । उघडणें जें ॥ ४० ॥ कीं अश्वत्था[8] किजे वंदन । मानुनी विष्णूचें अधिष्ठान । पशुत्व न मानितां नमन । सुरभीस[9] कीजे ॥ ४१ ॥ तेंवी मनुष्यत्व अंव्हेरूनि[10] । अंतरचि ध्यावें पारखोनि[11] । तें कवणपरी विवंचनीं । जाणणें पैं. ॥ ४२ ॥

**स्फटिकानां च वज्रं तु नृणां साधुर्नरर्षभः ।**
**आत्मन्येवात्मना तुष्टस्त्यक्तसंगश्च सत्परः. ॥ ६ ॥**

स्फटिकामाजी हिरा । पारखिजे जेवीं पुरा । तेंवी साधु सर्व नरां- । माजि

१. पातळपणाचा गुण. २. ज्ञानस्वरूपत्वेंकरून, ब्रह्मरूपानें. ३. बळकट, समर्थ, थोर, श्रेष्ठ. ४. जात नाहीं. ५. स्पर्शमणि. ६. वाड=थोर. ७. तेंवी जातीचें कवाड उघडणें जें=खरोखरीच जें कवाड–द्वार (दरवाजा) आहे तेंच उघडेल, इतर भितींवर दरवाज्याचा आकार चित्रित केलेला उघडण्याचा प्रयत्न करून काय उपयोग? ८. पिंपळाचें झाड. ९. कामधेनूस. १०. टाकून, त्यजून. ११. परीक्षा करून.

श्रेष्ठ. ॥ ४३ ॥ जो सर्वघटीं एकचि पाहे । निरंजनवनीं[1] नित्य राहे । जो प्रपंचीं नसोनि आहे । उदासीन. ॥ ४४ ॥ साधक जनांचा उद्धार करी अज्ञानाचा पाड न धरी । ज्ञानकळा जागृत करी । हृदयामाजी. ॥ ४५ ॥ जो आत्मज्ञानाचा समुद्र । अद्वय[2]कुमुदिनीचंद्र[3] । अत्यंत प्रळयीं रुद्र । केवळ पैं गा! ॥ ४६ ॥ जयाचा डोळाचि झाला गगन । आंत मावळोनि गेलें मन । पुनरावृत्ति आगमन । खुंटलें जेथें. ॥ ४७ ॥

**श्रद्धया शरणं याति महात्मानं च तं गुरुम् ।**

**तत्कृपया विनिर्मुक्तो विश्वसिति च तद्वचः. ॥ ७ ॥**

ऐसिया श्रेष्ठ साधूपाशीं । शरण यावें अनन्येंशीं । आणि तयाचिया वचनविश्वासीं । राहणें जें कां. ॥ ४८ ॥ विश्वास धरिलिया आपण । मग जें सांगेल तें प्रमाण । शब्दासरिसीच[4] खूण । बाणेल ते. ॥ ४९ ॥ प्रथम ययाचें कर्म सरावें । आणि मोक्षपद प्रारब्ध उदया यावें । तरीच पैं हें व्हावें । एरवीं नाहीं. ॥ ५० ॥ ययाचें सरलिया कर्म । ध्यानीं येईल आंतलें वर्म । मग हा उपदेश धर्म । नांदेल[5] तेथें. ॥ ५१ ॥ प्रथम संदेह[6] निरसावा । मग उपदेश केला असावा । मग संतचरणीं विसांवा । सहजेंचि होय. ॥५२॥ तो संशय पैं कवणेपरी । चमत्कार इच्छा करी । नातरि आपण साधु समता धरी । चित्तामाजी. ॥ ५३ ॥ तेथें भ्रांतीसि कीं निवारण । कवणिये परीचें जाण । आपण पहावें उद्धरण । जीवाचें पैं. ॥ ५४ ॥ प्रपंचांतुनि सुटावें । पुनर्वासनेतें विटावें । एवढेंचि पैं कार्य व्हावें । ज्ञानें करुनि. ॥ ५५ ॥ सिद्धि सामर्थ्य शबलांशींचें । आणि ज्ञान सामर्थ्य शुद्धांशींचें । शबलांशींच असणें जयाचें । तो सामर्थ्य इच्छी. ॥ ५६ ॥ ऋषींपाशीं सामर्थ्य थोर । तरि कां पां सांडिला प्रपंच घोर? । कां न करोनि राहिले अमर । संसारचि. ॥ ५७ ॥ तयाचिये दिठी देख । संसार म्हणणें वृथा दुःख । अज्ञानांतरीं हरिख[7] । येथचि वाटे. ॥ ५८ ॥ दर्दुरा[8] कर्दमचि[9] गोड । जलचरां जळींच सुखवाड[10] । पक्षियां देखतां झाड । सुख वाटे. ॥ ५९ ॥ ज्ञान सामर्थ्य येथुनि काढी । आणि सिद्धि सामर्थ्य फिरोनि पाडी । मग कधींच न संडे[11] गोडी । विषयांची. ॥६०॥ म्हणोनि इच्छितां सिद्धि

१. निरंजनवन=मायारहित एकांत (ब्रह्मवन). २. अद्वय=ऐक्य, जेथें दुसरेपणा नाहीं अशी. ३. कमलिनी विकसित करणारा चंद्र. ४. शब्दासारखीच. ५. राहील. ६. संशय. ७. हर्ष. ८. बेडका. ९. चिखल. १०. सुखसमृद्धि. ११. सोडी, सांडी.

सामर्थ्य । कधींच न लभे परमार्थ । चित्तीं न धरावाचि अर्थ । एतद्विषयीं. ॥ ६१ ॥ देखोनियां पैं अन्यायी । राजा वस्त्रें भूषणें देई । मग तयातें स्वल्पचि होई । अन्याय केला ॥ ६२ ॥ व्याधि हरावया वैद्य योजी । आणि तो जरि कां कुपथ्य पाजी । तरि तो वैद्यचि सहजीं । रोग झाला ॥ ६३ ॥ तेंवी साधूनें हरावें अज्ञान । वसतें करावें आत्मज्ञान । तेथ विषय बुद्धि समाधान । करील जरी ॥ ६४ ॥ मग तयाचें साधुत्व गेलें । आणि अज्ञान आंगीं [१]अवगलें । मग मोहाचें ठाकुनी आलें । [२]भुररें तया ॥ ६५ ॥ म्हणोनि नैराश्यचि देखे । ज्ञानाचा पैं धर्म राखे । तो कवणाचेचि काखे । राहूं न शके ॥ ६६ ॥ एवं संदेह घातलिया मागें । मग साधकाचें चित्त लागे । मग सहजचि [५]आर्ति जागे । भगवंताची. ॥ ६७ ॥

**आर्तस्त्वयं च जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानसंयुतः ।**
**ज्ञानहीनं तु सर्वं च निष्फलं साधनं ननु. ॥ ८ ॥**

प्रथम जो कां आर्त । कैसा पारखावा यथार्थ । हृदयींचा अर्थ । कवणिये परि. ॥ ६८ ॥ दृष्टी देखोनि कौतुक । कर्ता ईश्वर समर्थ एक । आणि पुराण-श्रवणीं अवतारिक । चरित्र आयके ॥ ६९ ॥ आणि गुरुहि सांगे तेंचि । परि प्रतीति नाहीं तयाची । आवडीच विषयांचि । न बाधे [६]ऊर्मि. ॥ ७० ॥ सर्व नाशिवंत ऐसें । ऐकत देखत कळलें असे । कीं ग्रंथ ही वाचीतसे । [७]आध्यात्मिक ॥ ७१ ॥ त्यांत [८]त्यागार्थ शब्द आयके । तेथ अर्थ करी बुद्धिसारिखे । मग आपुलिया आंगीं न देखे । त्यांतील कांहीं ॥ ७२ ॥ आपुलिये हृदयीं न बाणे । तंव परमार्थ हा [९]संगी न म्हणे । [१०]आणि कवणासीच नाहीं म्हणे । परमार्थ हा ॥ ७३ ॥ परब्रह्म वेगळें आहे । पिंडीं कर्म सहज होय । आणि त्यागाची सोय । कवण [११]जागां? ॥ ७४ ॥ [१२]पतित झाला हें पैं न कळे । कीं

१. अनिवार झालें. २. प्राप्त झालें. ३. पिसें, वेड. ४. निराशपण. ५. आवडी, प्रेमा. ६. आत्मज्ञानाचा उल्हास, उकळी. ७. आत्मानात्मविचारविषयक ग्रंथ. ८. ग्राह्याग्राह्य, चांगलें तेंच ग्रहण करावें आणि वाईट तें टाकावें अशा प्रकारचे शब्द. ९. संगतवार, यथार्थ. १०. आणि कवणासीच नाहीं म्हणे, परमार्थ हा=परमार्थ आपणास साध्य नाहीं म्हणून दुसऱ्या कोणासहि तो साध्य होण्यासारखा नाहीं असें म्हणतो. ११. कवण जागां=त्या आर्ताचा प्रश्न असा कीं, परब्रह्म तें निराळेंच आहे व लिंगदेहांचा इंद्रियव्यापार सहजगतीनें होतो, तर मग कर्मत्यागाची सोय कोणत्या जागीं आहे. १२. दुष्कर्माचरणाविषयीं जर मुळीं पश्चात्तापच होत नाहीं तर मीं पाप केलें असें त्याला कसें कळेल?

लाजणें या वेगळे । [1]सुख कैसें पैं न कळे । तारुण्याविण. ॥ ७५ ॥ प्रथम [2]कोंभरिया उपक्रम । [3]ईक्षुचि आहे नाम । परी गोडी दावील [4]संभ्रम । वाढेल तेव्हां. ॥ ७६ ॥ आघवे रजनीचिया तमा । बालत्वें न नाशी चंद्रमा । पौर्णिमेचिया नेमा- । वांचूनि पैं. ॥ ७७ ॥ तेंवी आर्त देवाचें स्मरण करी । बहुत भक्ति आचरी । परि देव आहे कैशापरी । न कळेचि पैं. ॥ ७८ ॥ जरि जिज्ञासु [5]भूमिका देखे । ऐकोनि घे गुरुमुखें । मग निश्चितार्थ ओळखे । [6]देव तो मी. ॥ ७९ ॥ [7]नामरूप जाणोनि येतें । [8]जाणिवेच्या वेगळें पडतें । [9]जाणीव देखे तयातें । तें जाणिवे न देखे. ॥ ८० ॥ जिज्ञासु द्वितीय भूमिका । ते कवणियेपरि ऐका । आधींच ते [10]व्यतिरेका । [11]दिठी बैसे. ॥ ८१ ॥ शरिराचीं वेष्टणें । [12]चहूं देहाचीं वेगळीं जाणे । तयांतीत उरे तें मी म्हणे । परब्रह्म. ॥ ८२ ॥ जैसें क्षीरनीर पैं मिसळलें । राजहंसें वेगळें केलें । दृष्टी न पडतां सेविलें । गुप्त जैसें. ॥ ८३ ॥ माया [13]नीर वेगळें केलें । तें [14]सांडणेंचि दिसों आलें । आणि ब्रह्मक्षीर निवडिलें । अव्यक्तचि. ॥ ८४ ॥ कीं [15]भूसबीज एकवटलें । जेंवी पवनें वेगळें केलें । तैसे नाशिवंतीं निवडिलें । [16]अविनाश जें.

---

१. तारुण्यजनकविषयादि सुखावांचून अन्य सुख कसलें तें कळतच नाहीं. २. कोंभरिया उपक्रम=उंसाची लागवड केली म्हणजे नुकताच फुटलेला कोंभ (अंकुर). त्याला कोंकणांत वाड असें म्हणतात. उपक्रम=उद्भव. ३. ऊंस. ४. महत्व, समारंभ. ५. सप्तभूमिकांपैकीं एक भूमिका 'शुभेच्छा'. सप्तभूमिकांचीं नांवें:–१ शुभेच्छा, २ विचारणा, ३ तनुमानसा, ४ सत्वापत्ति, ५ संसक्तिनामिका, ६ पदार्थभाविनी व ७ तूर्यगास्मृताभाविनी. यांचीं लक्षणें:–१ जिज्ञासामुमुक्षु=मोक्षेच्छा सर्व प्रकार–ती शुभेच्छा, २ आत्मानात्मविचार जो तो–ती विचारणा, ३ योगाभ्यास एकांतीं करणें–ती तनुमानसा, ४ सुखेन ब्रह्म संस्पर्शमत्यंतम्–ती सत्वापत्ति, ५ आत्मानुभवीं आसक्त–ती संसक्तिनामिका, ६ संपूर्ण स्थूल, सूक्ष्म, कारण याचा आत्मानुदर्शनें अभाव–ती पदार्थभाविनी, ७ उन्मनीं केवळ विगलित शांत पक्वता–ती तूर्यगास्मृता. ६. अहं ब्रह्मास्मि. ७. नामरूप हा मिथ्या भास आहे असें समजून येतें. ८. नामरूप मिथ्या होय हें कळल्यावर त्याचा आणि जीवाचा जो एकपणा होता त्यांतून जीव निसटून निराळा होतो. ९. जाणीव देखे तयातें=जाणीव=जाणणें जीवात्मा मिथ्या नामरूपातें पाहातो, परंतु तें नामरूप त्याच्या गोष्टीस जाणत नाहीं. १०. व्यतिरेक=अन्वय. व्यतिरेक म्ह० 'अमुक गोष्ट असली तर अमुक असलीच पाहिजे,' असा जो नियम तो अन्वय होय. आणि 'एक नसेल तर दुसरीही असणार नाहीं,' या नियमास व्यतिरेक म्हणतात. जसें:–वह्न्यभावे धूमाभावः. ११. दृष्टी. १२. चहूं देहांची=चार देह १ स्थूल, २ सूक्ष्म, ३ कारण, ४ महाकारण या चार देहांचीं. १३. उदक. १४. त्याज्य. १५. तूस=टरफल, साल. १६. ज्ञान.

॥ ८५ ॥ आर्तेंचि फल जोडिलें । जिज्ञासूनें सोडूनि दिधलें । तें अर्थार्थीनें योजिलें । भक्षावया. ॥ ८६ ॥ तें मुखीं पडलियावीण । अवघाचि अभ्यास अकारण । मग सेवुनियां जिरलिया जाण । पूर्ण बोध. ॥ ८७ ॥

**आर्तस्तु भक्तिवांश्चैव जिज्ञासुर्ज्ञाननिर्मलः ।**
**अर्थार्थी योगवांश्चैव ज्ञानी त्वात्मप्रबोधकः ॥ ९ ॥**

भक्ति तेचि पैं आर्ति । आणि जिज्ञासु म्हणिपें[1] ज्ञान स्फूर्ति । मग वैराग्य-[2]दशा अर्थाअर्थी । योगाभ्यास. ॥ ८८ ॥ तदुपरि ज्ञानियांच्या ठायीं । कांहींच पैं उरलें नाहीं, । कर्तव्य बुडालें डोहीं । शून्याचिया. ॥ ८९ ॥ तेथ शून्यही म[3]-हाशून्यीं । आकर्पिलें पैं निर्दानीं[4] । जेंवी हारपली[5] रजनी[6] । सूर्योदयीं. ॥ ९० ॥ ऐसें जेथवरी होणें । तया आत्मबोध ऐसें म्हणणें । जेथ हारपलें जाणणें । जाणल्यानिशीं[7]. ॥ ९१ ॥ जेथ पहातें[8] पहाणें[9] एक होतें । ऐक्यचि जाहलें हाता येतें । तया परतें जाणणें तें । उरलें नाहीं. ॥ ९२ ॥

**यस्य प्रीतिः समुत्पन्ना नाम्नि तु परमात्मनः ।**
**सोऽपि न मुंचति ज्ञानं विनामायाविबंधनात्. ॥ १० ॥**

परमात्म्याचें ऐकतां नाम । प्रेमचि वाटलें परम । तया पुढें सर्व काम । विसरला पैं. ॥ ९३ ॥ नित्य करी पैं कीर्तन । निमग्न होऊनि नर्तन । ग्रंथाचेंहि आवर्तन[10] । नित्य करी. ॥ ९४ ॥ भूतमात्रीं वंदन । देवप्रतिमें लोटांगण । इतुकें वागवी पैं बंधन । परि ज्ञान नाहीं. ॥ ९५ ॥ बाबुळीं[11] आच्छादिलें उदक, । कीं अभ्रीं[12] लपविला मयंक[13] । अर्थीं अडियला[14] श्लोक । जयापरी. ॥ ९६ ॥ तेंवी पंचभूतांचा कर्दम[15] । मायामिश्रित ज्ञालें ब्रह्म । तें निवडावयाचें वर्म । ना कळे जया. ॥ ९७ ॥

**असता सच्च युक्तं तु नीरक्षीरवदत्र हि ।**
**तत्र सत्क्षीरं सेव्यं च त्याज्यं नीरं मरालवत्[16]. ॥ ११ ॥**

जैसें क्षीरनीर मिसळलें । तें राजहंसें वेगळें केलें । करोनि पैं सेविलें ।

१. म्हणजे. २. निर्विकल्पता. ३. महाशून्य=ब्रह्मरूपता. ४. शेवटीं. ५. गेली. ६. रात्र. ७. ज्ञाल्यासह. ८. द्रष्टा. ९. दृश्य. १०. पुनरावृत्ति, पुनः पठन. ११. शेवाळ, पाण्यावर जाड सांचलेली बुरशी. १२. ढगांत. १३. चंद्र. १४. अडला गेला, अर्थ समजला नाहीं, लागला नाहीं. १५. कर्दम=चिखल. १६. हंसाप्रमाणें.

आवडीनें. ॥ ९८ ॥ अविद्यावंत जें नीर । त्याचा करोनियां अव्हेर । संसार विचार । घेतसे जो. ॥ ९९ ॥ जिज्ञासूचा स्वभाव । उगाचि न धरी भोळा[1] भाव । पारखीचा[2] गांव । वसवी आधीं. ॥ १०० ॥ जेंवी कां ते रसना । रस सेवितसे नाना । मग गोड ते पैं भावना । मागुतीं धरी. ॥ १०१ ॥ म्हणोनि जिज्ञासु कळा अवतरे । तैं ब्रह्मचि दृष्टीं भरे । तेथ मिथ्या तेवढें संहारे । सर्व पैं हें. ॥ १०२ ॥ तेथ पाहतां उठे पैं साक्षी । तो कवण ऐसा नये लक्षीं । ययास्तव मुमुक्षीं । अभ्यास[3] करणें. ॥ १०३ ॥

**दृश्यमूलमदृश्यं चालक्ष्यं च सर्वकर्षकम् ।**
**निरालंबपदं शून्यमेकाग्रेणैव गम्यते. ॥ १२ ॥**

चळतें[4] जें कां सकल दृश्य[5] । तया चाळक[6] जें कां अदृश्य । तेथ लावावें लक्ष । निरंतर. ॥ १०४ ॥ सर्वाकर्षित जें शून्य । निरालंब[7] जें चैतन्य[8] । वर्णितां जेथ मौन्य । श्रुतींसि आलें. ॥ १०५ ॥ तें लक्ष कैसें लागे । निरंतर हृदयीं तेंचि जागे । कल्पनाचि हे भागे । कल्पिता ही जेथ. ॥१०६॥ ऐसें पाहिजे आपणा व्हावें । तरी नेत्रांसि[9] आधीं पाहावें । तेथें[10] पाहतेंचि पाहणें घ्यावें । वेंटाळुनी. ॥ १०७ ॥ दृष्टीस[11] जेथिलें दृश्यपण । म्हणोनि तें घर रिघणें आपण । अभ्यासाचें[12] पाळण । घालूनियां. ॥ १०८ ॥ अभ्यासावांचूनि आन । प्राप्त नोहे ब्रह्मज्ञान । वर्तमामचि[13] ऐकोन । करावें काय? ॥ १०९ ॥ कवण ठाया लागलें जावें । तरी न चालतां कैसा पावे । तेंवी अभ्यासावीण मनोभावें । केंवि मिळे ब्रह्म? ॥ ११० ॥ म्हणोनि अभ्यास आंगीं असावा । तरीच शून्यीं[14] घे विसांवा । मग दृष्टीसन्मुख पहावा । भगवंतचि. ॥ १११ ॥ आणि जें जें देखे कांहीं । तें ईश्वरावांचुनि नाहीं । ऐसा अंतराचिये ठायीं । विसांवा घे. ॥ ११२ ॥ तो अभ्यास कवणिये परि । ऐसें कवण एक विचारी । तरी उपशमन[15] हें करीं । इंद्रियांचें. ॥ ११३ ॥

---

१. भोळा भाव=देवभोळेपणा. २. पहिल्यानें आत्मज्ञानाच्या योगानें परीक्षा करून सत्यस्वरूपाला पुरें ओळखितो–असा भाव. ३. योगाभ्यास. ४. चालन होतें. ५. नाशवंत जग, चराचर. ६. चालन करणारें सत्तारूप तत्त्व. ७. अन्य आश्रयरहित, शून्य. ८. ज्ञानकळा, जीवात्मा. ९. नेत्रांविषयीं सूक्ष्म विचार करावा. १०. डोळ्यांच्या आंतून पाहणारा (द्रष्टेपणा) घ्यावा. ११. डोळ्यांस दृश्यपण=पाहण्याचा धर्म जेथून उत्पन्न झाला. १२. अभ्यासाचें=योगाभ्यासाचें. १३. नुसत्या ब्रह्मज्ञानाच्या कोरड्या गोष्टी ऐकून काय उपयोग? १४. परब्रह्मीं. १५. इंद्रियाचें शमन करणें. (राजयोग, शम.)

**विकारोपशमः कार्यः सर्वद्रष्टुश्च चिंतनम् ।**
**निमिषोन्मिषसंबद्धो ध्यायेच्च सर्वसाक्षिणम्. ॥ १३ ॥**

विकाराचें उपशमन । सर्व द्रष्टयाचें चिंतन । सहजें अनुसंधान । राखावें तें. ॥ ११४ ॥ जो अंतराचे ठायीं साक्ष । भगवान् जो कां अलक्ष । जयालागीं मुमुक्ष । नित्य ध्याती[1]. ॥ ११५ ॥ वेद ज्याचे बंदीजन[2] । ज्याचे आज्ञें वर्ततें जन । जया स्मरतां सज्जन । सुखी झाले. ॥ ११६ ॥ अदृश्य जो कां अतीत । देहीं असोनि देहातीत । दीनानाथ पतीत- । पावन जो कां. ॥ ११७ ॥ तो आपणचि ऐसें व्हावें । आत्मप्रतीति जरि यावें । तरि प्रयाण पैं करावें । ब्रह्मरंध्रीं. ॥ ११८ ॥

**प्राणापानसमायुक्तं ब्रह्मरंध्रं च कारयेत् ।**
**त्रिवेणीसंगमस्तत्र स्नानं तद्योगधारणम्. ॥ १४ ॥**

ब्रह्मरंध्राचिये[3] ठायीं । स्थीर होणें जें कांहीं । तेथ प्राणापान पाहीं । समान होणें. ॥ ११९ ॥ जेथ त्रिवेणीचा[4] संगम । तेथें स्नान करावें उत्तम । प्रक्षाळिले मनोधर्म । मलीन कीं तेथ. ॥ १२० ॥ मनापासोनि सर्व घडे । पापपुण्य पैं जोडे । तें आधवेंचि पैं मोडे । जया तीर्थीं. ॥ १२१ ॥ संकल्प विकल्प जळप । निर्धूत होय वाग्जल्प । क्षणेक अज्ञान अल्प । निघे तेथें. ॥ १२२ ॥ बहुतां जन्मांचा मळ । बुद्धि आंगीं होतां प्रबळ । तो प्रत्याहार[5] तीर्थीं निर्मळ । होऊनि ठेला. ॥ १२३ ॥

**पिंगलेडा सुषुम्ना च तीर्थं तासां तु संगमः ।**
**तत्र स्नानं पवित्रं तु विशुद्धं योगसाधनम्. ॥ १५ ॥**

इडा नाडी पैं यमुना । पिंगळा भागीरथी स्नाना । आंत सरस्वती[6] संभावना । गुप्त पैं ते. ॥ १२४ ॥ ऐसिये त्रिवेणीमाजी । ज्यासि स्नान घडे पैं सहजीं । तोचि एक नांवाजी । 'अर्थाअर्थी.'[7] ॥ १२५॥ जयापासूनि सकलार्थ । म्हणोनि म्हणणें अर्थाअर्थ । तया आकळी तोचि समर्थ[8] । योगी म्हणों.

---

१. ध्यान करून सेवितात. २. स्तुतिपाठक. ३. ब्रह्मरंध्र=दहावें द्वार–नरदेहांतील तालुस्थान. ४. त्रिवेणीचें स्नान=नरदेहांतील 'डावी धमनी इडा ही यमुना,' 'उजवी पिंगळा ही भागीरथी,' 'मध्य नाडी सुषुम्ना ही सरस्वति,' या तिहींचा संगम, राजयोग शमाचे साह्यानें एकत्र करणें. ५. प्रत्याहार=इंद्रियांची अंतर्मुखता. ६. सरस्वती नदी गुप्त आहे अशी प्रसिद्धि आहे. ७. या प्रकारची सिद्धि ज्याला होते तोच एक 'अर्थार्थी' या नांवानें नांवाजला जातो. ८. पकडी, संपादी.

॥ १२६ ॥ ऐसी 'योगधारणा पैं शुद्ध । जाणों आली प्रसिद्ध । अभ्यास सरलिया '**सिद्ध**' । म्हणणें त्यातें. ॥१२७॥ पवनवारू वैळंघला । आणि गैगनामाजीं पैं उडाला । मैहाशून्यीं बुडाला । न निघे वरी. ॥ १२८ ॥ तिन्ही बंध पैं तोडुनि । सैाही चक्रें ओलांडुनि । मग स्थिरावला स्थानीं । तया त्रिकुटाचिया. ॥ १२९ ॥

**त्रिकुटश्रीहाटगोल्हाटौटपीठालिगुंफास्तु ।**
**मार्गेणानेन खे चेतः समाधौ योगधारणे. ॥ १६ ॥**

तिहीं संधींवरी त्रिकुट । वरी रसनें उंची श्रीहाट । नेत्रांचें मूळ गोल्हाट । ठाकणें तेथें. ॥ १३० ॥ वायुमंडळ औटपीठ । आकाशीं भ्रमर गुंफा घुमट । योगियां निघावें लागे नीट । तेथवरी. ॥ १३१ ॥ हें केलियावांचूनि मन । गगनीं न करीच गमन । दृश्य पदार्थ अनुसंधान । राखोनि बैसे. ॥ १३२ ॥ मग तेथोनि सांगे ब्रह्मज्ञान । ऐकोनि संतांचें वचन । उगीच हालवी मान । जाणता म्हणोनि. ॥ १३३ ॥ तें मैंदांचें गोंसावीपण । ठाकठीकचि दिसे

१. राजयोगाची धारणा. २. घोडा. ३. सज्ज झाला, चढला. ४. गगन=महदाकाश. ५. परब्रह्मस्वरूपामध्यें, आनंदमयकोशाचे ठायीं. ६. योगशास्त्रोक्त तीन बंधः—१ मूलबंध, २ ओढियानबंध, ३ जालंधरबंध. ७. साही चक्रें वोलांडुनि=योगशास्त्रोक्त सहा चक्रें:— १ मूलाधारचक्र, चतुर्दल—गुदस्थान, २ स्वाधिष्ठानचक्र, षट्दल—लिंगस्थान, ३ मणिपुरचक्र, दशदल—नाभिस्थान, ४ अनुहतचक्र, द्वादशदल—हृदयस्थान, ५ विशुद्धचक्र, षोडशदल—कंठस्थान, ६ अग्निचक्र, भ्रकुटिस्थान (भ्रकुटिमध्यस्थ द्विदल—दोन पानांचें चक्र). कोणी कोणी ज्ञानचक्र—भ्रूस्थान हें सहावें चक्र समजतात. ८. त्रिकुट=१ स्थूलदेह हें त्रिकुट ललहाट, २ सूक्ष्मदेह—श्रीहाट, ३ कारणदेह—गोल्हाट, ४ महाकारण—औटपीठ, ५ बिंदु—चैतन्य, ६ चक्रबिंदुवा आंत भ्रमरगुंफा=गुहा आंत—चिद्धन; (आधारे लिंगनाभौ प्रकटितहृदये तालुमूले ललाटे द्वे पत्रे षोडशारे द्विदशदशदले द्वादशार्धे चतुष्के । वासांते बालमध्ये डफकटसहिते कंठदेशे स्वराणां हं क्षं तत्वार्थयुक्तं सकलदलगतं योगमार्गे प्रसिद्धम् ॥ १ ॥ अजपा नाम गायत्री योगिनां मोक्षदायिनी । तस्य संकल्पमात्रेण जीवन्मुक्तो भवेन्नरः ॥) (दासबोधग्रंथांत रामदासांची उक्तिः—'एकवीस सहस्र सहाशें जपा । नेमूनि गेली ते अजपा । विचार पाहतां सोपा । सकळ कांहीं ॥ १ ॥ एकांतीं मौन धरूनि बैसावें । तेथें हें समजोनि पहावें । अखंड घ्यावें सोडावें । प्रभंजनासि ॥ ६ ॥ एकांतीं मौन धरूनि बैसे । सावध पाहतां कैसें भासे । सोहं सोहं ऐसे । शब्द होती ॥ ७ ॥ ते शब्द सांडूनि बैसला । तो मौनी म्हणावा भला । योगाभ्यासाचा गलबला । या कारणें ॥ ९ ॥ धरितां सोहं टाकितां अहं । अखंड चाले सोहं सोहं । याचा विचार पाहतां बहु । विस्तारला ॥ ११ ॥' दासबोध—दशक १७ समास ६ अजपानिरूपण). ९. मैंद=फांसेगार.

जाण ।.जंव मिळालें नाहीं रान । मान कापूं. ॥ १३४ ॥ कीं व्यभिचारिणीचें लालन । केवळचि पतिव्रतापण । जेथ नाहीं कारण । तेथ दावी. ॥ १३५ ॥ तेंवी देहबुद्धि असलिया तेथ । कधींच न लाभे परमार्थ । दृष्टीस पडलिया विषय स्वार्थ । तेथ ओढे. ॥ १३६ ॥ व्यतिरेका पडलिया बळ । मग देहबुद्धि पडे निर्बळ । अन्वयें पाहतां सृष्टिखेळ । दिसे न दिसे. ॥ १३७ ॥

**व्यतिरेकान्वयाभ्यां च दृश्यं च ब्रह्मरूपकम् ।**
**कर्णनयनयोरैक्यमज्ञेयं सर्वगतं हि तत् ॥ १७ ॥**

व्यतिरेकज्ञान होतां पूर्ण । ब्रह्मचि दिसे पाहिला वर्ण । तेथ शरीरादिक आवरण[1] । न दिसे दिठीं. ॥ १३८ ॥ आघवेंचि भासे ब्रह्मरूप । सर्वीं उजळला चैतन्यदीप[2] । मग भेदाचें[3] माप । कैसेनि भरे? ॥ १३९ ॥ सर्वांसि झोंबला हुताशन[4] । अवघियांचें करी निरसन, । दाहका करी दहन । ऐसें काय आहे? ॥ १४० ॥ उदक सर्वांसिच धूतें । उदका कोण धूत मागुतें । तेंवी चैतन्य चेष्टवी[5] सर्वांतें । कवण चाळवी तयासि? ॥ १४१ ॥ तैसा निर्जबोध[6] झाला पूर्ण । जया नाहीं व्यक्तिवर्ण । जेथ नयन आणि कर्ण । ऐक्य झाले. ॥ १४२ ॥ एवं सर्व मतीची मति । लाधली जेथ उत्तमगति । तेथ सहज आली शांति । ठाकोनियां. ॥ १४३ ॥

**वासनाक्लिष्टहेतुत्वाद्व्यतिरेकावृता ननु ।**
**बुद्धिः संकल्पयुक्ता च विक्षेपान्वयसंयुता. ॥ १८ ॥**

अन्वयज्ञानामाझारी[7] । विक्षेप असे अवधारी । पूर्वकर्में देहधारी । झाला जीव. ॥ १४४ ॥ जेथ पुण्यपापमिश्रित । तेणेंचि सुखदुःखें प्राप्त । विषयसुखें गर्व होत । तत्क्षणीं पैं. ॥ १४५ ॥ कीं पापाचीं फळें प्राप्त होती । तेथें सकळ

---

१. आवरण=अज्ञान. [याचें उदाहरणः—कल्पना करा कीं कोणी दहा असामी मिळून नदी उतरून जात आहेत. नदी उतरल्यानंतर आपण सुरक्षित आलों कीं नाहीं हें पाहण्यासाठीं त्यांतील एक मनुष्य सर्वांस मोजून पाहतो. तो आपली गणना न करितां बाकीच्यांस मात्र मोजल्यामुळें प्रत्यक्ष आपल्या पुढें नऊ असामी पाहत असून आपण दहावा हें जाणत नाहीं. हें त्याचें अज्ञान झालें. 'दहावा आपण असून दहावा नाहीं आणि दिसत नाहीं असें मानतो हें अज्ञानकृत आवरण झालें. सार्थपंचदशी—पृष्ठ ९१.) २. ज्ञानदीप. ३. अपरोक्षानुभव झाल्यामुळें 'मी कर्ता,' 'मी भोक्ता,' अशा भ्रांतीपासून होणारा ताप निर्मूळ होऊन निरंकुशतृप्ति झाल्यावर, भेदाचें माप (कामक्रोधादि भेद करणारे षड्रिपु यांचें) कसें भरेल? ४. अग्नि. ५. वर्तवी, चाळवी, चेतवी. ६. आत्मबोध. ७. अन्वयज्ञानामध्यें.

दु:खें एकदांच येती । तेव्हां तेचि खंती[1] । करीत बैसे. ॥ १४६ ॥ मग व्यतिरेकाला विसरे । अन्वयाची गांठी निसरे[2] । आणि मी ब्रह्म म्हणणें तें विसरे । म्हणे मी पापी. ॥ १४७ ॥ पूर्वजन्मीं सुकृत[3] केलें । त्याचें फल प्राप्त झालें । ऐसें ज्ञान मार्तंडा[4] आच्छादिलें । अज्ञानभ्रमें. ॥ १४८ ॥ कीं पाहतां संसारहाट[5] । वस्तु देखिलिया बरवट । तेथ रिघे तें खोंपट[6] । न सोडी कदां. ॥ १४९ ॥ भ्रमर पाहूं गेला तळें । अवचित देखोनि कमळें । मग केशराचिया[7] खोळे । गुंतोनि पडे ॥ १५० ॥ दीप लाविला प्रकाशासाठीं । तेथ सहज काजळी कोंदाटी । तेंवी आकारें वर्ततां दाटी । विकारांची. ॥ १५१ ॥ नग[8] हे कनका[9]चेच पाहीं । परी नगीं कनकाचें नाम नाहीं । कीं घट दृष्टीं देखतां ही । न दिसे माती. ॥ १५२ ॥ ना तरी पटचि दृष्टीं भरे । तेथ देखतचि तंतु विसरे । तेंवी आकाराचेनि भरें । न स्मरे वस्तु. ॥ १५३ ॥

**मृत्युलोके यदुत्पन्नं सर्वं तन्नाशवत्तथा ।**
**शाश्वतं मन्यते बुद्धिस्तदप्रज्ञानलक्षणम्.** ॥ १९ ॥

मृत्युलोकामाजीं आपण । जें जें होय निर्माण । तें तें नाश पावे जाण । ते ते काळीं. ॥ १५४ ॥ तें शाश्वताप्रमाणें दिसे । तें अज्ञान माने बुद्धिभ्रंशें । काय मृगजलांशें । रोंप येती ? ॥ १५५ ॥ स्वप्नीं देखिलें धन पैं गा ! । तें जागृतीं केंवि ये उपयोगा ? । कीं मानसिक वनिता[10] भोगा[11] । मिळे कैसी ? ॥ १५६ ॥ तैसें नामरूप उघडलें । पंचभूतांचेचि घडलें । तये चोंडीस[12] अडलें । अज्ञान तें पैं. ॥ १५७ ॥ प्रपंच अज्ञानें सत्य केला । अन्यथाज्ञानें ओंव्हानिला[13] । देहबुद्धीनें[14] विसर्जिला । होता तेथें. ॥ १५८ ॥ केवल जातीचा अज्ञान । देखीं न होय सज्ञान । आरंभितो ब्रह्मज्ञान । सिकाव जें कां. ॥ १५९ ॥

**शब्दज्ञानयुतोऽयं च प्रशस्यो बहुभिर्जनैः ।**
**निश्चयो नास्ति तत्वे तु वृथा तस्य प्रवर्तनम्.** ॥ २० ॥

प्रशंसेची आशा । शब्दज्ञानांत अशेषा । प्रवीण होय भलतसा । अनधिकारी. ॥ १६० ॥ द्वेषबुद्धीनें भरियेला । मलिनत्व आघवें पांघुरला । मग

---

१. दु:ख. २. सुटे. ३. पुण्य. ४. ज्ञानरूपी सूर्य. ५. बाजार. ६. जागा, स्थान, झोंपडी. ७. केशर=कमलपराग. ८. अलंकार. ९. सोन्याचे. १०. मनानें कल्पिलेली स्त्री. ११. उपभोगास. १२. चाडी=मोहास, लोभास गुंतणें. १३. सत्कारपूर्वक बोलावून आणला. १४. देहबुद्धीनें विसर्जिला=जेथें मूळ अविद्येंत होता तेथेंच टाकून दिला.

संतांची करावया आला । बरोबरी. ॥ १६१ ॥ संशयाचीं कुष्मांडें । उचलीतसे पाखांडें । अमोलाचिया तोंडें । बहुत बोले. ॥ १६२ ॥ ऐसियाचें दर्शन। घेणें या कवण प्रयोजन? । तयासि पैं संभाषण। करूं नये. ॥ १६३ ॥ निश्चया विरहित बोलणें । संशयात्मक जें ऐकणें । तयाहुनी साधूचें कां न घेणें । दर्शन हें पैं ॥ १६४ ॥

**देहात्मबुद्धिरेवास्य पाखंडवादवर्तकः ।**
**नास्तिक्यो विषयानंदी सद्दर्शनपराङ्मुखः ॥ २१ ॥**

मुखें पाखांड बोले कैसें । तें तूं पैं परियसें । देव कोठें असे । 'नाहीं' म्हणे. ॥ १६५ ॥ देहचि आत्मा प्रतिपादी । विषयानंदच म्हणे अनादी । आणि मरण मुक्ती साधी । अनायासें. ॥ १६६ ॥ देह गेलिया कैंचें कर्म । आणि कवणासि दंडी यमधर्म । ऐसें वितंडवर्म । बोलोनि दावी. ॥ १६७ ॥ आपणासही म्हणवी संत। संतांत काय असे बहुत । ऐसें बहकतो वितंडमत । स्वयें बुद्धी. ॥ १६८ ॥ आत्मप्रतीति शास्त्रप्रतीति । वीण तयाचि व्युत्पत्ति । नाहीं आनंदाची प्राप्ति । तया शब्दें. ॥ १६९. ॥ आकारीं लुब्ध आहे । निराकारा निंदिताहे । निश्चयाची सोये। न लभे तया. ॥ १७० ॥ ऐसियाचें दर्शन । झालिया करावें ईश्वरस्मरण । आतां त्या साधुदर्शनाचें लक्षण । ऐक कैसें. ॥ १७१ ॥

**साधूनां दर्शनं पुण्यं वैराग्यलाभदं शुभम् ।**
**तेषां च भाषणं शुद्धमानंददायकं खलु ॥ २२ ॥**

साधुदर्शनाची महिमा । ऐक सांगतों निरुपमा । दर्शनेंचि प्रेमा । उपजणें आधीं, ॥ १७२ ॥ समागमें परम लाभ । वैराग्य उपजे स्वयंभ । भाषणें नुपजे क्षोभ । मानसीं पैं. ॥ १७३ ॥ परि तें अधिकारावांचुनि कांहीं । अनधिकारिया येत नाहीं । कवणियेपरि पाहीं। ऐक तें पैं. ॥ १७४ ॥ उत्तम स्वरें नागसरी । तेथ नागचि पैं फणा करी । तेथ इतर सर्प अनधिकारी । जाण पैं गा! ॥ १७५ ॥ कीं नवघनाचिया घोषें । मयूरचि आनंदें नाचतसे । प्रेम उपजेल कैसें । वायसा तेथें? ॥ १७६ ॥ म्हणोनि साधकां साधूची संगति । होतां पावती ब्रह्मप्राप्ति । स्वयंप्रकाश अंतरदीप्ति । प्रकाश होय. ॥ १७७ ॥

---

१. कुतर्क, कुभांड. २. नास्तिक वाद. ३. फुकटच्या. ४. शिक्षा करी. ५. ज्याला उपमा नाहीं असा, उपमारहित. ६. वाद्यविशेष, पांवा. ७. मह्यां रौतीति मयूरः. ८. कावळ्याला.

**सर्वलिंगाद्विभिन्नं च संतचिन्हं न लुप्यते ।**
**तेजोमयं प्रदीप्तं च समानसाधितं मनः ॥ २३ ॥**

सर्वांमाजी देखतां नयनीं । वेगळेचि दिसती संत चिन्हीं । तेजोमय वैराग्य वन्ही । प्रदीप्त तैसे ॥ १७८ ॥ दाविलियाही विषय आशा । [1]वीतराग न लोपे सहसा । जेंवी अनेक दाविलिया वेषा । न भुले नट. ॥ १७९ ॥ अभ्राची आली काळिमा । तरी नभाची न [2]खेते निळिमा । तेंवि [3]अविस्मृति इंद्रियग्रामा । माजी नसे ॥ १८० ॥ सर्व जीवा आंत ही असे । जो गुण जयामाजीं वसे । तो मुखकमळीं प्रकाशे । आपेंचि पैं. ॥ १८१ ॥ विधवेनें शृंगार केला । तो चेहराचि पैं कळों आला । [4]पतिव्रतेनें टिळाचि लाविला । कुंकुवाचा. ॥ १८२ ॥ तेंवि अज्ञान झोंबलें मनाला । आणि ज्ञान सांगतो जनाला । तो [5]नूरचि वदनाला । [6]शायदी होय॥१८३॥ भूचर बहुत बळें उडे । तो भूमिचवरी कीं पडे । खेचर गगनावरी चढे । तो स्वइच्छें उतरे. ॥१८४॥ तेंवि अज्ञानि बोले ज्ञानगोष्टी । परि सुटेना स्थूल दृष्टी । तेथ अज्ञानपणाची पुष्टि । बोलीं दिसे. ॥ १८५ ॥ [7]समान साधुनी बुद्धि । लागली आहे समाधि । शिकविलियाही कुबुद्धि । न धरे मनीं. ॥ १८६ ॥ तो स्वसुख स्वहितीं सावध । प्रपंचाचा न करी [8]वेध । जया अभ्यासा [9]आवध । उरेचि ना. ॥ १८७ ॥

**सावधानः सदानंदे नित्यतृप्तो निराश्रयः ।**
**व्याप्यव्यापकशून्यश्च साधुश्चात्र तु दुर्लभः ॥ २४ ॥**

सदानंद [10]अक्षयपदा । सावध आहे पैं सदां । [11]तारुण्य चढलिया मदा । मन्मथचि दिसे. ॥ १८८ ॥ निराश्रयीं तृप्त होय । निराकारीं राहत आहे । पाहणें हरोनि पाहे । पाहात्यासी. ॥ १८९ ॥ [12]व्याप्य [13]व्यापातीत । ब्रह्मरूप आहे पैं सतत । तेंवी [14]घटमठाविरहित । [15]महदंबर. ॥ १९० ॥ [16]शून्यत्व हारविलें [17]महा-

---

१. विषयवैराग्य, विषयपराङ्मुखता. २. मलीन होत नाहीं. ३. इंद्रियांच्या समुदायास आपल्या कर्तव्याचा विसर पडत नाहीं. ४. सभर्तृकेनें. ५. चेहरा. ६. पुरावा करणारा साक्षी. हा शब्द कोंकणांत प्रचारांत आहे. ७. समान–पांच वायूंपैकीं एक वायु. ८. छंद. ९. काल, वेळ. १०. सत्+आनंद अ+क्षय=अविनाश ब्रह्मपदाविषयीं. ११. तारुण्यानें माजलेल्यास जसा सर्वत्र मन्मथ=कामच दिसतो तद्वत् जो अक्षयपदाला पोंचला त्याला सर्वत्र ब्रह्मस्वरूपताच दिसते. १२. जगतास व्यापून असणारें तत्व. १३. जगाचे वडामोडींपासून निराळें. १४. घटमठ=घटाकार (मायामय जग). १५. महत्+अंबर=आकाश=महदाकाश. १६. चैतन्य. १७. महाशून्य=निर्विकल्प असें अधिष्ठानरूप ब्रह्म.

शून्यीं । मौन्य[1] स्थिरावलें मौन्यीं[2] । चेतना राहिली चैतन्यीं । होऊनि एक. ॥ १९१ ॥ ऐसा पुरुष पैं दुर्लभ । जया लाभला ब्रह्मलाभ । जया लागला लोभ । नैराश्याचा[3]. ॥ १९२ ॥ जगनगीं चिंत्कनक[4] । जेंवी सागरीं तरंग एक । कीं प्रकाश आणि मैयक[5] । एकचि जेंवी. ॥ १९३ ॥ ऐसें अन्वयें पैं केलें । सर्व ब्रह्म दृष्टीसि आलें । जेथलें देखणें सामावलें । तेथेंचि कीं. ॥ १९४ ॥

**हंसो यथांबुमध्याच्च क्षीरं पिबति नित्यशः ।**

**तथा साधुरसन्मध्याच्च सद्गृण्हाति सर्वदा. ॥ २५ ॥**

राजहंसाचा स्वभाव । क्षीरनीराचा करी निर्वाह । तेंवी मायेमाजी स्वयमेव । निवडणें जें. ॥ १९५ ॥ आकाशाची सालडी[6] । काढूनि घेइजे आंतुली गोडी । अन्वय ज्ञानाची परवडी[7] । जाण ऐसी. ॥ १९६ ॥ अनेक बुद्बुद[8] पैं झाले । तरि तोयेंचि[9] सर्वां[10] व्यापिलें । तैसें ब्रह्मत्व आंतलें[11] । व्यक्तिमाजि[12] ॥ १९७ ॥ शून्यामाजि सर्व झालें । शून्येंचि सर्वां व्यापिलें । तैसें ब्रह्मत्व आथिलें[13] । व्यक्तिमाजि. ॥ १९८ ॥ शून्यामध्यें सर्व झालें । शून्येंचि सर्वां व्यापिलें । शून्याचें शून्य राहिलें । निर्दोनीं[14] पैं. ॥ १९९ ॥ शून्यींच जाहला जन्म । शून्येंच सकळ लाविलें कर्म । शून्येंचि जाणवलें वर्म । वेगळावया ॥ २०० ॥ म्हणूनी शून्याहुनी कांहीं । समाधान आन नाहीं । ऐसें वर्म पडियले ठायीं । अन्वयज्ञानें. ॥ २०१ ॥

**पटे तंतुर्घटे मृत्तद्वद्ब्रह्मत्वं च दर्शने ।**

**एवं ज्ञात्वा तथा सोऽहं ब्रह्मास्मीति सुनिश्चितः ॥ २६ ॥**

घटीं मृत्तिका[15] पाहे । वस्त्र पाहतां तंतु आहे । आकारीं व्यापूनि राहे ।

---

१. समाधि. २. निर्विकल्प ब्रह्माचे ठायीं. ३. निराशपणाचा, वैराग्याचा. ४. ब्रह्म हेंच कनक=सोनें. ५. चंद्र. ६. अभ्रपटल. ७. रीति, प्रकार. ८. पाण्याचे बुडबुडे. ९. पाण्यानेंच. १०. त्या सर्व बुद्बुदांस. ११. दडपलें गेलें. १२. विश्वकोटींतील देव, मनुष्य, पशु, पक्षि इत्यादि सर्व व्यक्तींमध्यें. १३. मुख्य, संपन्न, समर्थ झालें. १४. शेवटीं. १५. घटामध्यें मातीच पाहतो. याविषयीं **रा**मदासांचा प्रश्न आणि **रं**गनाथांचें उत्तर असें एक पद आहे तें असें:—'सखया सज्जना अंतरींच्या सांगें गोष्टी । बहुत भाग्यें जाहली तुझी भेटी ॥ ध्रु० ॥ भेटलासी तूं जिवलग गडी । माझ्या जिविंची पुरवीं बा! तूं आवडी । बोल कांहीं स्वरूप परवडी । जेणें नाश पावती संशय कोटी ॥ स० ॥ १ ॥ विश्वीं **राम**? कीं विश्व असे **रामीं**? । जाहाल्या प्रतीति वर्तणें केंवि कर्मीं । वर्ते प्रारब्ध तयासि

ब्रह्म तैसें. ॥ २०२ ॥ तें ब्रह्म मीच कीं ऐसी । प्रतीति असे जयापाशीं । तयाची आज्ञांकित दासी । अविद्या हे. ॥ २०३ ॥ मनुष्याकारणें बरवटी । शोभा आणिली पटीं । भुलविलें म्हणोनि दिठी । तंतू न जाय. ॥ २०४ ॥ घटही बहुत काजा येती । यास्तव घटीं उपजे प्रीति । तयांचें मूळ मुद्दल माती । दृष्टी नये. ॥ २०५ ॥ तेंविच कीं हें देह । सर्व भोगांचें गेहं[1] । मूळ परमात्मा विदेह । न स्मरे कोणी ॥ २०६ ॥ जीवांचें मूळ निराकार । निर्गुण हें निर्विकार । तेथ वासनेचा पसाराचार[2] । न मांडे[3] पैं. ॥ २०७ ॥ निर्माण करितो ईश्वर । आणि जीवाचा या संसार । तयासि पाहतां अंतर । उदंड पैं. ॥२०८॥

**दूरस्थात्तपनादूर्व्यां मृगनीरसमुद्भवः ।**
**उत्पत्तिर्जगतस्तद्वन्नित्याच्च शाश्वतान्नु. ॥ २७ ॥**

सूर्याचें स्थान पैं दुरी । मृगजळ भासे मैंळावरि[4] । विश्वास भासे तयापरि । ईश्वरसत्तें. ॥ २०९ ॥ तया भुलोनि धांवती मृगें । मनुष्य म्हणे जल वाउगें । पशु मनुष्य दोघे । पाहाती तया. ॥ २१० ॥ तेंवी ज्ञानी आणि अज्ञानी । जन्म पावती मनुष्ययोनि । सज्ञान मिथ्या ऐसें मानी । सत्य वाटे अज्ञानिया ॥२११॥ तैसा पूर्वसंस्कारें[5] घडे । ज्ञानियाहि संसार पडे । तो अलिप्तपणें सरतो कडे ।

---

कोण नेमीं । जीव शिव एक कीं दोन नामीं ॥ स० ॥ २ ॥ बोलीं तोषला बोलतां संवगडा । तूं तंव जाणता पुससी लोकचाडा । सावध होऊनि परियसीं पद झाडा । भला जोडला आजिबा साधु जोडा ॥ स० ॥ ३ ॥ सखया! सज्जना! अनुभवीं मुळिंच्या खुणा । जाणणें त्यजुनि समूळ जाणपणा ॥ ध्रु० ॥ घटीं मृत्तिका मृत्तिकेंत घट नाहीं । पटीं पाहतां तंतुचि सर्वदाहि । हेम अलंकारीं तें बुद्धि भेद नाहीं । तैसें विश्वीं रामरूप एक पाहीं ॥ स० अ० ॥४॥ कर्मीं वर्ततां साहजिक संस्कारें । कदा न शिणे कर्तव्य भोग भारें । ब्रह्मीं हुत करी ब्रह्मार्पण द्वारें । कर्ता कर्म कार्य जाण एकसरें ॥ स० अ० ॥ ५ ॥ ज्ञानकाळीं संचित दग्ध झालें । अहं त्यागें क्रियमाण सर्व गेलें । वर्तें प्रारब्ध निश्चया जना आलें । कर्मीं वर्ते त्रिविध बोध बळें ॥ स० अ० ॥ ६ ॥ जेंवि आकाश लघुत्व घटाकाशीं । मठीं अनेक प्रकारें पाहे त्यासि । जीव शिव एकचि ज्ञानराशी । भेद नाहीं जीव शिव निश्चयेंशीं ॥ स० अ० ॥ ७ ॥ संवादीं या दोघांचें पुरलें कोड । प्रीति नावरे बोलतां गोड गोड । ब्रह्मवेत्त्या ब्रह्मयाची नाहीं चाड । अन्य दीपाची दीपासि नाहिं चाड ॥ स० अ० ॥ ८ ॥ ऐसें अंतरा अंतर एक झालें । तेथें सांगतां ऐकतां एक ठेले । दोघां दोनपण समुळीं हारपलें । निजानंदीं रंगलेपणहि गेलें ॥ स० अ० ॥ ९ ॥

१. घर. २. पसारा, राहटी. ३. मांडला जात नाहीं. ४. मैदानावर. ५. पूर्वसंस्कारें=प्राक्तन योग. (याविषयीं रंगनाथांनीं एका पदांत सिद्धांत केला आहे. त्या पदाचा आरंभ असा आहे:—'संतां प्राक्तन कर्म जडे । परि तो भोग तयां न घडे॥'.

लिप्त तो पडे गळपाशीं. ॥ २१२ ॥ ज्ञानिया दिसे 'मी' यांत नसें । अज्ञानिया गुंतलोंसे दिसे । अज्ञान पावला जीवदशे । सज्ञान बैसे स्वानंदीं. ॥ २१३ ॥ तया दिसे ब्रह्म अविनाश । कवणासीच नाहीं नाश । आणि कवण येथें जन्मास । आलाचि नाहीं. ॥ २१४ ॥

**तरंगः पवनोद्भूतः स विरामे विनश्यति[1] ।**
**वायोस्तु तत्समं विश्वमुत्पन्नं च निरंजनात्. ॥ २८ ॥**

क्षणेक उठला पवन । तेथ तरंगा होय आगमन । तरी तेथ आलें जनन । कोणासि पैं. ॥ २१५ ॥ तयापरी विश्व उत्पन्न । झालें दिसे वृथामान । मग पवन ठेलिया जारण । नीरींचें नीर. ॥ २१६ ॥ तेंवी महासमुद्र निराकारीं । संकल्प वायु एकसरीं । वायुवेगेंचि चराचरीं । दाविलें रूप. ॥ २१७ ॥ तेथ गुरुकृपेचिया गगनीं । संकल्प वायु हारपोनि । गेलिया मग सपाटूनि । तरंग जाती. ॥ २१८ ॥ प्रथम आहे पैं उदक । उठले तरंग तरि तेंचि एक । शेवटीं एकाचे एक । तेंचि आहे. ॥ २१९ ॥ तेंवी अनादि भूमिका नीट । वरी विचित्र माया नटली नट । मग चरित्र सरलिया शेवट । तेंचि आहे. ॥२२०॥

**स्फुरणं त्वनिलस्यैव जन्मस्थैर्यं च मृत्युता ।**
**एवं गतागतानां च प्राणिनां सहजा स्थितिः ॥ २९ ॥**

शरिरीं वायुची चेष्टा उठे । तेथ जन्म झाला ऐसें वाटे । जेथिली चेष्टा तेथ आटे । तेथ मृत्यु दिसे. ॥ २२१ ॥ तैसे जन्मासि जे आले । अथवा देह त्यागूनि पैं गेले । ते जगींच कीं भासले । मग ऐसें. ॥ २२२ ॥ जन्म झाला सत्यचि दिसे । तरी मरणहि वाटेल तैसें । यया म्हणावें अज्ञान ऐसें । मूर्तिमंत ॥ २२३ ॥ मोहावलेनि मनोधर्में । साच वाटती जन्मकर्में । गुरुमुखींचीं जंव वर्में । जाणीतलीं नाहीं. ॥ २२४ ॥ जेणें संसरिलेनि[2] चित्तें । सत्यचि दिसती कलत्र[3] वित्तें । मग कवण एक निमित्तें । दुःखी होय.॥२२५॥ तेथ ईश्वर वेगळा कळेल । तेव्हां मोहचि आघवा गळेल । ज्ञानाग्नीनें जळेल । तत्क्षणीं ॥ २२६ ॥ मग त्रिभुवन वनाचा वसंत । तैसाचि दिसेल भगवंत । अपरिच्छिन्न हेत । प्रकृतीस[4] पैं. ॥ २२७ ॥

**पत्रपुष्पफलानां च वृद्धिर्भवति माधवे ।**
**तद्वन्नित्यस्य सत्तायां जायते च चराचरम्. ॥ ३० ॥**

---

१. लय, शेवट. २. अंतःकरण संसारांत गुंग झाल्यामुळें. ३. बायको. ४. मूळमाया.

वसंताचेनि योगें। वृक्षासि फुटती दांगे[1] । मग पुष्प फल रंगे । वनश्री[2] शोभे. ॥ २२८ ॥ जयाचें सत्य[3] एवढें दिसे। परि तें सत्तारूप न दिसे। तेंवि भगवत्सत्ता वशें। जग हें होय. ॥ २२९ ॥ सकल विश्व हें झालें । परि हातें नसे घडविलें। सहज परस्परें आलें। नामरूपा. ॥ २३० ॥ लत्तादूरस्थ संनिधानें। प्रकृतीचेनि महिमानें । चारीहि खाणींत सोनें । विस्तारलेंचि पैं ॥ २३१ ॥ जीव जंतु अलंकार। पृथ्वी केला पैं शृंगार । जियेतें पाहूनियां ईश्वर। संतुष्ट होय. ॥ २३२ ॥

**चुंबकस्य तु सांनिध्याद्यथा लोहं सचेतनम् ।**

**तथा नित्यादनित्यं च रव्युदयाद्यथो फलम्. ॥ ३१ ॥**

चुंबकाचें संनिधान। जेंवी लोह करी सचेतन,[4] । कीं कमळांचें विकाशन। सूर्योदयीं. ॥ २३३ ॥ तेंविच पैं दुरिचे दुरी । नसोनि असलिया शरिरीं। ईश्वर सत्ता विकारीं। संचार करी. ॥ २३४ ॥ असोनियां सूक्ष्म। जेथें नोळखति इंद्रियधर्म। गुरुगम्याचें[5] वर्म। ऐसें असे ॥ २३५ ॥ अनादीचें निरुपम परब्रह्म। जें अनाम। जेथूनि उभारे काम। सृष्टीचें पैं. ॥ २३६ ॥ आपणचि विरिंचि[6] झाला। विष्णु आपणांमध्यें केला। रुद्र सामर्थ्यें आवंतिला[7]। आपलिया ॥ २३७ ॥ ज्याची सत्ता जगा व्हावी। ते आधींच लागे जाणावी। जाणितल्या ते म्हणावी। ज्ञानकळा. ॥ २३८ ॥

**चंद्रोदयात्समुद्रश्च कुमुदानि तथैव च ।**

**तथैव ब्रह्मसत्ता च दूरस्था च सुखंभवा ॥ ३२ ॥**

आकाशीं उदयतां चंद्र। भरे जेंवी कीं तो समुद्र । कीं विकाशा कारण नरेंद्र[8]। कुमुदांसी ॥ २३९ ॥ चकोरां[9] होय तृप्ति । आणि जगाची मोडे संतप्ति[10]। औषधि पोषीत प्राप्ति। पुष्प अथवा फलांचीं. ॥ २४० ॥ तैसें परब्रह्म हें परिपूर्ण। सर्वांचें करी संरक्षण। नाना पदार्थ निर्माण। करिता झाला. ॥ २४१ ॥ ईश्वरें केलें सर्व भोगी। परि त्यातें स्मरेना भवरोगी । आणि ऐशियातें योगी। भेटेल केवीं? ॥ २४२ ॥

---

१. दांगे=नूतन पल्लव. २. वनशोभा. ३. वसंत ऋतु आला कीं वृक्ष, पुष्प, पल्लवयुक्त होऊन नवी वनश्री येतेच एवढें अनुभवास येतें पण तें ज्या सत्तेमुळें घडतें तें दिसत नाहीं—असा भाव. ४. चलनवलनादि व्यापारयुक्त. ५. सद्गुरूपासून अनुभविलेलें. ६. ब्रह्मदेव. ७. बोलाविला. ८. राजा, नरेंद्र. ९. चंद्रकिरणांनीं संतोष पावणारा पक्षी. १०. ताप.

**हुताशने यथा धूम्रो नखानि पाणयोर्यथा ।**
**जगदभ्रं चिदाकाशे तत्र दुःखसुखेन च ॥ ३३ ॥**

तें चिदाकाश सहज आहे । जग हें अभ्रवत् जाय । तेथ एवढीच सोय आहे । विश्वांत या. ॥ २४३ ॥ कीं वैश्वानरीं धूम देखें । कीं, आंगामाजी जैसीं नखें । काढिलियाही परी न दुखे । आंग जैसें ॥ २४४ ॥ तेंवी परमात्म्यापासूनि सकळिक । नासलिया परमात्म्यासि नाहीं दुःख । जेथ नाहीं रूप रेख । काय कैंचें तेथ कीं. ॥ २४५ ॥ अविनाशापासोनि होतें । तरि कैसेनि पैं तें नासतें । आणि आत्मज्ञान मिरवतें । कासयावरी ॥२४६॥ म्हणोनि झालिया गेलियाची । विश्वभ्रांति हे वाउगीचि । खूण बाणलिया निजींची । ऐसें होय. ॥ २४७ ॥

**रज्जौ सर्पस्य भासश्च निद्रायां स्वप्नविभ्रमः ।**
**ब्रह्मणि च जगद्भासश्चासत्यो ज्ञानविभ्रमः ॥ ३४ ॥**

दोरावरी सर्प दिसे । तो विपरीत दृष्टीवशें । निरखुनि पाहातां असे । दोरचि पैं ॥२४८॥ हें रज्जूसि ठावुकें नोहे । पाहातें पाहणें तें कैसें पाहे । आणि आपणचि भिये[1] । सर्प म्हणोनि ॥ २४९ ॥ आपुल्या पराव्या सांगे । सर्प लागला आमुच्या मागें । केवळ पाहातां मनाजोगें । दोरचि ऐसा. ॥ २५० ॥ कीं निद्रेचेनि योगें । स्वप्नीं देखे अनेक सोंगें । वोखटें[2] गोमटें[3] दोघें । भास देखे. ॥ २५१ ॥ उत्तम देखोनि हर्ष मानी । वोखटें देखोनि भिये मनीं । जागृति झालिया मानी । मिथ्या ऐसें ॥ २५२ ॥

**पश्यति चिन्मयं चैव ज्ञप्तिमात्रं प्रकाशकम् ।**
**तदा तु विलयं याति मायामोहः क्षणार्धतः ॥ ३५ ॥**

जागृति येतां चिन्मात्र ध्यानीं । तूर्या[4] पाहात आहे निदानीं । मग क्षणामाजि मिथ्या मानी । माया स्वप्न ॥ २५३ ॥ ज्ञप्ति[5] स्वरूप प्रकाशलें । चित्सूर्यत्व उदया आलें । तेथ सहज देखणें विकासलें । अद्वयाब्ज[6]. ॥ २५४ ॥ ऐसा ज्ञानबोध उत्तम । प्रकट झाला पुरुषोत्तम । मग योगियांतें निजधाम । सुलभ होय. ॥ २५५ ॥ जैसें महाप्रलयाचे समयीं । उदकेंचि व्यापिलें सर्वाठायीं । तेंवी स्वरूपावांचूनि[7] नाहीं । ऐसें झालें ॥ २५६ ॥ जीवत्वासहित

१. भितो. २. वाईट. ३. चांगलें. ४. महाकारण, चौथी अवस्था. ५. ज्ञान. ६. अद्वयकमल=जीवात्म्याचें व ब्रह्याचें ऐक्य. ७. स्वस्वरूपावांचून.

शिवत्व गेलें । लघुत्व जेथें हारपलें । मग काय एक उरलें । कवण जाणे. ॥ २५७ ॥

**आदावंते च यद्ब्रह्म नित्यतृप्तं निरामयम् ।**
**नेति नेति च वेदोक्तं सोऽहं परममव्ययम् ॥ ३६ ॥**

जें आदीअंतीं स्वयंब्रह्म । तें आपणचि आहे उत्तम । मध्यें वाटला संसारभ्रम । वायांचि गेला. ॥ २५८ ॥ नित्य तृप्त निरामय। वर्णितां वेद झाला पैं तन्मय। **'नेति नेति'** होय। जया मुखीं. ॥ २५९ ॥ जेतुलें[1] नामरूपाआलें। तेतुलें निगमें[2] वाखाणिलें । नामरूपातीत उरलें । अनिर्वाच्य[3]. ॥ २६० ॥ जेथ [4]चारी वाचा गुप्त झाल्या । बुद्धीच्या युक्ति कुंठल्या । सर्व ग्रंथी सुटल्या । प्रपंचाच्या. ॥ २६१ ॥ एवं आत्मैक्यबोधाची सिमा । ठकचि[5] पडलें पैं प्रेमा । कांहींच न दिसे नियमां । वाट कीं गा! ॥ २६२ ॥

**सदैवं शाश्वतं स्वस्थं निरालंबं निरंजनम् ।**
**अव्याकृतं निराकर्ण्यं ध्याने च स्तवने शुभम्. ॥ ३७ ॥**

सदैव जें कां शाश्वत । निर्रालंब[6] सदोदित । जें स्वतंत्रपणें स्वच्छ[7] । निरंजन[8]. ॥ २६३ ॥ अप्रतीम अमूर्त[9] । निराकरणा विरहित । दुजिया नकळे मांत[10] । जेथील पैं. ॥ २६४ ॥ जयाचिया स्तवनें कल्याण । मोक्षप्राप्ति होय जाण । जयाचिया स्मरणें सकल स्मरण । हारपे[11] जेथ. ॥ २६५ ॥ जयाचिया ध्यानें सर्व ध्यान । जयाचिया ज्ञानें सर्व ज्ञान । जयाचिया बोधें अज्ञान । नुरेचि पैं तें. ॥ २६६ ॥ ऐसें हें पैं अव्यय । जवळींच असोनि नलगे सोय । तो नरकीं होय । पापात्मा कीं. ॥ २६७ ॥

**सर्वत्रसमचित्तश्च सद्भावः स सनातनः ।**
**नारायणश्च सर्वेषां वत्सलः प्रियदर्शनः ॥ ३८ ॥**

सर्वभूतीं समान चित्त । भूतीं आहे भगवंत । नारायण साक्षभूत । परमेश्वर. ॥ २६८ ॥ जें अनादि पुरातन । योगसुख संपन्न । जयास्तव अन्न । प्राण धारण. ॥ २६९ ॥ जो जो उदर जठरा[12]भीतरी । आहार सेविला पचन

---

१. जेवढें. २. वेदानें. ३. जें वाचेला अवर्ण्य. ४. १ परा २ पश्यति ३ मध्यमा ४ वैखरी. ५. थकित होणें, चकित होणें. ६. निराश्रय. ७. मायेनें गढूळ जाहलेलें नव्हे. ८. मायारहित एकांतस्थान. ९. निराकार ब्रह्म. १०. गोष्ट, सुगावा. ११. नाहींसें होई. १२. पोटांत.

करी। सर्व इंद्रियद्वारीं। चालक जो कां. ॥ २७० ॥ दिव्यरूप दिगंबर। विश्वव्यापक विश्वंभर। जयाचिया आज्ञें श्रीशंकर[1]। संहार करी. ॥ २७१ ॥ ऐसा बोध हा संपूर्ण। येथ देईल जो कर्ण। त्याला न पवे पुनर्वर्ण। कशाचाही. ॥ २७२ ॥

**इति श्रीसिद्धांतसंहितायां सोहिराविरचितायां आर्तजिज्ञास्वर्थार्थिमुमुक्षुलक्षणकथनं नाम चतुर्थोऽध्यायः संपूर्णः ॥**

---

## अध्याय पांचवा.

**जंतुप्रकारभिन्नश्च प्रेमभावश्च जायते।**
**पूर्वार्जितेन ते सर्वे रमंते स्वे तु कर्मणि ॥ १ ॥**

आतां भक्तिचिया प्रेमा। कवण ते पैं उपमा। पूर्वार्जित कर्मा। सारिखें तें ॥ १ ॥ मूढ योनि कीं मानव। ययां कैसा प्रेमभाव। तो कवणिये परि अनुभव। वर्ते कैसा ॥ २ ॥ परस्परें संतोष। आपेचि उपजे हर्ष। तया करितां उपदेश। करणेंचि नलगे ॥ ३ ॥ अन्यत्र कल्पना विसरती। आणि तेथच कीं अनुसरती। मग आनंदेंचि रमती। तयेठायीं ॥ ४ ॥ ते कवण रीतीचे प्राणी। उपजती पैं चहूं खाणी। अनुक्रमें श्रवणीं। ऐक पैं ते ॥ ५ ॥

**वर्षाकालसमुत्पन्नमेघशब्देन हर्षितः।**
**नृत्यति तु मयूरश्च तस्याश्रुगर्भसंभवम्. ॥ २ ॥**

ऐकतां नव घनाचा घोष। मयूर पावतसे हर्ष। आनंद आणि संतोष। उपजे तया ॥ ६ ॥ मग तन्मय होऊनि नृत्य करी। नेत्र द्वारें हर्ष भरीं। पुलक गळतां मुख पसरी। मयूरी पैं ते. ॥ ७ ॥ काय[2] निमित्त अश्रु भरती। तया मयूराप्रति। तया मानशीं अंतःकृति। उपजे कैशी. ॥ ८ ॥ रति[3] इंद्रिय नाहीं आपणा। मदाची व्यर्थ पडे योजना। योग्यता नाहीं चरणां। आपणा-

---

१. शं (सुखं) करतीति शंकरः. २. होई, वाटे. ३. मयूराविषयीं अशी आख्यायिका आहे कीं त्याला रतींद्रिय नसतें. तो जेव्हां हर्षभरित होऊन नाचतो व तेव्हां त्याचे नेत्रांतून आनंदाश्रु निघतात, ते मयूरी मुख पसरून झेलून पिते व त्यांपासून तिच्या ठायीं गर्भधारणा होते. अशा प्रकारच्या चमत्काराचें उपादान कारण काय? तसेंच मयूरास आपल्या सौंदर्याविषयीं हर्ष वाटतो परंतु आपणास रतींद्रिय नाहीं आणि आपल्या आंगच्या इतर सौंदर्यानुरूप आपले पाय सुशोभित नाहींत म्हणून आनंदांत त्याला विषाद वाटतो—हा भाव.

सम ॥ ९ ॥ आंग तैसे चरण । शोभा ते न देती जाण । उन्मेषीं सखेदपण । उमटे तया ॥ १० ॥ म्हणोनि उपमे प्रेमचि घ्यावें । अंतरिचें कशासि न्हावें । आनंदाचेनि नावें । नामाथे[1] पैं. ॥ ११ ॥

**उरगस्य तु प्रीतिश्च नादे परिमले तथा ।**
**आभ्यां तु प्राप्तबंधो हि सुखं च मन्यते सदा. ॥ ३ ॥**

भुजंगा प्रेम द्विधा पाहीं । नादपरिमळाचिये ठायीं । तेणेंचि तो अपायीं । पडे पैं गा ! ॥ १२ ॥ नादा भुलतां गारुडी धरी । वासें बांधिला चंदनावरी । परी तयासी न दिसे वरी । सुखचि वाटे. ॥ १३ ॥ सर्वकाळीं सुखचि लक्षी । आहारालागीं वारा भक्षी । पूर्वद्वेषेंचि पैं आकसी[2] । असेल त्याचा. ॥ १४ ॥ पूर्वार्जितसुकृतबळा । अन्याय होय पैं आगळा[3] । तो सर्प होय बिळा । दुष्कृतयोगें. ॥ १५ ॥ पुण्याचेनि योगें ज्ञान आहे । म्हणोनि पूर्वजन्मींचें स्मरण होये । तयासीच दंश करिताहे । शोधोनियां. ॥ १६ ॥ सुकृताचिये जोडी । नादपरिमळांचि आवडी । अन्यायें पडियेली बेडी । सर्पत्वाची. ॥ १७ ॥ म्हणोनि मारितां वाटे भय । जाणत्यानें मारूं नये । सर्पत्वाचा अन्वय । जाण ऐसा. ॥ १८ ॥

**कुरंगो नादलुब्धश्च निवासप्रियकाननः ।**
**अश्नाति वृक्षपर्णान्यन्यत्तस्यैव न तु प्रियम्. ॥ ४ ॥**

मृग लुब्ध होय पैं नादा । संतोष पावे शब्द स्वादा । जयाचेनि आपदा । मूढ पावे. ॥ १९ ॥ वास्तव्य[4] करितसे अरण्यीं । क्षुधा निवारी वृक्षपर्णीं । राजालया आवरणीं । संतोष नाहीं. ॥ २० ॥ मनुष्यें उपचार केले । केतुलेही[5] जरी झाले । ते प्रिय नाहीं वाटले । मानसीं तया. ॥ २१ ॥ पहिलेंच नियमिलें योनिवशें । तेंचि तयाला प्रिय असे । तें विपरीत करितां कैसें । बरवें वाटे. ॥ २२ ॥ जें अधिकारपरत्वें आलें । तें ज्याचें त्याणेंचि ओळखिलें । तेंचि कर्म पैं वाटलें । प्रिय तया. ॥ २३ ॥

**दक्षिणामानलुब्धश्च ब्राह्मणो भोजनप्रियः ।**
**गृण्हात्यर्चनसत्कारं तैर्विना न च तुष्यति ॥ ५ ॥**

ब्राह्मणाचा अर्थ । भोजनीं बहु स्वार्थ । तयावीण कि व्यर्थ । सर्वेचि मानी.

---

१. नावाजला जातो. २. डाव धरणारा, सूड उगविणारा. ३. फार, मोठा. ४. वास, वसति. ५. केवढे.

॥ २४ ॥ आणि मनासारिखी दक्षिणा । दीर्घ दंड लोटांगणा । विद्या आणावी परीक्षणा[1] । दातयानें. ॥ २५ ॥ आणि आसन पूजन स्तवन । चरण तीर्थें[2] पावन । करी तयाप्रति ब्राह्मण । संतोष पावे. ॥ २६ ॥ हें विप्रासीच पैं व्हावें । आणिक कोणा नको स्वभावें । यया संशयासि करावें । निरुत्तर. ॥ २७ ॥ सुवासिनी वोवसिया । शिणे वैद्यचि पैं रोगिया । तेथ अनधिकारिया । इच्छा नसेचि. ॥ २८ ॥ जीवन[2] सकळा जीव भरी । आणि मत्स्यासि पैं द्वेष धरी । मग पृथ्वीचिये सरी । वाटलें तया. ॥ २९ ॥ पतिव्रताचि आघविया । वसती पैं गांवीं जया । कामी पुरुष तया ठाया । विमुख होय. ॥३०॥ प्रतिग्रह[3] न घेतां दुजयाचा । संसार न चले ब्राह्मणाचा । म्हणोनि दुराग्रह तयाच्या । मनीं वाढे. ॥ ३१ ॥ म्हणोनि अनुमोदना कारण । धरिलें तयाचें लक्षण । आणि विहित परीक्षण । करावें कीं. ॥ ३२ ॥

**क्षत्रियो युद्धकामश्च विप्रसेवासुतत्परः[5] ।**
**प्रजापालनदक्षश्च न चान्यत्तस्य रोचते. ॥ ६ ॥**

क्षत्रियांचें हृदयलक्षण । प्रिय कैसें वर्तन । संग्रामावांचूनियां संतोषण । नाहीं जया. ॥ ३३ ॥ युद्धाच्या ठायीं पडावें देहो । हाचि मानसींचा उत्साहो । ब्राह्मणाचे ठायीं सद्भावो । धरणें बहु. ॥ ३४ ॥ ब्राह्मणाप्रती दान द्यावें । प्रथम पूजन हें करावें । आणि अनन्यभावें घालावें । लोटांगण. ॥ ३५ ॥ भय पावे तया धैर्य द्यावें । समयीं पडलिया सांभाळावें । दीनजना पाळावें । यथाशक्ति. ॥ ३६ ॥ ऐसें क्षत्रियांचें मनोगत । तुज सांगितलें निगुत । आतां वैश्याची आर्त[6] । कवणियेपरी. ॥ ३७ ॥

**वैश्यानां परमं धर्म्यं वाणिज्यं वस्तुविक्रयम् ।**
**समृद्धौ धान्यसंग्राह्यं महर्घतायां च विक्रयः. ॥ ७ ॥**

वैश्यांचा मनोधर्म । उद्यमाचें पैं कर्म । तया कर्तव्याचें कर्म । ऐक कैसें. ॥ ३८ ॥ सुदेशकाळीं पदार्थ घेणें । अतिनिगेनें[7] संग्रह करणें । मग महर्घ[8]समयीं विक्रय होणें । हेचि इच्छा. ॥ ३९ ॥ रजोगुणाचा प्रबळ । तया मानसीं होय खेळ । तेथ औदार्यबुद्धीचा दुष्काळ । असे पैं गा ! ॥ ४० ॥ बु-

१. परीक्षा करण्यासाठीं. २. उदक. ३. दान. ४. योग्य. ५. विप्रसेवेंत अत्यंत दक्ष. ६. रीति, चाल. ७. काळजीनें. ८. महागाईच्या वेळीं.

द्रीसि बैसे मलिनपण । हाचि तये जातीचा गुण । बहुत असे शहाणपण । कुतर्काचें. ॥ ४१ ॥ ऐसें वैश्यांचें मनोगत । सांगितलें स्वागत । आतां शूद्राची आर्त । कवणियेपरी. ॥ ४२ ॥

**सेवाप्रियश्च शूद्रस्तु कृषिकर्मणि तत्परः ।**
**करोति जीवनार्थं च निंद्योद्यमं च हर्षितः. ॥ ८ ॥**

शूद्रांना प्रिय सेवा । कृषिकर्माचा हेवा । त्याचि कर्मे वैभवा । मानिती ते. ॥ ४३ ॥ कीं एकाचिये आज्ञेनें राहती । सांगितलें तेवढेंचि करिती । ये परी निस्तरती । योगक्षेम. ॥ ४४ ॥ योगक्षेमाचें सांकडें[१] । आधीं प्राणियां थोर पडे । प्राचीनास्तव जें जें घडे । विभागा ये. ॥ ४५ ॥ मनुष्य जन्मामाजि-वडें । द्रव्याविना चरितार्थ[२] न घडे । ते विद्या कोणाचि कडे । दिधली नाहीं. ॥ ४६ ॥ द्रव्यावांचुनि सर्व विद्या । एकेकापाशीं असती सद्या । परि जाणावया स्वसंवेद्या । योग्य नव्हती. ॥ ४७ ॥ परमात्म्यातें जाणावया । एक अध्यात्मविद्याचि तया । परी ऐशीही असतां तया । अटक द्रव्यीं. ॥ ४८ ॥ एकापाशीं एक गुंतला । एक विद्येचा ग्राहक झाला । ऐसा सर्व खेळ पैं केला । द्रव्यावरी. ॥ ४९ ॥ सोनें रुपें मातीचें केलें । शरीर मातीचपासोनि झालें । तें अनेकपरी भोगालागीं आलें । चरित्र ऐसें. ॥ ५० ॥ राजे बलात्कारें घेती । सत्तेलागुनि देती । सेवा करूनियां साधिती । सेवकजन. ॥५१॥ म्हणोनि धनापाशीं अडकती । मनुष्ययोनी भूतजाति । व्यापारनिमित्त उदर-स्फूर्ति[३] । लाविली देवें. ॥ ५२ ॥ ज्ञानिया जरी झाला थोर । आणि शरीर धरिलें भूचर । जंव फिरतसे पृथ्वीवर । तंव द्रव्य व्हावें. ॥ ५३ ॥ एवं सर्व सत्ता ईश्वराची । नेणतयातें जाची । आणि जाणतया तेजाची । दिवाळी करी. ॥ ५४ ॥ म्हणोनि प्राणिया प्रेमळपण । पूर्वार्जितेंचि हें प्रमाण । दुष्कृतेंचि निर्माण । दुष्कृत् वांच्छा. ॥ ५५ ॥

**पुरुषं बलवंतं तु साभिलाषं च कामिनम् ।**
**दृष्ट्वा तु स्वैरिणी नारी मोदते संगमोत्सुका ॥ ९ ॥**

पर पुरुष बलवान । अभिलाषी कामसंपन्न । देखोनि नारी हर्षमान । व्यभिचारिणी. ॥ ५६ ॥ व्यभिचार केलियाविण । तियेसि नाहीं संतोषपण ।

---

१. संकट. २. उदरनिर्वाह, उपजीविका. ३. उदरपोषण.

तेथ अन्यत्र भूषण। न लगे तिये. ॥ ५७ ॥ मौक्तिक[1] पुढां घातलिया जाण। वायसा[2] न होय संतोषण[3]। कुजलें कुमांस भक्षण। तयाचें पैं. ॥ ५८ ॥ तेंवी व्यभिचारिणीप्रति। नावडेचि पैं सत्संगति। अपकीर्ति आणि पापरति। भुलली जे कां. ॥ ५९ ॥ आघवें हें पापाचरण। हृदयसाक्षी जाणें जाण। परी न फिटे आवरण। गुणांचें तें. ॥ ६० ॥ रजोगुणें प्रीति उपजे। तमोगुणें लौकिका न लाजे। एवं दोन्ही गुणीं माजे। विषयछंद. ॥ ६१ ॥ छेडिलियाही न लगे। बुद्धि सांगतां कानीं नेघे। रक्षका चोरुनि पशु निघे। जेंवि शेता. ॥ ६२ ॥

**पशवः शष्पमिच्छंति मत्स्यास्तु जलसंयुताः।**
**खेचराः पक्षिणश्चैव गुडासक्तास्तु मक्षिकाः॥ १० ॥**

आरद्रतृणाचा[4] घांसु। घेतां संतोष पावे पशु। उत्पन्न ठायाचा उद्देशु। विसरे जैसा. ॥ ६३ ॥ जळीं मीन सुख पावे। पक्षिया गगनीं संतोष फावे। कीं गुळ देखोनि धांवे। माशी जैसी. ॥ ६४ ॥ ऐसे आपुलिया अनुक्रमें। मूढ योनिचेंनि भ्रमें। जीव गुंतती प्रेमें। ऐशिया परी. ॥ ६५ ॥

**भ्रमरः प्रियकल्हारः स्तेनः परधनप्रियः।**
**भक्तास्तु भगवत्प्रीता मुक्ताः समरसप्रियाः॥ ११ ॥**

भ्रमरा प्रिय कल्हार[5]। बैसतसे पैं अरुवार[6]। आमोदावरी[7] फार। लुब्ध होय. ॥ ६६ ॥ प्रसंगीं जीवित्वहि वेंचे। परी तेथोनि नुठावें रुचे। तैसेंचि प्रेम जीवांचें। विषयांवरी. ॥ ६७ ॥ धनवंत देखोनि चोर। अखंड असे पालतीवर। हर्षें असती निर्भर। आपुल्या ठायीं. ॥ ६८ ॥ आतां भक्त भगवंताचें। भक्तिविषयीं प्रेमाचें। घर रिघोनि यमाचें। दर्शन न घेती. ॥ ६९ ॥ भगवंताचे भुलीं भुलले। देहभाव हा विसरले। तटस्थ पैं झाले। विष्णुस्मरणीं. ॥ ७० ॥ नवविध भावार्थ आचरले। अशेष मूळ भागा आले। सहजेंचि मुक्त पैं झाले। भक्तिपंथें. ॥ ७१ ॥ प्रथम श्रद्धाभाव लाधले। मग ज्ञानाधिरा पातले। मग वैराग्य देशे आले। तारुण्यपणा. ॥ ७२ ॥ जेंवी कां

१. मोत्यें. २. कावळ्याला. ३. आनंद, संतोष. ४. ओल्या गवताचा. ५. कमळ. ६. कोमळ. ७. सुवासावर.

स्नेह[1] सूत्र वन्हि । तीन्ही मीनले[3] एकस्थानीं । प्रकाश पडतां जनीं । दीप दिसे. ॥ ७३ ॥ तेंवि झाला समरस[4] । यश पावला अभ्यास । मग आघवाचि दृश्य-भास । असोनि नाहीं. ॥ ७४ ॥

**वैराग्यं च निरोधश्च त्यागश्च योगिनः प्रियः ।**
**निंद्यंतु पातकं चैव पापिनां बहुधा प्रियम्. ॥ १२ ॥**

मुद्दलीं ध्यान बैसे । तेणें शरीर वेगळेंचि दिसे । नैराश्यकळा नित्य वसे । तेंचि प्रिय वैराग्य. ॥ ७५ ॥ रमणूक कोठेंचि न दिसे । पाहिलें तें नाशिवंत असे । म्हणोनि पैं नुमसे । दृश्य पैं ते. ॥ ७६ ॥ बुद्धीचा अंत जेथ होय । तेथचि सौख्य अप्रमेय । म्हणोनि तेथील सोय । धरिती योगी. ॥७७॥ प्राणायाम पालाणिती । मग ब्रह्मरंध्रीं पैं आणिती । आणि तेथील खुण जाणती । असे तैसी. ॥ ७८ ॥ ऐसी ब्रह्मसिद्धीची ऐक्यता । वावती ते एकांता । जेथ आदिअंता । तेंचि रूप. ॥ ७९ ॥ ऐसि या संतांची आवडी । पावणें पैं परात्पर थडी । येरां पापियां वेडी । बुद्धि होय. ॥ ८० ॥ तयां अध्यात्म हें नावडे । आणि बहुत निंदा पै आवडे । भूपण दूपणाकडे । वृत्ति[5] धांवे. ॥८१॥ साधुशीं प्रवर्तती वादा । ते पावती बहुत आपदा । गीतनृत्यनादा । लुब्ध होती. ॥ ८२ ॥ ऐसे आत्मकार्या मुकले । सर्वप्रकारें नागवले । ऐसे ज्ञानियांनीं देखिले । ज्ञानदृष्टीं. ॥ ८३ ॥

**दुःखार्तान्बांधवान्दृष्ट्वा दायादानां परं सुखम् ।**
**सधनं रोगिणं दृष्ट्वा कुवैद्यो हर्षसंयुतः ॥ १३ ॥**

दायद पैं दायादा । घडलियाही आपदा । तेणें पावे आनंदा । द्वेषबुद्धि. ॥ ८४ ॥ रोगी आणि सधन । ऐकोनि वैद्य पावे समाधान । तयाहुनी आमंत्रण । आलिया हर्षे. ॥ ८५ ॥ मग घडलिया दर्शन । गांठींच पडलें दिसे धन । मग कृत्रिम साधन । करूं लागे. ॥ ८६ ॥ हा रजोगुण उपचारी । स्वभाव ज्याचा वेश्येपरी । म्हणोनि ऐसिये प्रकारीं । वर्तन त्याचें. ॥ ८७ ॥ सात्विक वैद्याचा प्रकार । रोगें व्यापिला स्वकुमर । तयाचि पाडें चिंतातुर । पैरावियासाठीं[6]. ॥ ८८ ॥ आधींच न इच्छी पूजा । निवालियावीण रुजा । तो वैद्य नव्हे दुजा । धन्वंतरी. ॥ ८९ ॥

---

१. तेल. २. वात. ३. जमले. ४. एकरस, ब्रह्मानंद. ५. मनोवृत्ति. ६. परक्यासाठीं.

**एवं जीवसमूहो मायावृतोऽज्ञानग्रासितः ।**
**क्वचिच्च भक्तिमांस्तस्मिन्सत्यज्ञानसुनिर्मलः. ॥ १४ ॥**

सर्वभूतसृष्टीमाझारी । विरळा[1] भक्त पैं अवधारी । गुंतले अविद्या व्यापारी । सर्वत्र प्राणी. ॥ ९० ॥ विषयबुद्धीनें दाटले । संसार करितां आटले । विवेकासि विटले । अविवेकें. ॥ ९१ ॥ जेथ रज तम गुण प्रबळले । सर्वांसि तयानें आंवळिले । देवें धर्में वोळिले[2] । मूर्ख म्हणोनि. ॥ ९२ ॥ तयांमाजी क्वचित् कोणीं । आधिष्ठिला पैं दैवगुणीं । बहुतेक पैं प्राणी । अजाण ऐसे. ॥ ९३ ॥ सर्व गंधामाजी सुगंध । थोडकाचि असोनि प्रसिद्ध । तेंवि सकळ नरांमाजी सिद्ध । कोणी असे. ॥ ९४ ॥ प्रजा अनेक राजा एक । अनेक ताऱ्यांमाजी मयंक[3] । अनेक पदार्थ एकचि भूक । जाण तैसी. ॥ ९५ ॥ एवं अनेक वस्तूंआंत । विशिष्ट तें बहु नसत । तैसा भगवद्भक्ता आंत । विरळा जाणें. ॥९६॥

**अज्ञानी नास्तिकश्चैव वृषभ इव जीवति ।**
**यस्य मुखे हरेर्नाम नास्ति तच्चर्मकुंडवत्. ॥ १५ ॥**

आहार निद्रा भय मैथुन । भयें वर्तती पशुजन । परी नाहीं आत्मज्ञान । अंतरींचें. ॥ ९७ ॥ ईश्वर हा कवणेपरी । सृष्टी कैसी निर्माण करी । कैसा वर्ते पैं शरीरीं । हें ज्ञान नाहीं. ॥ ९८ ॥ निद्रेमाजी कवण निजे । जागृतीं कवण हिंडे सहजें । हें जयासि पैं नुमजे । पशुवत्. ॥ ९९ ॥ जयाचिये वाचेवर । नाहीं हरिनाम उच्चार । चर्मकुंड प्रकार । मुखाचा तो. ॥ १०० ॥ ऐसें चतुष्पदवत् जिणें[5] । मनुष्याचें आत्मज्ञानाविणें । तें जिणें नव्हे मरणें । तयाहुनि भलें. ॥ १०१ ॥

**यावज्जीवः शरीरे तु तावच्चिंतय चेश्वरम् ।**
**यथोक्तं स्नानसंध्यादि कुरुष्व च तपश्चर. ॥ १६ ॥**

जंव हा जीव असे शरीरीं । तावत् पैं तो अंतरीं । ईश्वर स्मरावा निरंतरीं । अनन्य भावें. ॥ १०२ ॥ स्नानसंध्या देवतार्चन । जप तप करावें अनुष्ठान । इंद्रियांचें रोधन । कवणियेपरी. ॥ १०३ ॥ श्रवणीं[6] वेदांतश्रवण । मुखें करावें हरिकीर्तन । नयनीं स्वरूपअवलोकन । ध्यान मुद्रा[7]. ॥ १०४ ॥ बुद्धिनिश्चयासि तेंचि यावें । मन तेथेंचि रिघावें । चित्तें आठवूनि द्यावें । त-

---

१. क्वचित्. २. त्यजिले. ३. चंद्र. ४. मनुष्यांत. ५. जगणें. ६. कानानें. ७. मौन.

यासीच. ॥ १०५ ॥ अहंपण तें हेंचि राखावें । मी ब्रह्म ऐसें देखावें । आणि तृणवत् कीं लेखावें । शरीर पैं हें. ॥ १०६ ॥ कांहीं जप यज्ञ पैं करावा । आत्मविवेक धरावा । भगवंतचि स्मरावा । वेळोवेळां. ॥ १०७ ॥

**विष्णोर्नामसहस्रं च गीता भागवती तथा ।**
**अनयोर्भावं जानंश्च भवैव ध्याननिर्मलः ॥ १७ ॥**

विष्णूचें सहस्र नाम । कीं भगवद्गीताध्याय क्रम । पठणमननाचें काम । करावें कीं. ॥ १०८ ॥ ज्ञानाचा करावा अभ्यास । ध्यानाचा पाहावा निवास । फल त्याग नैराश्य । करणें आधीं ॥ १०९ ॥ मग शांतीचिये घरीं रिघावें । साक्षी कवण हें शोधावें । निरोधितां निरोधावें । सर्व पैं हें. ॥ ११० ॥ निजबोधें निग्रही व्हावें । ब्रह्मचि आहे स्वभावें । तें न कळतां पैं ध्यावें । मन बुद्धिसी. ॥ १११ ॥ ध्यान मुरालें ध्यानीं । कीं ऐकणें मुरालें कानीं । देखणें स्थिरावलें नयनीं । दृश्यत्वपणें. ॥ ११२ ॥ कीं दृश्यद्रष्टत्व एक झालें । दर्शन ऐक्यत्वासि आलें । जेथिंचें तेथ सामावलें । अभेदपण. ॥ ११३ ॥

**शोधरोधयुतो बोधपरप्रसन्नतायुतः ।**
**परमात्मपरब्रह्मप्राप्तये भक्तिमान्भव. ॥ १८ ॥**

स्थूल सूक्ष्म कारण । शोधुनि पाहाणें महाकारण । शेवटिलें निर्वाण । कवण तें पैं. ॥ ११४ ॥ चारी अवस्था निवडुनी । चारीहि अभिमान दवडुनी । परब्रह्म निदानीं । उरे जे कां. ॥ ११५ ॥ अन्वय व्यतिरेकें निरोधुनी । बुद्धि निजबोधे बोधुनी । आपणा पैं शोधुनी । पाहावें ऐसें. ॥ ११६ ॥ मग ब्रह्म साम्राज्य पटीं । जीव बैसेचि पैं सेवटीं । तेथ प्रसन्नतेसि मिठी । हळूच पडे. ॥ ११७ ॥ ऐसी प्रसन्नता झाली वेडी । तुटली आत्मभ्रांतीची बेडी । मग पाहिली पैं तेवढी । वस्तूच दिसे. ॥ ११८ ॥ ऐसिया ब्रह्मप्राप्तीचा उद्देश । करावा शमदमाचा अभ्यास । सर्वविषयीं आशापाश । सोडुनियां ॥ ११९ ॥

**अभ्यासस्य प्रयत्नेन शमदमौ तु साधयेत् ।**
**मोक्षस्य साधनं कुर्याद्दृश्यद्वैतगतभ्रमः ॥ १९ ॥**

केलिया शमदमाचा अभ्यास । तुकोनि घेतां गुरुमुखास । मग सहजेंचि प्रवेश । ब्रह्मीं होय ॥ १२० ॥ प्रथम अन्वयीं देऊनि दिठी । मग व्यतिरेकाचिये परिपाठीं । मिळवुनियां मिठी । साम्यदशे. ॥ १२१ ॥ मग साम्या-

१. समजावें. २. शिरावें, जावें. ३. मान हालवून, लवून. ४. दृष्टी.

चिया आसनीं । बैसूनियां निर्दानीं । मग दृश्यभास अनुसंधानीं । पाहाणें नुरे. ॥ १२२ ॥ मग ऐक्याचलाचिया माथां । बैसलाचि जो परमार्था । देहबुद्धी-चिया स्वार्था । सोडुनियां. ॥ १२३ ॥ ऐशी ब्रह्मीची योग्यता पावे । शमदम साधने स्वभावें । मग सहजानंदाचिया वैभवें । मिरवला जो. ॥ १२४ ॥

**शमः कोऽत्र दमः कोऽत्र तत्सर्वं सादरं शृणु ।**

**येन त्वं सफलं ज्ञानं प्राप्नोषि शुद्धमुत्तमम्. ॥ २० ॥**

येथ कवण तो पैं शम । आणि कासया नांव दम । तोचि पैं अनुक्रम । अवधारिजे. ॥ १२५ ॥ ऐसें हें पैं जंव बुंजावें । तंव अन्वय व्यतिरेकें ऐक्य व्हावें । म्हणोनि कीं अनुभवावें । कारण तें पैं. ॥ १२६ ॥ प्राचीन भोग देहाला भोगे । त्यांतचि जीव अभ्यासा लागे । मग अंतरींच जागे । शमदम ऐसा. ॥ १२७ ॥ तें कवणिये परीचें लक्षण । अवधारिजे संपूर्ण । आपें आप निज खुण । हाता चढे. ॥ १२८ ॥

**प्राक्कर्मणोत्थितां वृत्तिं चांतःकरणसंयुताम् ।**

**मनोबुद्ध्याद्यसंपृक्तां पूर्वस्थं च नयेच्छमम्. ॥ २१ ॥**

प्रारब्धयोगें उठे वृत्ति । अंतःकरणीं उद्भवती । न कळतां मनबुद्ध्यें ती । स्थिर करणें. ॥ १२९ ॥ पूर्वस्थान निरालंब । तेथ शांत करणें स्वयंभ । तरी हाचि पैं परम लाभ । शमसाधनीं. ॥ १३० ॥ इंद्रियीं प्रवेश न होतां । पंचप्राणातें नकळतां । परतोनि स्वस्वरूपीं तत्वता । मिळवणें जें. ॥ १३१॥ विवेकाची दृढ गांठी । बांधोनियां सेवटीं । गेलिये परिवाटी । न मुटे जैसी.॥१३२॥ वैराग्यकळा आहे प्रदीप्त । कधींच मोह न होय प्राप्त । शमदमसाधनाची व्याप्त । जाण ऐशी. ॥ १३३ ॥

**सत्यविदः शमेनैव मुच्यंते सर्वकिल्बिषात् ।**

**हरति जन्ममृत्यू स तान्नयति परं पदम्. ॥ २२ ॥**

सत्यब्रह्म जो जाणता । शमसाधनीं जो नियंता । तेथ पातक झालें तत्वता । उरेचिना. ॥ १३४ ॥ जेंवी अग्नि लागतां तृण । तत्काल भस्म होत जाण । तेंवी ज्ञानिमुखें संपूर्ण । कर्म जळे. ॥ १३५ ॥ मग कर्मचि नुरे जेथ । जन्ममरण कैंचें तेथ । ऐसें कीं हें यथार्थ । दिसोनि ये. ॥ १३६ ॥

---

१. शेवटीं. २. पाहा. ३. समजावें. ४. मनोवृत्ति उचंबळे. ५. प्राण, पान, समान इत्यादि पांच. ६. स्वामी. ७. खरोखर.

आणि [1]अव्यय जें निजधाम । प्राप्ति पाविजे सुगम । ऐसें अनिर्वाच्य अनुपम । बोलतां नये. ॥ १३७ ॥ जें जवळ नोहे दुरी । ना पृथ्वीआंत [2]गगनावरि । जें प्रकट असतां चोरी । अज्ञानियां. ॥ १३८ ॥

**प्रकाशो ज्ञानदीपस्य विश्रांतश्चात्मरूपके ।**
**नश्वरतमसो नाशो जीवात्मनश्च सार्थकम्. ॥ २३ ॥**

जेथ ज्ञानदीपाचा प्रकाश । नाशवंत [3]तमाचा नाश । गगनासि पैं विकास । होतसे जेथ. ॥ १३९ ॥ पिंड ब्रह्मांडाचें [4]अभ्र आड । निघोनि उदेला ज्ञान-[5]मार्तंड । अद्वयकमलिनीस उघाड । जाहला जेथें. ॥ १४० ॥ आणि विश्वाचा विस्तार । असतां लोपला सविस्तर । अविकारींच अनुकर । उठला जेथ. ॥ १४१ ॥ ऐसें विश्वबीज अंकुरलें । सर्वीं तेंचि दिसोनि आलें । जन्मा येउनि सार्थक झालें । जीवाचें या. ॥ १४२ ॥ जीव जीवत्वेंचि असे । परि शिवत्व येउनी हृदयीं बसे । नट जेंवी करी [6]जायावेषें । [7]संपादणी. ॥ १४३ ॥ आत्मस्वरूपीं विसावला । लघुत्व होतां पावला । आघवेंचि विसरला । उपाधी-कर्म. ॥ १४४ ॥

**सर्वोपाधिविनिर्मुक्तो छिनत्ति भवकारणम् ।**
**सर्वतेजोमयं ब्रह्म समत्वं प्रापयन्स तु. ॥ २४ ॥**

उपाधीपासूनि सुटला । देहप्रमाणासि विटला । मग बंध तोडुनि प्रकटला । आकाशरूपें. ॥ १४५ ॥ जेथ संसाराचा संभव घडे । स्थूळ सूक्ष्माचेनि पाडें । तें अज्ञान विघडे । कारणचि पैं. ॥ १४६ ॥ मग साम्यदशेतें पावला । जनीं वनीं स्थिरावला । मग येई स्वइच्छेला । तेंचि करी. ॥ १४७ ॥ जेंवि कीं तें बालक । खेळ करी पैं अनेक । परि [8]दुराग्रह एक । कशांत नाहीं. ॥ १४८ ॥ अभिमानाविरहित । सकल इंद्रियीं रमत । परि अवयव प्रसरें आवरीत । [9]कूर्म जैसा. ॥ १४९ ॥

**अनेन शमरूपेण राजयोगं तु साधयेत् ।**
**सविकल्पसमाधिं च व्यतिरेकान्वयात्तथा. ॥ २५ ॥**

ऐसा शमसाधन प्रयोग । तोचि म्हणावा राजयोग । अलिप्तता पैं सांग ।

---

१. अक्षर, अविनाश. २. आकाशांत. ३. अज्ञानरूप तमाचा. ४. मेघ. ५. सूर्य. ६. स्त्रीच्या पोषाखानें. ७. बतावणी, सोंग. ८. हट्ट. ९. कांसव.

संसारीं ते. ॥ १९० ॥ जैंवी जळीं असोनि कमलपत्र । परि जळीं न लिंपे क्षणमात्र । तैसा शरीरधारी परि, पात्र । पातका नोहे. ॥ १९१ ॥ कवण एकचि अंमल खाय । तो हे सर्वचि करिताहे । परी आंगीं वोढी लागली आहे । मग्नतेची. ॥ १९२ ॥ तैसी सविकल्प पैं समाधि । सर्वेहि असतां उपाधि । माजी ब्रह्म तें अनादि । विसरेचि ना. ॥ १९३ ॥ अन्वयें पैं आकारीं ये । व्यतिरेकें निराकारी होय । ऐसी उभयदृष्टीं सोय । एकचि धरी. ॥ १९४ ॥

**येन तु दमरूपेण ब्रह्मरूपं च साध्यते, ।**
**निर्विकल्पसमाधिश्च तत्सर्वं तु निरूप्यते. ॥ २६ ॥**

तैसेंचि ऐक पैं साधन । दमसंयोग साधारण । निर्विकल्प समाधि आपण । म्हणावी ते. ॥ १९५ ॥ सकल नामरूप सोडुनि । व्यतिरेक अनुसंधानीं । सदैव राहाणें निरंजनीं[1] । तेथुनी नुतरे. ॥ १९६ ॥ अन्वयावरी येतचि नाहीं । कर्म सरलें असे पाहीं, । म्हणोनि शून्याचिये डोहीं । बुडाला जो. ॥ १९७ ॥ तेथोनि वेरौता[2] न निघे । दृश्य दृष्टीमाजी नेघे । कल्पनायुक्त न रिघे[3] । साकारीं पैं. ॥ १९८ ॥ मग वृत्तीचिये सारिखा । जनीं वनीं फिरतो देखा । परी कवणाचिया लेखा[4] । नयेचि तो पैं. ॥ १९९ ॥

**प्राक्पूर्वसंगनिर्मुक्तः कर्मप्रधानसूत्रजः ।**
**निर्धूतपापपुण्यश्च दमयोगं प्रयाति सः. ॥ २७ ॥**

पूर्वजन्मींच सर्व संग । नासोनि होतां निःसंग । म्हणोनि सुटली पैं पांग[5] । विषयांची. ॥ १६० ॥ धुतलाची आला जन्मा । जैसा शारदेचा[6] चंद्रमा । कीं नासूनि उजळला धुंमा[7] । अग्नि जैसा. ॥ १६१ ॥ निर्मळ जैसें जळ । कधींच दिसेना गढूळ । कीं सर्वांसि सदां गूळ । गोड जैसा. ॥ १६२ ॥ जेंवि कां तें खांडें[8] उघडें । म्याना आंत जैसें न पडे । सबाह्य सुरवाडें । वीतराग तैसा. ॥ १६३ ॥ तेंवी उपाधि न घेतां जन्मला । एक एकटाचि पैं उरला । ईश्वरप्राप्तीसि अभ्यास केला । होता पूर्वजन्मींच पैं. ॥ १६४ ॥ म्हणोनि जन्मतांचि केवळ । फल पावला निर्मळ । म्हणोनि तया मनोमळ[9] । आधीच नाहीं. ॥ १६५ ॥

---

१. एकांतांत, मायारहितस्थानीं. २. वरतीं. ३. शिरे. ४. बरोबरी, खातरजमा. ५. इच्छा. ६. शरदृतूंतील पौर्णिमेचा. ७. धूम्र, धूर. ८. हत्यारविशेष. ९. व्यथा.

**संचितं क्रियमाणं तु प्रारब्धयोगसंयुतम् ।**
**दमयोगस्य साह्यार्थं नित्यं च यतते ननु. ॥ २८ ॥**

संचित आणि क्रियमाण । तदनुसार प्रारब्ध जाण । योगसाह्यार्थी आपण । उभें राहे. ॥ १६६ ॥ जें जें योजिलें अनुकूल । प्रसन्न तया जवळि स्थल । प्रेत भूत वेताळ । वश तया. ॥ १६७ ॥ ऋद्धि सिद्धि अनुसरती । नित्य ज्यातें ओळंगती । परि निरपेक्ष पैं स्थिति । ययांस्तव. ॥ १६८ ॥ क्षुधा तृषा आणि व्याधि । जया नाहीं पैं चिच्छुद्धि । जयाचि निरंतर बुद्धि । शून्य झाली. ॥ १६९ ॥ ऐसा उत्तरोत्तर प्रकार । ज्ञानबीजाचा विस्तार । निर्विकल्प भूमीवर । वाटला पैं. ॥ १७० ॥

**अनृण्याग्राहकश्चैव यस्य नो कर्मसंग्रहः ।**
**अतस्तु शून्यसंसारः स प्राक्चैतन्यमार्जितः. ॥ २९ ॥**

त्याणें पूर्व जन्माच्या ठायीं । कवणाचेंचि ऋण घेतलें नाहीं । तयाचें दुज्यानेंही । देणें नाहीं. ॥ १७१ ॥ पूर्वींच उरलें ना कर्म न्यून । इह जन्मीं संसार शून्य । पूर्वाभ्यासें एक चैतन्य । विभागा आलें. ॥ १७२ ॥ म्हणोनि स्वइच्छ तो पैं उरला । उपाधींतूनि पैं झुरला । म्हणोनि जयाचा पुरला । वासनाभावो. ॥ १७३ ॥ वासनाचि झाली वासुदेवो । कीं स्थापनचि झाला महादेवो । सुकाळ जाहला सुदेवो । परब्रह्म. ॥ १७४ ॥ ऐसा निमग्न महापुरुष । निर्विकल्प स्थितीचा हर्ष । पावोनि पुनर्जन्म क्लेश । दूर केला. ॥ १७५ ॥

**ततस्तु स्वयमेवात्रासंगः सज्ज्ञानसंयुतः ।**
**शरीरभोगमात्रेण लोकेऽस्मिंश्चरतीह वै. ॥ ३० ॥**

निर्विकल्प ज्ञानाचा अर्थ । उगाणुनि[1] दाविला यथार्थ । उभय साधनीं परमार्थ । प्रकट केला. ॥ १७६ ॥ ऐसा आत्मा स्वयमेव । तयाचि ठायीं ठेविलें सर्व । जेथ कोहं[2] सोहं गर्व । दुरी ठेला ॥ १७७ ॥ अध्यात्मसंग शरीराचा । तंव भोग असे पैं कर्मांचा । तेथ अधिभूत संतापाचा । लेश नाहीं. ॥ १७८ ॥ बाळ उन्मत्त पिशाचवत् । जनीं वनीं असे पैं फिरत । तयामाजी कांहींएक

---

१. एकत्र करून. २. प्राणी गर्भांत असतो तोंपर्यंत 'सोऽहं' म्हणजे मी ईश्वर आहें असें म्हणतो, जन्मास आला म्हणजे 'कोऽहं' म्हणजे मी कोण आहें असें म्हणतो आणि पुढें मोठा होऊन त्यास समजूं लागलें म्हणजे 'अहं' म्हणजे 'मीच काय तो आहें' असें म्हणतो, म्हणजे ईश्वरास विसरतो. (नवनीत–पृ० ३७४.)

घडत । शरीरा तया. ॥ १७९ ॥ तया घडलियाचें स्मरण । तयासि नाहीं पैं जाण । निर्विकल्प समाधीची खुण । जाण ऐसी. ॥ १८० ॥

**निर्विकल्पस्थितिश्चेयं भूतभेदविनाशिका ।**
**भूतहिते न चासक्ता प्रस्तरेण समा च सा. ॥ ३१ ॥**

निर्विकल्प स्थिति एकदेशी । भूतभेद पैं नाशी । प्राणियांचिया हितासि । नयेचि कांहीं. ॥ १८१ ॥ प्राणियांशीं बोलणें नाहीं । भक्त अभक्त न स्मरे कांहीं । तयाचिये ठायीं । उपदेश कैंचा? ॥ १८२ ॥ जवळीं कोणा येऊं नेदी । वास्तव्य ज्याचें नंदी[1] बिदी । काय पाहोनि वंदी । तयातें कोण्ही. ॥१८३॥ जेथ भजन पूजनाचा मार्ग मोडे । आणि न गुंतेचि पैं कोणीकडे । तरी तेथ उपदेश घडे । कैसेनि पैं? ॥ १८४ ॥ जो उपदेशमार्गा आळसी । तयाला पैं कवण पोसी । म्हणोनि निर्विकल्पस्थिति एकदेशी । ऐसी जाण. ॥ १८५ ॥

**निरोधः सर्ववृत्तीनां हटयोगः प्रकीर्तितः ।**
**हटिनः सिद्धिदाः सर्वा इंद्रियाणां तु देवताः ॥ ३२ ॥**

जनांमधिल बाह्य वृत्ति । आकर्षिलिया पैं निरुति[2] । तयातें हटयोगप्राप्ति । प्राप्त झाली. ॥ १८६ ॥ सकल इंद्रियांचीं दैवतें । निरोधनीं प्रसन्न झालींत यातें । त्याचि म्हणाव्या प्रस्तुतें । सिद्धि येथ. ॥ १८७ ॥ तया सिद्धींचा सांगात । जन असे कामनाभूत । तेथ ईश्वरी मर्यादा उल्लंघीत । कवणाचेनि. ॥ १८८ ॥ एकासि कांहीं द्यावें । तो दुजिया सांगेल स्वभावें । मग जनचि आघवें धांवे । पाठिलागा. ॥ १८९ ॥ म्हणोनि जन कामनाभिये । मग अरण्यचि सेविताहे । तो आत्मउपदेशा राहे । उभा कोठें. ॥ १९० ॥ आणि सर्व प्राणियां स्वभावें । आत्मज्ञान कासया व्हावें । चरितार्थालागीं असावें । कांहीं तरी. ॥ १९१ ॥ हाचि सर्व जनाचा मैनोर्थ[3] । विषयांवरिच कीं धांवत । तयासि सहसा परमार्थ । आवडेचिना. ॥ १९२ ॥

**सद्यः सुखसमाधानैर्जनैस्तु वृत्तितत्परैः ।**
**अकार्यं मन्यते तत्त्वमनुपयुक्तानिष्फलम्. ॥ ३३ ॥**

कैर्दमावांचुनि[4] दैर्दुर[5] । कैंवि शोधी आणीक घर । कीं जलावांचुनि जलचर ।

---

१. नदींत आणि गल्लींत. २. खरोखर. ३. इच्छा, हेतु. ४. चिखलाशिवाय. ५. बेडूक.

सुखी न्हे पैं. ॥ १९३ ॥ पतिव्रतेचें संभाषण । कामिकासि न होय संतोषण । गोचिडा [1]अशुद्धाचें सेवन । नावडे दूध. ॥ १९४ ॥ तेंवी प्राणियां शरीराची आवडी । त्याहुनी न दिसे आणिक जोडी । म्हणोनि साहित्याचीच तेवढी । चिंता आधीं. ॥ १९५ ॥ देहचि आपण झालें । आणखी कांहींच नाहीं देखिलें । ब्रह्म म्हणुनि [2]उमजलें । नाहींच जया. ॥ १९६ ॥ ब्रह्म तें न पडे दृष्टी । ऐकतां वाटती मिथ्या गोष्टी । विषयसुखाहुनी सृष्टीं । विशेष नाहीं. ॥ १९७ ॥ भूक ब्रह्में केंवि जाय । ब्रह्मीं पांघरावें काय । [3]मन्मथाची सोय । तेथ कैंचि? ॥ १९८ ॥ तैलावांचुनि दीप न लागे । तो ब्रह्म ऐकतां कैसा लागे । घरीं येउनि भोजन मागे । काय द्यावें तयासी? ॥ १९९ ॥ म्हणोनि विषयांवांचुनि जीवें । संतोष न घेणें स्वभावें । मनोगत पैं जाणावें । जनांचें हें. ॥ २०० ॥

**यस्त्वर्थरहितो दीनः सोऽमान्यो दुर्भगः खलु ।**
**स च शोकयुतश्चैवं मन्यते त्वज्ञमानवैः ॥ ३४ ॥**

विषय नाहीं दुबळा । जगा यया सकळा । तेथ झाली [4]अवकळा । आघवीच पैं. ॥२०१॥ गेलिया स्थानीं सन्मान नाहीं । नष्टचर्य ऐसें पाहीं । म्हणोनि शोकाच्या ठायीं । पडे पैं तो. ॥ २०२ ॥ विषयांविना संतोष । केंवि होय पैं जीवास । अर्थावांचुनि धर्मास । वाट न पडे. ॥ २०३ ॥ म्हणोनि अर्थावांचुनी स्वार्थ । स्वार्थावांचूनि परमार्थ । परामार्थावांचुनी व्यर्थ । सर्व न दिसे. ॥ २०४ ॥ जेंवी पुष्पांची पैं माळा । दोरावीण न पडे गळां । तेंवी देहाचिया आश्रयें सगळा । परमार्थ पैं. ॥ २०५ ॥

**मया प्रागेव दत्तं नातोऽधुना प्राप्यते नहि ।**
**इति चिंतायुतस्यैव न वै स्वपरसाधने ॥ ३५ ॥**

पूर्वजन्मीं कांहीं दान । अथवा न केलें धनसाधन । म्हणोनि इहजन्मीं उठिलें चिन्ह । दारिद्र्याचें. ॥ २०६ ॥ दारिद्र्यें उपजला शोक । कांहींच न रुचे वाक्य श्लोक । बहुत असती पैं लोक । ऐसेचि हे. ॥ २०७ ॥ [5]बुंथी पडली अज्ञानाची । तया [6]पारख केंवि ज्ञानाचि । नेणती म्हणोनि निंदेचि । वाट मिळे. ॥ २०८ ॥ तया प्रपंचही न घडे । आणि परमार्थ दृष्टी न पडे । अंतर पडलें दोहींकडे । अविवेकें. ॥ २०९ ॥

---

१. रक्ताचें. २. कळलें. ३. मदनाची. ४. ऱ्हास. ५. पडदा. ६. परीक्षा.

**एवं सततदुःखार्त्तः साधुसंगविवर्जितः ।**
**तस्येदं न परं नास्ति नास्ति बुद्धिर्भवभ्रमात्. ॥ ३६ ॥**

चित्तासारिखा प्रपंच नाहीं । परमार्थही न सुचे कांहीं । ऐसा दोहीं ठायीं । अंतरला पैं. ॥ २१० ॥ अकिंचन[1] झाला केवळ । तेणेंचि पैं होय व्याकुळ । योगक्षेमाचा[2] काळ । कठीण पडे. ॥ २११ ॥ गृहस्थाश्रमाचें वोझें । भारी पडे जया सहजें । तेणें कांहींच नुमजे । विचार तया. ॥ २१२ ॥ जन्मापासोनि आवड । विषयचि वाटती गोड । ते आतांचि पैं खोड । सुटे कैसीं ? ॥ २१३ ॥ तो परमार्थासि पैं नाडला[3] । सद्बुद्धीनें सोडिला । तया शरीरीं सुखावला[4] । भ्रमचि पैं गा ! ॥ २१४ ॥ ऐसें बहुतां ययां । साधुदर्शन नाहीं तया । म्हणोनि आत्म उपाया । वोहट[5] पडे. ॥ २१५ ॥

**लोकेषु गुप्तसिद्धाश्चाज्ञावत्तेषां च वर्तनम् ।**
**विषयाणां भ्रमाल्लोका न जानंति च सद्गुरुम्. ॥ ३७ ॥**

ऐसिया अज्ञान लोकां आंत । संत साधु असति गुप्त । तयाचि सारिखी व्याप्त । दाविती तयां. ॥ २१६ ॥ युद्धीं बहुत प्राणी पडती । मेलियांत जिवंत दडती । तयांच्या अशुद्धें[6] पैं लिंपिति । आपुलिया आंगा. ॥ २१७ ॥ मग नेत्र झांकोनि पैं राहे । मेला म्हणोनि न मारितां शत्रु जाये । तेंवी मूर्खीं मूर्खचि होउनि राहे । अलिप्त साधु. ॥ २१८ ॥ प्रपंचिक कोण्हीं देखोनि न भजे । अंतर कवणासीच नुमजे । मग गुप्तचि पडला सहजें । येणें करोनि. ॥ २१९ ॥ कित्येक साधु वेड घेती । अर्वाच्यचि पैं बोलती । प्रकट असतां अदृश्य होती । जनामाजी. ॥ २२० ॥ जनांची वासना विषयावरी । अनुक्रमेचि पैं अंतरी । निर्विकल्प तयांच्या घरीं । विसावे ना. ॥ २२१ ॥ ऐश्या साधूशीं संशय दिसे । तंव अज्ञानभ्रम कैसा नासे ? । मानसीं कामना वसे । नाना परी. ॥ २२२ ॥

**द्रव्यमिच्छंति केचित्तु वंध्या संतानमिच्छति ।**
**एवं चानेककामास्तु लोकाः सिद्धं प्रयांति ते. ॥ ३८ ॥**

एका द्रव्याचीच वासना । वांझेसि पुत्राची कामना । निरोगी व्हावें मनां । रोगियाच्या. ॥ २२३ ॥ सकामी रतिस्तव । आतुर आहे स्वभाव । ऐसे मनुष्यां अनेक भाव । वासनेचे. ॥ २२४ ॥ अज्ञानाचिये कामनेला । अंतचि नाहीं

---

१. दरिद्री, कंगाल. २. योगक्षेम=अन्नाच्छादनादि करून आपल्या प्रपंचाचा निर्वाह करणें, सुस्थिति. ३. त्रासला. ४. सुख पावला. ५. वोहट पडणें=ओहोटी लागणें, कमी होणें. ६. रक्तानें.

पैं गमला । तेथ देतांचि [1]भागला । होईल पैं तो. ॥ २२५ ॥ म्हणोनि साधु राहिले गुप्त । जनांची वासना नाहीं तृप्त । तया आंत ज्ञानी अलिप्त । कवण शोधी. ॥ २२६ ॥ ज्ञानाची नाहीं वाढी । तेथ साधुची केंवि लागे गोडी । म्हणोनि जन [2]अपरवडी । आघवीचि हे. ॥ २२७ ॥

**अनेकवासनासक्ता वर्ततेऽत्र जनाः खलु ।**
**तेषां मध्ये च साधूनां निवासो गहनस्थले. ॥ ३९ ॥**

जेंवी पाषाणामाजी परिस । असोनि न पडे दृष्टीस । कीं संजीवनी [3]अस-मास । वृक्षामध्यें. ॥ २२८ ॥ दिसतें आघवें चराचर । त्यांतचि असोनि खे-चर । नयनां नसे गोचर । जयापरी. ॥ २२९ ॥ कीं हृदयीं पैं आत्माराम । सर्व वसवी [4]इंद्रियग्राम । वरी दिसतसे शरीरश्रम । परि अदृश्य तो. ॥ २३० ॥ जैसा भिंगारीं दीप लाविला । तो प्रकटचि पैं आच्छादिला । तेंवी साधु अ-सोनि नाहीं झाला । जनांमाजी. ॥ २३१ ॥

**दमसाधनसंयुक्तो वर्त्तते च निराश्रयः ।**
**क्षुधार्त्तश्चाश्नुते क्षुत्तु तृषार्त्तश्च पिबेत्तृषाम्. ॥ ४० ॥**

आतां दमाचा प्रकार । चित्त देवोनि [5]अवधार । तो वर्ततसे निराधार । जनीं वनीं. ॥ २३२ ॥ क्षुधा लागल्या क्षुधाचि खावी । तृषा लागतां तृषाचि घ्यावी । पवन मेवा [6]वांवोवावीं । निरंतर. ॥ २३३ ॥ उनामाजी बैसणें । समयीं शीत पांघुरणें । झाडांचि माजि राहाणें । बहुतकरोनि. ॥ २३४ ॥ आका-शासवें बोलणें । कीं पवनासवें क्रीडणें । परि [7]जनांमाजी मिरवणें । नाहीं जया. ॥ २३५ ॥ पर्वत देखोनि संतोष होणें । तयावरी वाहते उदकीं रमणें । प-क्षियां प्रेमें न्याहाळणें । उडतां जेथ. ॥ २३६ ॥

**एवं वायुनिरोधं कृत्वाष्टांगयोगसाधनम् ।**
**दमनं त्वेंद्रियाणां तु चरत्येव निराश्रयः ॥ ४१ ॥**

अष्टांगयोगसाधन । केलियावीण समाधान । निरोधबलसंपन्न । जाण तो ऐसा. ॥ २३७ ॥ इडा पिंगळा एकवटीं । जाऊनि बैसे तो त्रिकुटीं । आकळु-नियां भृकुटीं । आघवें नेतो. ॥ २३८ ॥ सर्वेंद्रियनियम । तोचि ओळखावा दम । बलावलिये वृत्तिसी नेम । मागुतीं करी. ॥ २३९ ॥ प्रथम इच्छा उठे ।

---

१. त्रस्त. २. आश्चर्य. ३. असंख्य. ४. इंद्रियगण. ५. ऐक. ६. जेथें तेथें. ७. दासांमध्यें.

शरीरामाजी कोंदाटे । मग तयावरी दाटे । बलात्कार. ॥ २४० ॥ पवनाचेनि आश्रयें । तया फिरणें निराश्रयें । न वागवणें भयें । कवणाचेचि पैं. ॥२४१॥

**कामक्रोधादयः सर्वे उन्मत्ता मनसि स्थिराः ।**
**दमेन सह युध्यंते जानंति योगिनः खलु ॥ ४२ ॥**

प्रकृतीचें शरीर । गुणत्रयांचें अग्रहार[1] । कामक्रोधांचें घर । जाण कीं हें. ॥ २४२॥ तेथील विकार वृत्तिक । पुरातन पैं निष्टंक । तया वाटलें राजिक[2] । आलें ऐसें. ॥ २४३ ॥ म्हणोनि ते पैं क्षोभले । कामक्रोध पैं उठावले । मग दमाशीं युद्ध केलें । निरंतर. ॥ २४४ ॥ सदैव होतें तयां झुंज[3] । परि हा कवणासीच न पडे उमज[4] । ज्याला अभ्यासीं आहे समज । जाणती ते. ॥ २४५ ॥

**तस्मिन्युद्धे न हंतव्याः कामादयो दमेन वै ।**
**शूरा न घ्नंति शत्रूंश्च तांस्तु कुर्वंति चांकिताः ॥ ४३ ॥**

ऐसे विकार पैं प्रबळ । तेथ असतां निश्चळ । उठावले सकळ । स्वभावास्तव. ॥ २४६ ॥ शरीराच्चिया संगतीं । तयांची सहजेंच वस्ति । म्हणोनि हे उठती । समयीं एका. ॥ २४७ ॥ शून्याचिया ठायीं ध्यान । लागों नेदिती अनुसंधान । तयांचा पराभव केलियाविण । समाधान पैं न बैसे. ॥ २४८ ॥ काम क्रोध हे मारावे । म्हणणें हें वृथा जाणावें । अंकित करूनि ठेवावे । तेणेंचि मेळें. ॥ २४९ ॥

**नानाभूतसमुत्पन्नं ब्रह्मांडं प्रेक्ष्य पिंडके ।**
**अहंकारं तु वेष्टिश्च त्वचासत्यमवाप्नुयात् ॥ ४४ ॥**

ब्रह्मांड पहावें दृष्टी । त्यांत आघवी भूतसृष्टि । मग किंचितचि वाटे वेष्टी । जीवात्मा हा. ॥ २५० ॥ एकान एक पैं बाहुलें । ऐसें पिंड दृष्टींत पैं आलें । मग किंचितचि वाटलें । तयासि कीं हें. ॥ २५१ ॥ तेव्हां मी देह ऐसें म्हणितलें । अज्ञान होतें मातलें[5] । तेंचि म्हणणें पातलें । लज्जेसि कीं. ॥ २५२ ॥ तेव्हां अहंकृति उठली सहज । मी ब्रह्म ऐसा उमज । पडला तेथ माझे मी मज । विसरला पैं. ॥ २५३ ॥

१. धान्याचें शेत. २. सुरीति. ३. युद्ध. ४. समज. ५. उन्मत्त झालें, माजलें.

**सर्वसाक्षीश्वरोऽयं च पिंडे तु जीवरूपकः ।**
**ईश्वरे चोपतिष्ठंश्चैवाधिष्ठितस्त्वहंकृतौ. ॥ ४५ ॥**

ईश्वर त्रैलोक्य[1]साक्षीभूत । सर्वांचेंचि हृदयगत । सर्वत्र देखत जाणत । अंतरीचें. ॥ २५४ ॥ देह नसतां त्यासि दिसे । सर्वांसहि तोचि प्रकाशे । तयाचें स्वरूप पैं असे । रूपातीत. ॥ २५५ ॥ हें ज्ञान पैं जीवाला नसे । दृष्टीस पडलें तेंचि दिसे । देहाचेंचि मात्र कळतसे । सुखदुःख. ॥ २५६ ॥ इंद्रियां सानुकूल तें सुख । आणि प्रतिकूल तेंचि दुःख । एवं किंचित् तत्व देख । जीवा यया. ॥ २५७ ॥ विसावला देह दृश्य शरीरीं । तेथिंचें मीपण अंगीकारी । म्हणोनि विपरीत हारी[2] । आली तया. ॥ २५८ ॥ तें आघवेंचि वायां गेलें । ऐसें दमसाधनें पैं केलें[4] । सेवटीं खेंवें[3] दिधलें । शमा यया. ॥२५९॥

**शमयुक्तो भवेज्जीवो जीवन्मुक्तस्तु सर्वदा ।**
**ईश्वरस्यैक्यतां प्राप्तो नित्यानंदश्च जायते. ॥ ४६ ॥**

जयाचें भूचरत्व पैं गेलें । आणि खेचरत्व प्राप्त झालें । म्हणोनि सजीव-निर्जीव आलें । समान भागा. ॥ २६० ॥ क्षुधेचा पैंग फीटला । तृषेचा विटाळ गेला । म्हणोनि पाषाण देखोनि सुखावला । मनोभाव. ॥ २६१ ॥ ब्रह्मसूत्र देखिलें नयनीं । आणि विदेहता आली ध्यानीं । जन हें जनार्दनीं[5] । व्यापिलें आहे. ॥ २६२ ॥ ऐसी एकात्मता सहज । आहे तैसाचि पावला उमज[6] । त्रैलोक्यविस्ताराचें बीज । एकचि देखे. ॥ २६३ ॥ बीजींच वृक्ष सामावला । दृश्यभास तो आटला । मग आनंदचि दाटला । निरंतर पैं. ॥२६४॥

**एवं तु दमयोगोऽयं व्यतिरेकेण सुस्थिरः ।**
**तथा च शमयोगोऽप्यन्वयेनैव समाश्रितः. ॥ ४७ ॥**

दम म्हणजे व्यतिरेक । नँगा[7] आटुनि देखणें कनक । तेंवी नामरूपकौतुक । गाळणें जेथ. ॥ २६५ ॥ नामरूपाविरहित । देखणें जें कां सतत । सर्वांवरील हेत । सोडोनियां. ॥ २६६ ॥ अन्वय म्हणणें शम । जेंवी कंकणीं देखणें हेम । तेथ आटणीचें काम । नलगेचि कीं. ॥ २६७ ॥ तेंवी न नासतां पैं सृष्टी । परब्रह्म पाहवें दृष्टी । ऐसी जाण पैं ते गोष्टी । अन्वयाची.

---

१. तीन लोकांतें पाहणारा. २. अपजय, पराजय. ३. आलिंगन, क्षेम. ४. काम, इच्छा. ५. 'जो दंडी दुष्टाला, किंवा जन याचिती कुशल ज्याला । यास्तव जनार्दन असें, साधूंनीं नाम ठेविलें त्याला. ॥ २६ ॥' [नामार्थदीपिका–पृष्ठ १४.] ६. ज्ञान, समज. ७. अलंकाराला.

॥२६८॥ न फोडितां पैं घट । जेंवी आकाश पहाणें नीट ।कीं न फाडितां पट । पाहणें तंतू. ॥ २६९ ॥ ऐसा ब्रह्मसाक्षात्कार । पावला तो निरंतर । शमदमाचा उपकार । एवढा वरी. ॥ २७० ॥ एवं शमदम अभ्यास । निरोपिला पैं सावकाश । पुढील अनुसंधानीं उल्हास । श्रवणासि असो. ॥ २७१ ॥

**इति श्रीसिद्धांतसंहितायां सोहिराविरचितायां शमदमाभ्यासयोगो नाम पंचमोऽध्यायः संपूर्णः ॥**

---

## अध्याय सहावा.

**संन्यासित्वं मुमुक्षुत्वं भवेन्निस्पृहतां तथा ।**
**आचाराणां च शुद्धत्वमेतज्जिज्ञासुलक्षणम्. ॥ १ ॥**

जन्ममृत्यूची वीट । जयासि आला पैं नीट । म्हणोनि सार्थकाची वाट । योजिली त्यानें. ॥ १ ॥ जन्मासि कारण वासना । मनीं उठती भास नाना । ते नासूनि निदाना[2] । इच्छा करी. ॥ २ ॥ मोक्षासि कारण ज्ञान । ज्ञान व्हावया सज्ज्ञान[3] । तो पाहोनियां चरण । त्याचेचि धरी. ॥ ३ ॥ तया उपदेशें करुनि । आर्त जिज्ञासु होउनि । तद्रूप चिंतोनि । राहे जो कां. ॥ ४ ॥ तोचि मुमुक्षु म्हणावा । आत्मजिज्ञासु जाणावा । कारण म्हणे ध्यावा । मोक्षोपाय. ॥ ५ ॥ तो मोक्ष म्हणणें कासया । ऐक तयाचिया अभिप्राया । पुनरपि पैं काया । धरणेंचि नलगे. ॥ ६ ॥ नाशिवंत नासोनि पहावें । नैराश्याचें रान ध्यावें । तयासि कीं म्हणावें । संन्यास ऐसें. ॥ ७ ॥ मिथ्या तयाची आशा कांहीं । प्रपंचाचा हर्ष नाहीं । धर्मपत्नीचे ठायीं । नियम जो कां. ॥ ८ ॥ ईश्वराज्ञेचा शोध करी । तद्रूपचि कीं आचार धरी । जीवन्मुक्ताची परी । जाण ऐशी. ॥ ९ ॥

**यच्छरीरं तपस्तप्तं यन्मनो ध्यानतत्परम् ।**
**ईक्षत आत्मरूपं चाभेदं तु दृश्यवस्तुषु. ॥ २ ॥**

शरीराचिये ठायीं तप । कीं मनाचे ठायीं ध्यानदीप । जप ध्यानें करूनि रूप । न्याहाळणें[4] तें. ॥ १० ॥ पाहाणें हारपे तें पाहाणें । आणि न पडतां राहाणें । तयासीच कीं म्हणणें । आत्मरूप. ॥ ११ ॥ आत्मानात्मविवेक ।

---

१. वस्त्र. २. शेवटा. ३. उत्तम ज्ञानी. ४. पाहाणें.

सर्व आटुनि पहावें एक । जेंवी न आटतां कनक । नगीं जैसें. ॥ १२ ॥ सर्वद्रष्टा सर्वगत । अश्रवण सर्व श्रुत । अव्यय मूळभूत । परमात्मा जो. ॥ १३ ॥ तो यथार्थ प्रसिद्ध जाणावा । जाणतचि पैं नेणावा । नेणतांचि म्हणावा । मीच तो कीं. ॥ १४ ॥ ऐसें गुरुगम्य कुवाडें । उमजतांची कानडें । तें दैवाचेनि सुरवाडें । सोह पैं होय. ॥ १५ ॥

**तस्य त्वपरिच्छिन्नं ब्रह्मचर्यं तत्त्वचिंतनम् ।**
**आदिदेवे महेशे तु तस्य श्रद्धा च जायते. ॥ ३ ॥**

ब्रह्मचर्यादि व्रत । कैसियेपरि आचरत । स्वस्त्रियेसि गृहस्थ । नियम धरी. ॥ १६ ॥ कीं वेषधारी संन्यासी । निपटुनिच रति ग्रासी । तें ब्रह्मचर्य ऐसी । दशा जाण. ॥ १७ ॥ चर्या आघवी ब्रह्म झाली । हृदयीं ब्रह्मत्वदशा आली । तेथ ब्रह्मचर्याची बोली । आवंतूं निकें. ॥ १८ ॥ चिंतनचि झालें अभिन्न । चित्तासी हारपलें भिन्न । उरलें चिन्मात्र चैतन्य । निखिल पैं तें. ॥ १९ ॥ जो आदिदेव महेश । भक्तिचेनि झाला वश । ते भक्तीच कैसी अवश्य । ऐक पैं गा ! ॥ २० ॥ एकचि पैं ऐसें जाणें । आणि वर्तणें जें दुजेपणें । तें भजकभावें करणें । पडे ऐसें. ॥ २१ ॥ जेंवी नगत्व सोनिया भजे । तरंग सागरा सहजें । कीं तारुण्यपण लाजे । जयापरि. ॥ २२ ॥ ऐसी आचरतां पैं भक्ति । आंगीं बाणोनि विरक्ति । मग जयाचिया मुक्ती । स्वाधीन होय. ॥२३॥

**अजे तु शाश्वते नित्ये चिरस्थे पुरुषे परे ।**
**यस्यैकाग्र्यं समाधानं तद्वै जिज्ञासुलक्षणम्. ॥ ४ ॥**

एकाग्र ज्याचें साधन । अकल्पित आराधन । त्रैलोक्य बीजाचें साधन । होय जेथें. ॥ २४ ॥ अजो म्हणतां जन्म नाहीं । तया नाश कैंचा कायी । म्हणोनि तयाचिये ठायीं । कर्महि नसे. ॥ २५ ॥ जो शाश्वत असे नित्य शुद्ध । चिरंजीव चिदानंद । जो पराब्जमकरंद । अविकृत. ॥ २६ ॥ विश्वंभर विश्वैकधाम । जो भक्तकाजकल्पद्रुम । जो हृदयभुवनींचा आराम । योगेश्वर. ॥ २७ ॥ जो दिग्विजय दिव्यमान । सर्वभूत सनातन । जयानें पैं गगन । घातलें पोटीं. ॥ २८ ॥

**शून्यध्यानयुतो नित्यं सहस्रदललक्षितः ।**
**स्थिराक्षो ब्रह्मरंध्रे तु निरिच्छो वायुरोधकः. ॥ ५ ॥**

---

१. कूट. २. बोलावूं. ३. अविनाश. ४. बाग.

शून्यामाजी ध्यान लागे । नित्य दृष्टी तेंचि जागे । अभ्यास पैं हा मार्गे । सरे जेथ. ॥ २९ ॥ सहस्त्रदळामाजी[1] लक्ष । जेथ मावळे सर्वसाक्ष । तेथ हे दोन्ही अक्ष[2] । उठले होती. ॥ ३० ॥ तेथ उपशम मानसा घडे । स्थीर होती नेत्रकवाडें । मंडळ काजळी आंतुलीकडे । गर्क होय. ॥ ३१ ॥ ब्रह्मरंध्राभीतरी । पवन हा पैं कुंभककरी । तेथ वासना संहरी । योगाग्नीनें. ॥ ३२ ॥ ऐसा अभ्यास होय पैं गाढा । तरी लाभ होय पैं येवढा । नाहीं तरी बडबडा । आवडे तैसें. ॥ ३३ ॥

**चांद्री सौरी सुषुम्ना च तासामैक्यपथात्खलु ।**
**त्रिकुटं संचरेन्नित्यं समाधौ सुखमश्नुते. ॥ ६ ॥**

इडा ते चंद्रनाडी । पिंगळा सूर्यतेजें कडाडी । सुषुम्ना मार्ग काढी । गुप्त तेथ. ॥ ३४ ॥ ऐसा तिहीं संधींचा एकवटा । करोनि निघावें त्रिकुटा । तेथ धीरें धीरें वाटा । चालिजे पैं. ॥ ३५ ॥ ऐसी युक्तीचिया लघिमा[3] । योगाभ्यासाचिया क्रमा । स्थीर होइजे व्योमा । जंववरी कीं. ॥ ३६ ॥ मग विश्वआभास वितुळे । ज्ञान ज्ञानाशीं तुळे । आपुलें रूप आपणा कळे । तया मित्रें. ॥ ३७ ॥ सर्व असे पैं ठावुकें । परि आपण कवण हें न ठावकें । ते विस्मृतिच थोके । आघवीच पैं. ॥ ३८ ॥

**तस्मिन्नित्ये निमग्नश्च संतुष्टः सततं सुखी ।**
**तुल्यग्रामवनश्चैव प्रहृष्टात्मा च हर्षितः ॥ ७ ॥**

निजबोधें पैं निमग्न । संतुष्ट होउनी संलग्न । वासनावसनातीत[4] नग्न । सदैव जो कां. ॥ ३९ ॥ ज्यासि अरण्य ग्राम समान । पाहातां करी हास्य वदन । भगवंताचें लालन । लीला दिसे. ॥ ४० ॥ चालती झाडें न चलती दिसे । तें चिदारण्यचि अवघें दिसे । तेथ ईश्वर[5] तेज प्रकाशे । दृष्टी पुढें. ॥ ४१ ॥ मग दृष्टींत दृष्टी आटली । तेथ आत्मकळा ऐसी वाटली । निभ्रांत भ्रांति फीटली । मानसाची. ॥४२॥ जेथ चोखाळलें[6] मन । जैसें निरभ्र पैं गगन । ध्येय ध्याता अनुसंधान । मोडलें जेथ. ॥ ४३ ॥

---

१. सहस्त्रदल हें योगशास्त्रांत (सकलदलसंज्ञक) शेवटचें मोठें चक्र आहे. २. डोळे. ३. लहानपणा. ४. कामना व वस्त्र यांपासून दूर झालेला. ५. 'आहे ऐश्वर्य जया निरुपाधिक जो धणीच जगताचा । यास्तव ऋषिवदनांतुनि ईश्वर ऐशीच जाहली वाचा. ॥ ३६ ॥ [नामार्थदीपिका–पृ० ४-५] सागर शक्तीचा जो, किंवा शास्ता समस्त विश्वाचा । यास्तव ईश्वर ऐशी उद्भवली ऋषिमुखांतुनी वाचा. ॥ ७४ ॥ [नामार्थदीपिका–पृ० ९.] ६. चोख, निर्मळ झालें.

**सुंदरीषु कुरूपासु यस्य भावः समश्च वै ।**
**शुभाशुभसमो यश्च सुखदुःखसमः खलु. ॥ ८ ॥**

जेथ तारुण्य स्त्री सुंदर । कीं कुब्जा[1] कुरूप वृद्धनार । पडलिया दृष्टी समोर । समान वाटे. ॥ ४४ ॥ जैसा सुवर्ण कैलश[2] नेटका । आणि मृत्तिकेचा फुटका । परि दोघांसि व्यापिलें एका । आकाशानें. ॥ ४५ ॥ नेटका देखोनि उदक भरी । फुटकिया मातीचा खेळ करी । तेंवी रजतम स्वीकारी । समत्वेंचि. ॥ ४६ ॥ तेंवी बोखटें गोमटें भूत । तयातें हालवी भगवंत । आधींच उमटे हृदया आंत । देखणें तें. ॥ ४७ ॥ अन्वयें समत्वचि देखे । व्यतिरेकें दोन्हींवरी थुंके । म्हणोनि स्वीकार त्यागासारिखें । देखणें तें. ॥ ४८ ॥

**छलखेलसमो यश्च व्योमभूमिसमः खलु ।**
**जलवायुसमो भूत्वा भूमौ चैतन्यमीक्षते. ॥ ९ ॥**

निर्भर्त्सितां तें समत्व । कीं विलासीं देखे एकचि तत्व । तेंवी सर्वेचि भूतत्व । चैतन्य झालें. ॥ ४९ ॥ अवकाश गाळुनि गगन । कीं चांचल्य काढुनि पवन । दाहकत्वावांचुनि दैहन[3] । देखणें जें. ॥ ५० ॥ आर्द्रता[4] काढुनि निरा । कीं जाड्यत्व टाकुनि धैरा[5] । कल्पना टाकुनि विचारा । देखणें जैसें. ॥ ५१ ॥

**तेजोबीजादिसर्वेषु मूलमेकं च पश्यति ।**
**अतो शोच्यश्च भूतेऽसावद्वेष्यस्तुल्यभावनः. ॥ १० ॥**

एकचि बीजें सर्व होती । एकाचि तेजें सर्व पाहाती । एक महीवरी सर्व राहाती । समानत्वें. ॥ ५२ ॥ एक अन्न सर्व खाती । एक जीवन[6] सर्व पीती । सर्वांसि एक दिनराति । वर्तणें जैसें. ॥ ५३ ॥ एक वन्ही अनेक वाती । अनेक दीप एक ज्योति । एकचि देव सर्व ध्याती । विविध भावें. ॥ ५४ ॥ ऐसें हें ज्ञानियां दिसे । म्हणोनि तयांचा भेद नासे । अंतरींच प्रकाशे । साम्यदशा. ॥ ५५ ॥ म्हणोनि तयातें द्वेष नाहीं । शोकही न शिवे कांहीं । देहीं असोनि विदेही । झालाचि तो. ॥ ५६ ॥

**प्रपद्यते परं धामं पवित्रं मंगलं परम् ।**
**अव्यक्तं परमं गुह्यं सद्गुरोः कृपया खलु. ॥ ११ ॥**

---

१. कंसाची अष्टवक्रा दासी. २. कळशी, भांडें. ३. अग्नि. ४. ओलेपणा. ५. पृथ्वी. ६. पाणी, जल.

पावला पैं परमधाम । तीर्थाहुनी पवित्र परम । ऐसा मोक्षोपाय सुगम । परम झाला. ॥ ५७ ॥ जन्मांतर वासनामूळ । निघोनि झाला पैं निर्मळ । परब्रह्म केवळ । [1]लाधला तो. ॥ ५८ ॥ तीन्ही [2]अवस्थांभीतरी । जीवित्व वाढलें नानापरी । तें आघवेंचि पडलें हारी । जयाचिया. ॥ ५९ ॥ जें जीवित्वाचें स्थान । तेंचि झालें ब्रह्मसदन । चिदानंद चिद्घन । वर्पला तो. ॥ ६० ॥ जें अव्यक्त परम गुह्य । तेंचि पाहिलें कीं सबाह्य । तें सद्गुरुकृपें पेय । प्रकाशिलें जैसें. ॥ ६१ ॥ ऐसें [3]पूर्वसुकृतें केलें । जें अव्यक्त व्यक्तिसी आलें । अज्ञानचि ज्ञान झालें । जया कृपें. ॥ ६२ ॥

**निष्कामकर्मजं पुण्यं पूर्वजन्मार्जितं च तत् ।**
**श्रद्धयान्वितमंतश्चात्र वै सद्बुद्धिदं परम् ॥ १२ ॥**

पूर्वजन्मीचें सुकृत । निष्कामधर्में आचरत । मोक्ष उद्देशें करित । सुकृतकर्में. ॥ ६३ ॥ तया सर्व कर्मांचें फल । बुद्धिच होते पैं निर्मळ । रजतमाचे फिटती मळ । अनायासेंचि पैं. ॥ ६४ ॥ बुद्धि रज आरसा । उठे तें बिंब [4]बहुवसा । तेथ मुखकमलठसा । उमटे पैं गा ! ॥ ६५ ॥ मग [5]प्रतीति उमटे भगवंताची । सेवा करणें संतांची । ऐसी अकस्मात् अंतरींची । वासना होय. ॥ ६६ ॥ मग भक्ति झालिया ज्ञान । प्राप्त होत समाधान । आणि वैराग्य दिव्यांजन । सुये डोळां. ॥ ६७ ॥ तेथ तिन्ही होतां एकरूप । मग रूपींच दिसोनि अरूप । आत्मा स्वयंप्रकाश दीप । उजळे जैसा. ॥ ६८ ॥

**स इच्छत्यात्मतत्त्वं चैवाभ्यास्त आत्मशोधनम् ।**
**अर्थार्थी दर्शनं ज्ञानं प्राप्नोति परमं पदम्. ॥ १३ ॥**

आत्मतत्त्वाची इच्छा करी । आत्मजिज्ञासे इच्छा धरी । अर्थार्थ आचरी । योगमुद्रा. ॥ ६९ ॥ जेणें ज्ञान होय पूर्ण । भूमिका जितिलिया संपूर्ण । तेणें फिटे [6]आवरण । अज्ञानाचें. ॥ ७० ॥ तेणें प्राप्त होय मोक्षपद । सहज हा अद्वयानंद । तेणें [7]वृत्ति पावे मंद । प्रपंचेशीं. ॥ ७१ ॥ प्रपंचा नाहीं पंचपण । सबाह्य झालिया आपण । हे तयाची पैं खुण । तोचि जाणे. ॥ ७२ ॥ पृथ्वींतील गुप्त धन । पायाळाचेचि देखती नयन । तोहि कीं साधनांजन । [8]सुयेल

---

१. प्राप्त झाला. २. बालपण, तारुण्य व वार्धक्य ह्या तीन अवस्था. ३. मागल्या जन्मांत केलेल्या पापामुळें. ४. अनेकप्रकारचें. ५. अनुभव. ६. वेष्टण. ७. मनोवृत्ति. ८. अंजन डोळ्यांत घालील तेव्हां.

तेव्हां. ॥ ७३ ॥ तेंवी जन्मांतरींचा संस्कारी । प्रस्तुत तोचि अभ्यास करी । आणि गुरुकृपा जयावरी । पूर्ण आहे. ॥ ७४ ॥ संसारीं असोनि उदासीन । अंतरींच आहे निमग्न । तोचि जाणे महिमान । तेथिचें पैं. ॥ ७५ ॥

**विरक्ता मोक्षमिच्छंति कल्पंते क्षणिकं जगत् ।**
**नाशयंति च मोहं ते सज्ज्ञानं प्राप्नुवंति हि ॥ १४ ॥**

वैराग्य होतां अंतरीं । मोक्षाचीच इच्छा करी । अध्यात्माहुनि क्षणभरी । उगा न राहे. ॥ ७६ ॥ नैराश्य भाषणाची आवडी । इतर नायकें परवडी । क्षीरनीरातें निवडी । हंस जैसा. ॥ ७७ ॥ क्षणिक मिथ्या संसार । ऐसें देखे वारंवार । सत्वगुणांचा संचार । होय जेथें. ॥ ७८ ॥ शेवटवरी तेंचि जागे । निदान चांगलें लागे । विक्षेपें झालिया मागें । परतणें होय. ॥ ७९ ॥ कांहीं रजतमाचिये प्रसंगीं । मोह संचरेल पैं आंगीं । तयेवेळीं आकाररंगीं । मन हें बुडे. ॥ ८० ॥ तेव्हां मोहजाळ पडे दुर्घट । वासना होइजे दाट । मग फुटे पैं वाट । परमार्थासी. ॥ ८१ ॥

**वर्धमाना विकारास्तु गुणधर्मविभागशः ।**
**तत्सादृश्येन कर्मात्र क्रियते सर्वजंतुभिः. ॥ १५ ॥**

जेथ सत्व रज तम । परम जे कां उद्दाम । विकाराचा संभ्रम । होय जेथें. ॥ ८२ ॥ सात्विकें सत्कर्म उठे । बुद्धी लागे स्वधर्म वाटे । आणि राजसासी वाटे । विषय गोड. ॥ ८३ ॥ तामसां न करावें तेवढे । इच्छा जेथ पैं वाढे । मग पंच भूतिक गाढे । लोटती जेथ. ॥ ८४ ॥ तदनुसारें सकल जीव । वर्तती तेथ सावयव । मग संचिताचें पेंवें । तेंचि होय. ॥ ८५ ॥ कर्मानुरूप जन्म घेती । जन्मासारिखें कर्म करिती । तयासारिखें भोगिती । सुखदुःख पैं. ॥ ८६ ॥

**प्राप्यते कर्मणा केन किं जन्म किं फलं कथम् ।**
**कविभिः सुखदुःखं च वियोगो योग एव हि. ॥ १६ ॥**

कवण फल कैसें कर्म । कैसा पडे जीव धर्म । कवण योग पैं वर्म । सुखदुःखाचें. ॥ ८७ ॥ आत्मज्ञानाचा संयोग । कां पडे तया वियोग । आणि कैसेनि तो भवरोग । प्राप्त होय ॥ ८८ ॥ कवण आचारें कैसी प्राप्ति । प्राणी

१. खोटा. २. खाण.

पडती अधोगति[1] । तेंचि निरूपण प्रस्तुतीं । कथणें येथें. ॥ ८९ ॥ हें कळलिया द्रष्टत्व होय । फिरोनि न धरी त्याची सोय । तोचि पैं अभिप्राय । विवेकाचा. ॥ ९० ॥ शरीराचें संरक्षण । तेथ गुणांचें पडे वेष्टन । परि तया आंत अलिप्तपण । बुडों नये. ॥ ९१ ॥ तो गुणत्रयांचा[2] मेळ[3] । देहीं कैसा घडे खेळ । ते यथास्थित न्याहाळ । ज्ञानदृष्टीं. ॥ ९२ ॥ देखोनि तयातीत व्हावें । तेव्हांचि तो बंध न पावे । त्यांतचि असतां स्वभावें । प्राप्ती पावे तें फळ. ॥ ९३ ॥ म्हणोनि गुणाचें कारण । कैसें फल भोगवी जाण । म्हणोनि तयाचें निरूपण । ऐक आतां. ॥ ९४ ॥

**सत्वात्स्वर्गापवर्गौ च प्राप्येते रजसस्तु वै ।**
**सुखदुःखयुतं जन्म तमसः पापसंयुतम्. ॥ १७ ॥**

सत्वाचिये रहाटीं[4] । निष्काम बैसणें मोक्षपटी । सकामें बैसणें पाठीं । स्वर्गाचिया. ॥ ९५ ॥ राजसाचेनि संयोगें । मृत्युलोकीं यावें लागे । तेथ मनुष्याचीं सोंगें । धरणें पडे. ॥ ९६ ॥ सोंग ऐसें नुमजे भ्रमें । आपुलें रूप म्हणोनि रमे । तेथ पैं संसारविभ्रमें । दुःख पावे. ॥ ९७ ॥ तयावरी तामसा । हिंसेचा पडे धिंवसा[5] । शेवटीं परम क्लेशा । पात्र होय. ॥ ९८ ॥ तेथ जन्म पावे ऐसा । सदां पात्र होय उपवासा । ध्यावयालागीं वांसा । न मिळे कांहीं. ॥ ९९ ॥

**मानुषं दुर्लभं जन्म समानपुण्यपापजम् ।**
**स्वर्गे वसंति पुण्याश्च सायुज्यं यांति निर्गुणाः. ॥ १८ ॥**

पुण्यपाप समान व्हावें । तेव्हां मनुष्याचा जन्म पावे । आधवें पुण्यचि करावें । स्वर्गप्राप्ती तेव्हांचि. ॥ १०० ॥ नाहींच पातकाचा लेश । तरीच स्वर्गी प्रवेश । कांहीं रजतमाचा अंश । तेणें प्राप्त मृत्युलोक. ॥ १०१ ॥ ऐसा गुणांचा खेळ वाढे । तवचि जीव हा व्यसनीं[6] पडे । आणि गुणातीत तो चढे । सायुज्यपदा. ॥ १०२ ॥ सात्विकें स्वर्वासि पावे । तेथ दिव्य भोग पैं भोगावे । मग पुण्य सरलिया यावें । मृत्युलोका. ॥ १०३ ॥ तेथ सुखदुःखाचें फळ । क्षणेक भोगावें सकळ । वास्तव्य करावें स्वल्प काळ । देहामध्यें. ॥ १०४ ॥ त्रिविध तापें तापावें । भलतिये गोष्टीसि कांपावें । पोटासाठीं फिरावें । जेथें तेथें. ॥ १०५ ॥

---

१. नरकांत. २. सत्व, रज, तम हे तीन गुण. ३. समूह. ४. राहटी=वागणूक, आचार. ५. भय, भीती. ६. संकटांत.

**तमसः कीटका व्याघ्रा सर्पाश्च प्रस्तरा खलु ।**
**वृक्षाश्च निष्फलाः शश्वज्जायंते पापकर्मभिः ॥ १९ ॥**

दुर्गंधींत कीटक व्हावे । अथवा व्याघ्रदेह वसवावें । हिंसा करोनि मांस खावें । कदाकाळीं. ॥ १०६ ॥ तावत्क्षुधेनेंचि पिडावें । अखंड अटवीं धुंडावें । तैसाचि पैं जन्म पावे । पापास्तव. ॥ १०७ ॥ कीं सर्पाचें शरीर धरी । तेथ वाराचि पैं भक्षण करी । कवणहि देखिलिया मारी । निर्दयत्वें. ॥ १०८ ॥ अथवा पाषाण होउनि पडे । जेथ स्थावरत्वेंचि अडे । कीं वृक्ष होउनि वाढे । निर्फळ जैसा. ॥ १०९ ॥ ऐसा तमोगुणाचेनि मांजें । उद्दाम कर्म होय सहजें । तयाचें उसणें निस्तरिजे । प्रकारें यया. ॥ ११० ॥ जैसें पैं कर्म करावें । तैसेंचि तयानें पावावें । तें भोगावया व्हावें । शरीरधारी. ॥ १११ ॥

**एवं सर्वं च दृश्यं वै विनष्टं ज्ञानदर्शने ।**
**आप्तसिद्धिश्च जातात्र ब्रह्माहं व्यापकः स्वयम्. ॥ २० ॥**

ययापरी जीव सृष्टी । ज्ञानें पाहतां न पडे दृष्टी । ते देहातीत पृष्टी । देखणें या. ॥ ११२ ॥ जेथ सृष्टीचा होय लोप । तेथ उजळे आकाशदीप । तेथें रितें होइजे माप । शून्याचें पैं. ॥ ११३ ॥ ऐसी आत्मदर्शनाची सिद्धि । सहज पावे त्रिशुद्धी । अकल्पित अक्षय पदीं । लाभ झाला. ॥ ११४ ॥ 'मी ब्रह्म' ऐसा बोध झाला । तोचि सर्वत्र पैं व्यापला । जेथ परावा आणि आपुला । दोन्ही नाहीं. ॥ ११५ ॥ चिन्हेंचि चिन्हें झांकिलीं । झांकिलींच प्रकट झालीं । तेथ सहज पैं निवाली । मनोबुद्धी. ॥ ११६ ॥ ऐसें ज्ञान झालें अंतरीं । भोग राहिला शरीराघरीं । तेथिल देख तेथ धरी । ऐसें नाहीं. ॥ ११७ ॥

**गुणधर्मविभागेन जीवोऽयं देहकर्मणा ।**
**भोक्ताहं मन्यतेऽज्ञानादात्मा वै जन्मकर्मभाक्. ॥ २१ ॥**

शरीराचिया संयोगें । गुणत्रयाचिया संगें । कर्माचिया रंगें । रंगाथिला. ॥ ११८ ॥ जेथ पंचभूतांचा कर्दम । तेथ कर्माचा उपक्रम । सुख आणि श्रम । आघवाचि पैं. ॥ ११९ ॥ विषयवांछा भूतांयोगें । सुखही पावे भूतां

---

१. अरण्यांत. २. फिरावें. ३. साप वायुभक्षक आहेत असें प्रसिद्ध आहे. ४. मदानें. ५. 'अहं ब्रह्मास्मि' असें महावाक्य आहे. ६. परक्याचा. ७. चिखल.

संगें । भूत वैषयीं व्यापिला रोगें । दुःख पावे. ॥ १२० ॥ चैतन्याचा प्रति अंश । जेंवी घटीं कीं तें आकाश । तेंवी देहाचिये उपाधीस । जीव गुंते. ॥ १२१ ॥ अज्ञानभ्रमें गुंतला दिसे । परी तो न गुंततांचि असे । घरीं दीप जैसा प्रकाशे । साक्षीभूत. ॥ १२२ ॥ लोहाचे संगतीं असे । तंव अग्नीच लोहीं पेटला दिसे । तेंवी आत्मा आला जीवदशे । ऐसें गमे. ॥ १२३ ॥ पंचभूतांची सांगडी । तंव कर्माची पडे पैं बेडी । ऐसा कवण असे मोडी । भोक्तृत्व तें. ॥ १२४ ॥

**तावद्भोगास्तु भूतानां यावद्वै तस्य भावना ।**
**अनेकधा विकाराश्च भवंति पूर्वकर्मभिः. ॥ २२ ॥**

तंववरी सर्व भोग असे । जंववरी विश्व हें भासे । भूतभविष्य वसे । प्राचीन पैं. ॥ १२५ ॥ मनासी कळोनि घडे । होणार तें प्रत्यक्ष पडे । आवडतें होऊनि जडे । जीवासीच. ॥ १२६ ॥ काम क्रोध विकार वृत्ति । तैसीच होइजे बुद्धि । तदनुसारें विचारसिद्धि । करणें तया. ॥ १२७ ॥ पूर्वार्जितासारिखें । कर्म भोगितां प्रत्यक्ष देखे । मग तयांचि हरिखें[1] । असणें तया. ॥ १२८ ॥ ऐसा भोगबलात्कार । यांतूनि न सुटे कोणीच नर । म्हणोनि ज्ञानाचा प्रकार । पाहावा कीं. ॥ १२९ ॥

**लिंपंति तेषु येनैव तत्वज्ञानबलेन च ।**
**निर्विकल्पं च पश्यंति सविकल्पसमाधिना. ॥ २३ ॥**

ऐसिया विकारामाजि अलिप्त[2] । कैसें राहणें पडे गुप्त । तया विवेकाची व्याप्त । कवणिये परि. ॥ १३० ॥ तत्वज्ञानाचिया सामर्थ्यें । कवणेंचि परि न गुंतिजे अर्थें । तें प्रकटचि पैं परमार्थें । कळलें व्हावें. ॥ १३१ ॥ सविकल्प समाधियोगें । जात आहे प्रवृत्तिमार्गें । तेथुनी निर्विकल्पीं लागे । लक्ष जेथें. ॥ १३२ ॥ निरामय दृष्टीं भरे । तेथ संसार संहरे । मग अलिप्तता उरे । सहजचि ते. ॥ १३३ ॥ घृत उदकीं मिसळलें । तें आग सांडुनी वेगळावलें । मग अग्नीवरी ठेविलें । घृतचि उरलें तेव्हां कीं. ॥ १३४ ॥ तेंवी ज्ञान अज्ञान एक झालें । शरीराठायीं विसांवलें । मग निरीक्षितां[3] नासलें । अज्ञानचि. ॥ १३५ ॥ ज्ञान उरलें अविनाश । अंतरीं प्रकाशला प्रकाश । तेणेंचि अलिप्त आकाश । सकळां जेंवी. ॥ १३६ ॥

१. हर्षानें, आनंदानें. २. निराळा. ३. निरीक्षण करतां, परीक्षा करतां.

**तत्र ते व्यक्तिशून्यश्च गमनागमवर्जिताः ।**
**सर्वेष्वंतर्गतात्मानो बाह्यवेषसुधारकाः ॥ २४ ॥**

जेथें आकाराचिया माजिवडां । येणें जाणें पडे निवाडां । आत्मप्रकाश सुखाडां । पावे जेथ. ॥१३७॥ येणें जाणें शब्दमात्र । स्वयंभ स्वतंत्र चिन्मात्र । गमनागमन पात्र । नव्हेचि तें. ॥ १३८ ॥ जेथ आलियांत दिसे गेला । गेलियांत दिसे आला । जेथ आत्मबोध नवला । दिसे ऐसें. ॥ १३९ ॥ आंतलें ज्ञान आपणीं ठावें । बाह्य संपादणी स्वभावें । वरी नट जैसा लाघवें । अनेकीं नटे. ॥ १४० ॥ वरील वेषाचा विस्तार । [1]उदंड करितसे प्रकार । परि मूळ स्वरूपाचा विसर । न पडे तया. ॥ १४१ ॥

**ते वर्णाश्रमधर्मेषु प्रपंचसाधने तथा ।**
**असंगाश्च विमुक्ता वै नाटके तु नटा यथा. ॥ २५ ॥**

वर्णाश्रमाचा आचार । प्रपंचाचा घराचार । [2]सप्त धातु व्यवहार । करणें जो कां. ॥ १४२ ॥ ब्राह्मणानें ब्रह्मकर्म । क्षत्रियें [3]संग्रामधर्म । वैश्यानें राखिजे वर्म । उद्यमाचें. ॥ १४३ ॥ शूद्रानें रक्षिजे सेवा । सांडुनी देहबुद्धीचा हेवा । सर्वीं पहावें स्वयमेवा । आत्मयासी. ॥ १४४ ॥ आत्मया नाहीं व्यक्तिवर्ण । नव्हेचि तो [4]चारीवर्ण । सर्वांचे शब्द ऐकती कर्ण । परि ऐकणें नव्हे तें जाती. ॥ १४५ ॥ सकलरूपें देखती नयन । परि रूपचि देखणें नव्हे जाण । अवघे रस सेवी [5]रसना आपण । परि रसना नव्हे रसरूप. ॥ १४६ ॥ तेंवी आत्माद्रष्टा सर्व देखे । परि आपण न गवे रूप रेखें । जैसा आपण रुतविता मुखें । न रुते जैसा. ॥ १४७ ॥ म्हणोनि आघविया पदार्थां । कैसेनि भुले तो निर्मिता । देहीं असोनि देहातीता । जाणणें ऐसें. ॥ १४८ ॥

**ब्रह्मानंदनिमग्नाश्च तेंऽतरात्मसुखेन वै ।**
**नित्यज्ञानरता दृश्ये निरालंबस्य दर्शनम्. ॥ २६ ॥**

अंतराचिये ठायीं देख । झालें असे आत्मसुख । ब्रह्मज्ञानाचा [6]हरिख । वोसंडे तया. ॥ १४९ ॥ नित्य करावें भगवद्ध्यान । निरालंबाचें चिंतन । अन्वय दृष्टीं अवलोकन । सृष्टी करी. ॥ १५० ॥ दृष्टी निरखुनियां पाहे । तेथ

---

१. पुष्कळ, बहुत. २. सोनें, रुपें, तांबें, कथील, शिसें, लोखंड व जस्त ह्या सप्त धातु. ३. युद्धकर्म. ४. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण. ५. जिव्हा. ६. हर्ष, आनंद.

भगवंतचि पैं आहे । मग देखणियां मध्यें राहे । निरंतर. ॥ १९१ ॥ ब्रह्मीं सर्वेचि पाहिलें । ब्रह्म कशांत नाहीं राहिलें । चित्र भिंतीवरि मिरवलें । परी भिंती नोहे. ॥ १९२ ॥ तेंवी विश्वाकारें भासला । परी विश्व नाशें न नासला । क्षर नाशीं अक्षर उरला । अर्थ तैसा. ॥ १९३ ॥

**आत्मानुभवसंधानं नामरूपविवर्जितम् ।**

**कर्मकारणभस्मीकृत्क्रियमाणविनाशकम्. ॥ २७ ॥**

नामरूपाविरहित । परमात्मा जो गुणातीत । सर्व व्यक्त नैराश्ययुक्त । एक झाला. ॥ १९४ ॥ अनुसंधान लावितां तेथ । क्रियमाण जळालें येथ । तेणें जन्ममृत्यूचा पंथ । वोस पडे. ॥ १९५ ॥ ज्ञान अग्नीची संततता । कर्म जळालें करीत असतां । जेंवी बरवेपण पैं पुसतां । मृत्यु सांगे. ॥ १९६ ॥ तेंवी सारासारविचार करितां । प्रपंचाची मिथ्या वार्ता । ऐकतांचि सर्वार्थ तत्वता । मिथ्याचि झाला. ॥ १९७ ॥ मिथ्यापणेंचि देखिला । आणि न सोडितां पैं सांडिला । सद्गुरुनें काढिला । मार्ग ऐसा. ॥ १९८ ॥ जन्ममरण पैं चुकविलें । अज्ञान आपणां मुकविलें । आणि ज्ञानासि पैं सुखविलें । एकटेपणीं. ॥ १९९ ॥

**मुक्तस्य न पुनर्जन्म न दुःखं नैव गर्भता ।**

**नास्ति तु मरणं तस्य दृश्यं सर्वं न विद्यते. ॥ २८ ॥**

पुनरपि जया जन्म नाहीं । मरण न पावे कहीं । गर्भवास वरणें[1] तोही । अंतरला कीं. ॥ १६० ॥ गर्भवासीं परम दुःख । बाहेरि पडतां तेंचि देख । केवळचि पैं वीख । वोगरूनि[2] ठेलें ॥ १६१ ॥ आणि दुःखचि ऐसें नावडे । सुखाचिये सारिखें आवडे । जन्मला तितुका नाडे[3] । देहासंगें. ॥ १६२ ॥ शरीर नोहे हे संवचोर । विश्वास दावुनी कापी शीर । तेंवि लावितां गोडी अधीर । जीवासि सांडी. ॥ १६३ ॥ जीव मानी दुजेपण । देह तेंचि म्हणवी आपण । केवळचि विसरला खुण । आत्मयाची. ॥ १६४ ॥ ऐसें अभिलाषा पैं बळ । शरीरचि एक कीं मूळ । जीवा गमलें हें टवाळ । तेथुनि नाहीं. ॥ १६५ ॥

**अज्ञस्य तु पुनर्दैवं पुनर्व्याधिश्च दीनता ।**

**पुनः पुत्राश्च मित्राणि कलत्रं च तथाश्रमाः. ॥ २९ ॥**

---

१. धारण करणें, भोगणें. २. वाढून. ३. त्रासे, त्रासयुक्त होई.

नैश्वर विषयांचें भाग्य । कांहीं दिवस दिसे योग्य । मग दारिद्र येतां अयोग्य । आघवेंचि वाटे. ॥ १६६ ॥ कांहीं दिवस रोगी व्हावें । बिभित्स होउनी पडावें । मग वैद्यासि शरण जावें । निरुजा[1] व्हाया. ॥ १६७ ॥ पुत्र मित्र कलत्र[2] देहीं । त्यांशीं धरावी मागुति सोयी । उपजत पडावें भुई । तेथचि पडणें. ॥ १६८ ॥ मागुतीं दिवस मागुतीं राती । हेंचि देखतां दिवस जाती । देहायोगें सर्व खंती । श्रम होती निरर्थक. ॥ १६९ ॥ ऐसें मागुतीं मागुतीं पडे । तें राहिलें एकीचकडे । आत्मज्ञानें द्वार उघडें । मुक्तीचें केलें. ॥ १७० ॥

**सेव्यसेवकयोर्भावः स्तनपानं पुनः पुनः ।**
**तारुण्यं चैव वार्धक्यं रूपहीनं च सर्वदा. ॥ ३० ॥**

नरदेहजन्मा यावें । तेथ आघवेंचि सेवावें । तयापासुनि चेवावें । पुनरपी पैं. ॥ १७१ ॥ मातेचें करावें स्तनपान । आणि स्त्रियेचें कुचमर्दन । बालत्वेंचि खेलन । भलतेंचि. ॥ १७२ ॥ मग पावावें तारुण्यपण । तेथ काम उन्मत्त कारण । रतिवांचोनि समाधान । नुपजे जीवा. ॥ १७३ ॥ तया नंतरें वृद्धपण । होउनी पडावें विभूषण । तें स्वरूप नव्हे माकडपण । केवळचि पैं. ॥ १७४ ॥

**नैव क्षुधा न तृप्तिश्च जीवन्मुक्तस्य सर्वदा ।**
**यदागतभ्रमो जीवो ब्रह्म संपद्यते तदा. ॥ ३१ ॥**

मागुतीं लागे भूक । मागुतीं उदर रितें[3] देख । तृप्त झालिया हांकाहाक । मागुती करी. ॥ १७५ ॥ सर्व दुःखासि कारण देह । तोचि फिटला संदेह[4] । आत्मज्ञानें विदेह । जीव केला. ॥ १७६ ॥ शरीर असे तैसें आहे । जीव देहाचा कांहींच नोहे । ऐसें आत्मत्व निःसंदेहें । पावला जाण. ॥ १७७ ॥ जैसें बीज खापरीं दग्ध केलें । डोळां असे तैसेंचि दिसलें । परि अंकुरदशे मुकलें । शिंचिलें जरी. ॥ १७८ ॥ वंध्या तरुणी असे । नित्य भोगी मैथुन दशे । परि कांहीं केल्या गर्भ नुमसे[5] । उदरीं तिये. ॥ १७९ ॥ ज्याणें पूर्व जन्म पैं निरसिला । जो कां ब्रह्मसंपन्न झाला । तयाचिये स्थितीला । देखणें कैसें? ॥ १८० ॥

---

१. रोगमुक्त होण्यास. २. बायको. ३. रिकामें. ४. संशय. ५. गर्भधारणा न होई.

**निःसंगो रमते योगी निष्कामो विगतज्वरः ।**
**संतुष्टो लोभशून्यश्च बलोन्मत्तपिशाचवत्. ॥ ३२ ॥**

निःसंग होउनी फिरे । स्वतंत्रतेचेनि विचारें । निर्लोभ संचरे । मानसामाजी. ॥ १८१ ॥ निर्लोभतेचें लक्षण । करावें पैं परीक्षण । शरीरधर्में प्रत्यक्षपण । धरितां नये. ॥ १८२ ॥ तया शरीराचाचि लोभ नाहीं । परि ईश्वरसत्तेसि करील काई ? । परी जाड्यत्वाचे ठायीं । अखंड विटे[1]. ॥ १८३ ॥ देहत्याग नाहीं स्वाधीन । तावत् व्हावें अन्नपान । न सुटे म्हणोनि उदासीन । अंतरीं आहे. ॥ १८४ ॥ जेंवी उपचार करितां ही देख । कारागृहीं न मनीं सुख । तेंवी जाड्यत्वधर्मीं विमुख । सदा साधु. ॥ १८५ ॥ सानुकूल आणि प्रतिकूल । समानचि मानीं सकल । निर्लोभ म्हणे निर्मल । त्यातें पैं.॥१८६॥ काया हे वृथा भासली । तेव्हांचि कामना नासली । मग शेजारियाची धरिली । ईर्षा जैसी. ॥ १८७ ॥ म्हणोनि आहे संतुष्टी । प्रपंचीं परतली दृष्टी । दृष्टत्वेंचि वाटली सृष्टी । नवल ऐसी. ॥ १८८ ॥ मग बाल उन्मत्त पिशाचवत् । स्वइच्छेनें रमत । नैराश्यावांचूनि करमत[2] । नाहींच जया. ॥ १८९ ॥

**अक्रोधो बोधसंयुक्तो देहस्थं साक्षिणं परम् ।**
**चैतन्यं शाश्वतं पश्येद्देहधर्मं च धारयन्. ॥ ३३ ॥**

मग कवणावरी क्रोध धरी । दुसरेंचि न दिसे दृष्टीवरी । निज बोधाचिये घरीं । नांदत असे. ॥ १९० ॥ शारीरधर्मांचा शोध करी । कवण नांदे ययाभीतरी । साक्षी चैतन्य कळा अंतरीं । दिसोनि आली. ॥ १९१ ॥ पाहाणेंचि चिरंजीव झालें । कवण देखे जन्मलें मेलें । आणि घडलें कर्म केलें । कवणें येथ. ॥ १९२ ॥ पिंडचि पदासमान । झाला नासोनि अभिमान । मग सावधान असतां भान । नाहींच जया. ॥ १९३ ॥ जो शरीराचा पैं आचार । तोचि ब्रह्मींचा समाचार । जेथ घर आणि तें दार । एकचि झालें. ॥ १९४ ॥ जेथ नामासारिखें रूप झालें । रूपीं रूप नासोनि गेलें । तेथ रुदनचि हास्या आलें । निमतां सृष्टी. ॥ १९५ ॥

**आत्मध्यानस्थितश्चात्मसुखानुभविता नरः ।**
**अनिर्वाच्यं परब्रह्म सोऽहं पश्यति चिन्मयम्. ॥ ३४ ॥**

---

१. कंटाळे २. करमत नाहीं=सुखास येत नाहीं, आवडत नाहीं, चैन पडत नाहीं.

स्वध्यान झालें स्वाधीन । स्वात्मसुख संवाहन । निष्काम धेनुदोहन । होतसे जेथें. ॥ १९६ ॥ नाशिवंत नासावया । उरलेंचि नाहीं देखावया । म्हणोनि अनिर्वाच्य तया । ब्रह्म म्हणणें. ॥ १९७ ॥ जें ज्ञानचि एकलें शाश्वत । सोऽहं ब्रह्म सदोदीत । जें सेवुनी सदा संत । तृप्त होती. ॥ १९८ ॥ जेथ कुंठल्या चारी वाचा । उपक्रम न चले मनाचा । तो संसार सुखाचा । अविनाश पैं. ॥ १९९ ॥ जेथ सुखें सुख हारपलें । दुःखें दुःख लया गेलें । मग काय एक तें उरलें । कवण जाणें. ॥ २०० ॥ न कळे तरी जाणिलें आहे । जाणिलें तरी सांगतां नये । हे दशा जया प्राप्त होय । तोचि जाणें. ॥ २०१ ॥

**सानुकूलः स्वयंसिद्धं परमात्मायमव्ययः ।**
**नास्ति च तद्विना किंचिदन्यत्तु सुखसाधनम्. ॥ ३५ ॥**

सदां सानुकूल आत्मसिद्धि । स्वयं साध्य सोऽहं बुद्धी । अंतरिक्ष तें त्रिशुद्धि । झेंपावलें. ॥ २०२ ॥ यया सुखाहूनि साधन । आन कासया आराधन । पायाळ दृष्टी गुप्त धन । लाधलें जेथ. ॥ २०३ ॥ तेथ आराम आरामला । विश्रांतीं विश्रांती पावला । लाभासि लाभ झाला । अपरिमित पैं. ॥ २०४ ॥ जेथ शून्यचि शून्य झालें । तेंचि देखणियां पैं आलें । किंचिज्ज्ञत्व सामावलें । मग अंतर्बाह्य राहिलें जळचि जेंवी. ॥ २०५ ॥ ऐसिया कल्याणा पैरौतें । आणखीं नाहींच निरुतें । येथ अंतवंतीं काय तें । सौख्य आहे. ॥ २०६ ॥

**स्वप्नवत्क्षणिकं सर्वं नामरूपात्मकं जगत् ।**
**तस्मिन्यत्सुखदुःखं च मृगवारिसमं खलु. ॥ ३६ ॥**

सकल नामरूपाचा उद्भव । स्वप्नप्राय असे सर्व । कासया धरावा गर्व । तेथील पैं. ॥ २०७ ॥ तेथ कैंची सुखाची सोय । शुक्ति केंवी रौप्य होय । केतुला वेळ अभ्रच्छाये । टिकावा होय. ॥ २०८ ॥ फेनेंचि तृषा केंवि हरे । गोष्टीनेंचि हिंवी पोट भरे । नपुंसकें गर्भ धरे । कैसेनि तो. ॥ २०९ ॥ आथर्वणाचिया मोहरा । केंवि येती उपकारा । तयापरी संसारा । वृथा देखे. ॥ २१० ॥ विद्युल्लतेचें स्फुरण । क्षणभंगुर जैसें जाण । तेंवी भवभासभ्रमण । वृथा आहे. ॥ २११ ॥

---

१. परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी ह्या चार वाणी. २. दुसरें, अन्य. ३. पलीकडे, पुढें. ४. खरोखर, स्पष्ट. ५. अथर्वणवेदांतील मंत्राच्या प्रभावानें केलेल्या (मोहरा).

**यथा सिंधौ तरंगास्तद्वच्चैतन्ये जगद्भ्रमः ।**
**गुणत्रयविभागेन सर्वकर्मणि विवर्त्तकः ॥ ३७ ॥**

चित्सिंधूचिया आंत । विश्व भासे तरंगवत् । नाना रूपें मिरवत । आभास जैसा. ॥ २१२ ॥ अनेक रीतीचें भाषण । विविध क्रिया उठती जाण । तेथ थोडकें संभाषण । करितां भलें. ॥ २१३ ॥ सोंगासंगें भाषण । करितां बुद्धीसि लागे दूषण । स्वरूप धरिलिया सारिखें जाण । बोलेल तो. ॥ २१४ ॥ तैसा आत्मत्वें सांडिला । देहबुद्धीनें वेढिला । जयासीं भ्रमचि पैं पडिला । मी देह ऐसा. ॥ २१५ ॥ तयाची भेट पैं घेतली । तरी बोले प्रपंचीक बोली । तेथ गुणत्रय भेलीं । मिश्रित जें. ॥ २१६ ॥

**तत्र सुखं च मन्यंते मूढा मायाभ्रसंभवम् ।**
**तत्कर्मणापि बद्धास्तेऽनात्मानो दुर्जनाः खलु. ॥ ३८ ॥**

वायसा वायस मिळे । मग दोघांचिही बुद्धी पघळे । जेथ कीं मास मिळे । टोंचावया. ॥ २१७ ॥ तेंवी मूर्खाप्रति जाण । मूर्खेंचि करावें भाषण । साधूचें कारण । नसे तेथें. ॥ २१८ ॥ जे अविद्या अंकित जीव । सहज तयांचा दुष्ट स्वभाव । कैसेनि पडेल आव । संता तेथें. ॥ २१९ ॥ तेथ तयांचि सारिखे असती । तेचि तयां प्रिय होती । मग मन मानेल तेचि करिती । चर्चा ते पैं. ॥ २२० ॥ तये बुद्धीचिया पोटी । निंदा दूषणीं पडे मिठी । तयां आत्मज्ञानाची भेटी । घडे केंवी. ॥ २२१ ॥

**सद्भावेन युतः श्रेष्ठः शुभो वै भेदनाशकः ।**
**ब्रह्मविद्ब्रह्मगो नित्यः सर्वज्ञानप्रकाशकः ॥ ३९ ॥**

श्रेष्ठ सद्भाव जयांचा । ऐक प्रकार पैं तयांचा । आत्म अभावाचा । लेश नाहीं. ॥ २२२ ॥ सद्रूप जें कां मूळ ब्रह्म । तेथ उपाधीचें नाम । आणि रूपाचा संभ्रम । न शिवे जेथें. ॥ २२३ ॥ तेथ न देखतां दुजेपण । भावार्थ वाढला संपूर्ण । जेथ कांहीं व्यक्ति वर्ण । उरला नाहीं. ॥ २२४ ॥ सर्वांहृदयीं प्रकाशला । सर्वांनयनीं विकासला । ऐसा ऐक्यत्वीं विसांवला । बुद्धिमाजी. ॥ २२५ ॥ बुद्धीचें बोद्धव्य । मनाचें मंतव्य । चित्ताचें चेतव्य । मुरालें जेथ.

१. लाटांसारखें. २. अविद्यायुक्त, अविद्वान्.

॥ २२६ ॥ ऐसा शांभवी मुद्राप्रसाद । प्राप्त झाला जया विशद । तोचि भगवंतासि प्रसिद्ध । प्रिय झाला. ॥ २२७ ॥

**इति श्रीसिद्धांतसंहितायां सोहिराविरचितायां जिज्ञासूनां ज्ञानप्राप्रियोगो नाम षष्ठोऽध्यायः संपूर्णः ॥**

---

## अध्याय सातवा.

**भवाब्धितारको देवो जगद्धेतुश्च मृत्युहा ।**
**समर्थोऽयमतो भक्तास्तं सदानुसरंति ते. ॥ १ ॥**

जो भवसमुद्रतारक । अनेकें[1] भूतीं देव एक । मृत्यूसि पैं मारक । कारण जो. ॥ १ ॥ तो ईश्वर अभिमान नाशी । त्रैलोक्यासि जो प्रकाशी । सर्व प्राणी आज्ञेसी । मान देती. ॥ २ ॥ जलचर जळींच पैं राहती । वनचर वनातें सेविती । खेचर[2] गगनपंथीं असती । उडोनियां. ॥ ३ ॥ जे कां मनुष्याचे काळ । ते मनुष्यासि भीति केवळ । व्याघ्र सर्प उच्छृंखळ[3] । दमविले जे. ॥ ४ ॥ मनुष्य असमर्थ केवळ । तयासि बुद्धीचें दिधलें बळ । ऐसा जयानें खेळ । करोनि ठेला. ॥ ५ ॥ स्वर्गी स्वर्गींच असती । मानव मृत्युलोकींच वसती । येथिंचे स्वर्गीं न पवती । ते न येती मृत्युलोका. ॥ ६ ॥ ऐसें सत्तेचिया नवलें । सर्वत्र आज्ञेवरी चाले । ऐसा समर्थ म्हणोनि अनुसरले । भक्त पैं तया. ॥ ७ ॥

**सर्गादिकारणं भक्ताः स्वात्मसुखप्रदायकम् ।**
**निस्पृहाः कामनिर्मुक्ता भजंते तमनन्यभाक्. ॥ २ ॥**

उत्पत्तिस्थितिलय[4] । यांचें विसावतें निलय[5] । सर्वत्र जें कां होय । जेथुनियां. ॥ ८ ॥ मग तयाचि ठायीं । जीवत्व अर्पिलें पाहीं । असोनियां देहीं । नसे जेथ. ॥ ९ ॥ कामापासूनि कल्पिले । तें अवघेंचि वायां गेलें । मग निस्पृहत्व आलें । आत्मचिन्हीं. ॥ १० ॥ कल्पनेचें मुद्दल देखिलें । तेणेंचि कल्पनेला नाशिलें । मग अव्ययत्व आलें । आंगीं तया. ॥ ११ ॥ कार्या जें कां संभवलें[6] । तेवढेंही करणीं लाविलें । तेव्हां अनित्यत्व आलें । दृष्टीपुढें. ॥ १२ ॥

---

१. स्पष्ट. २. आकाशांत फिरणारे (देव वगैरे). ३. दांडगे, द्वाड. ४. सर्गपालनपोषण. ५. विश्रांतीचें गृह. ६. उत्पन्न झालें.

जेव्हां दिठी राहिली दृष्टत्वीं । मिठी दीधली आत्मतत्वीं । देखणें राहिलें शुद्धसत्वीं तेथिंचें पैं. ॥ १३ ॥

**चिन्मयो ब्रह्मरूपोऽयं सत्संगेषु परायणः ।**
**नारायणसमं सर्वं जगत्पश्यति वर्तते. ॥ ३ ॥**

मग तन्मय होऊनि ब्रह्मरूप । अंतरीं उजळला विवेकदीप । रूपचि देखतां अरूप । प्रत्यया आलें. ॥ १४ ॥ तेणें सत्संग प्रिय झाला । गुरुमुखें अभ्यास केला । सर्वज्ञ होउनी वर्तला । नीतिपंथें. ॥ १५ ॥ ते नीति कवणिये परी । परमात्मा सर्व निर्माण करी । ते भोगूनि त्याचि विसरी[1] । पडे जीवा. ॥ १६ ॥ हाचि परम अन्यायी । मीपण वागवी आपुल्याठायीं । तें टाकुनि तयाच्या पायीं । अनन्य[2] होणें. ॥ १७ ॥ तयावांचुनि न होणें आन[3] । त्यातेंचि म्हणणें अनन्य । जें बाळ करी स्तनपान । तें माताचि जाणे. ॥ १८ ॥ सर्वभूतीं नारायण । व्यापला आहे संपूर्ण । हें जाणोनि निष्ठुरपण । सांडिलें त्याणें. ॥ १९ ॥ तो न्यायेंचि पैं वर्तला । प्रपंचांतुनी परतला । जया मानसींचा हिरैतला[4] । अभिमान पैं. ॥ २० ॥ आत्मा जयानें जाणीतला । तयानें स्वधर्म हा पैं राखिला । नेणतयानें केला । अधर्मचि पैं. ॥ २१ ॥

**सन्नित्यसुखहेत्वात्मबोधेन सर्वदा स वै ।**
**कालं क्राम्यति तृप्तः सन्विरक्तस्तत्त्ववित्नरः. ॥ ४ ॥**

तें सुख नित्य पाहोन । आत्मबोधाचें अनुसंधान । जेणें होय पैं कारण । तेंचि धरिलें. ॥ २२ ॥ जेंवी वनाकारणें वसंत । कीं कमळाकारणें भास्वत[5] । सृष्टीकारणें शाश्वत । परब्रह्म. ॥ २३ ॥ नातरी देखे जैसा अग्नि । कीं अम्मला जेंवी निमग्नी । तेंवी आत्मबोधासि संलग्नी । वैराग्याचि. ॥ २४ ॥ प्रपंचाचें अनित्यत्व । हेंचि वैराग्याचें महत्व । सर्व गाळूनि सत्व । घेतलें जैसें. ॥ २५ ॥ तेणेंचि करुनी तृप्त । ब्रह्मरस घेऊनि गुप्त । भवीं असोनि अलिप्त । राहणें जें कां. ॥ २६ ॥ तेणेंचि किजे पैं कालहरण । जेणें चुके हें जन्ममरण । कीं भवाब्धितरण । होय जेणें. ॥ २७ ॥

**निष्कामी राजयोगी च रागद्वेषविवर्जितः ।**
**विवेकी क्लेशशून्यश्च भुंक्ते सर्वं च नित्यशः ॥ ५ ॥**

---

१. विस्मृति. २. शरण. ३. अन्य. ४. नाहींसा झाला. ५. सूर्य.

भोगितां पैं सकळही । जयासि पैं कामना नाहीं । हेंचि पैं नवल[1] कांहीं । पाहा कैसें. ॥२८ ॥ कैसी देवाची नेवाई । अपायचि झाले उपायीं । भयचि केला निर्भयी । जये ठायीं. ॥ २९ ॥ पाहतां देहाचे क्लेश । तयांचा न करीच द्वेष । अक्षय पावला यश । क्षयामध्यें. ॥ ३० ॥ तेणेंचि निश्चित झाली । विवेकदीपें पाजळिली । अज्ञानतमाची गेली । काळिमा तेणें. ॥ ३१ ॥ अंधकारचि प्रकाश जाहला । कीं गेलाचि जीव फिरोनि आला । कीं संतापचि हा निवाला । शांततेशीं. ॥ ३२ ॥ ऐसा राजयोगाचा संयोग । आत्मवस्तूसि न पडे वियोग । आणि इंद्रियांचा पांग । असोनि नाहीं. ॥ ३३ ॥

**पद्मपत्रं जलेऽलिप्तमलिप्तोऽर्थैस्तथा स वै ।**
**पश्यति सर्वगं ब्रह्म लिप्तं च दृश्यवस्तुना ॥ ६ ॥**

जळीं पद्मपत्र जैसें । असोनि जेंवि अलिप्त असे । विषयीं ज्ञानियें तैसे । लिप्त नव्हती. ॥ ३४ ॥ इंद्रियांचे राहाटीं । विषयीं पडलिया मिठी । परि त्यांतचि असुनियां दिठी । स्वरूपीं आहे. ॥ ३५ ॥ म्हणोनि विषयपदार्थीं । गुंतोनि न पडे 'परमार्थीं' । मोक्षाचिया स्वार्थीं । मानस आहे. ॥ ३६ ॥ विषय देहाचिया सांगातीं । देह असे तंव हे असती । शरीर गेलिया वसती । कोणे गांवीं ? ॥ ३७ ॥ शरीरीं आत्मसत्ता वसे । तंव ययाचें अगत्य असे । मग विषयांतें कवण पुसे । कशासाठीं ? ॥ ३८ ॥ भगवंत सर्व निर्माण[2] करी । मागुतीं होउनि शरीर धरी । संतोष होउनि संहारी[3] । सर्व तें पैं. ॥ ३९ ॥ इच्छेसि नाम माया ठेवी । त्रिगुण रूपें आवघें सेवी । तया काया हे धरवी । अधिष्ठान. ॥ ४० ॥ तया आंत हंस साक्षी । तो राहुनिया अलक्षीं । दिसे कीं हें प्रत्यक्षीं । आंतचि आहे. ॥ ४१ ॥ परि तो आंत नाहीं निश्चित । आकाश जैसें सैंभरांभरीत[4] । तें घटचि मात्र व्यापित । क्रिया नेघे. ॥ ४२ ॥ जेंवी योगी आत्मज्ञानबळें । जो कां अदृश्य पदार्थी खेळे । परि तयामाजी न मिळे । वरि लिप्त नोहे. ॥ ४३ ॥

**भुजंगस्तु यथा वायुं योग्यश्नाति च संसृतिम् ।**
**निष्कामकर्मकर्ता च सर्वत्रब्रह्मरूपकः ॥ ७ ॥**

---

१. नवल, कौतुक. २. उत्पन्न करी. ३. नाश करी. ४. जिकडेतिकडे भरलेलें, कोठेंही रिकामें नाहीं असें.

जैसा साप भक्षी वारा । तेंवी ज्ञानी या ग्रासी संसारा । दृश्यत्वाचा पसारा। द्रष्टृत्वमुखें. ॥ ४४ ॥ जेंवी देव डांगुरि अंकुर । उठला मोडी पैं विखार । तेंवी मोहाचा पैं आकार । होऊं नेदी. ॥ ४५ ॥ भवसमुद्र हा प्राशनीं । अगस्तीच होय पैं ज्ञानी । फलाशा अनुसंधानीं । गुंतेचि ना. ॥ ४६ ॥ जंव अधिक काष्ठें पडत । तंव अग्नी कडाडत । तेंवी प्रपंच दृश्य पदार्थीं हुत । वैराग्यदशा. ॥ ४७ ॥ जयाचा देहाभिमान गेला । आणि संसार जरि कां केला । कीं भोग तयानें भोगिला । उदंड जरी. ॥ ४८ ॥ तरी तें परस्परेंचि होत । तेथ त्रिगुणभूत सांगात । तें आधींच नसे तया आंत । त्या कैसेनि बाधे. ॥ ४९ ॥ चित्तासि लागे विषयवेध । तरी तोचि तया बाध । चित्तचि ज्ञालिया समाध । बाध कैंचा ? ॥ ५० ॥ आंगचि ज्ञालें अमृताचें । तेथें सामर्थ्य न चले मृत्याचें । कैंची व्याधि ? धन्वंतरीचें । राहाणें तेथ. ॥ ५१ ॥ तैसा जीवचि ज्ञाला पैं ब्रह्म । तेथ कैंचा संसारभ्रम । सुखचि ज्ञालिया, श्रम । कैंचा मग. ॥ ५२ ॥ सर्वगता समर्पण । म्हणणेंचि नलगे ब्रह्मार्पण । दर्पणा दाविलें दर्पण । जया परि. ॥ ५३ ॥

**दग्धबीजानि कर्माणि प्ररोहंति सतां नहि, ।**
**तेन ते न लभंते च पुनर्जन्म च वासनाम्. ॥ ८ ॥**

भाजलें बीज भूमीवरी । पेरिलें जेंवि अंकुर न धरी । वरि वर्षण मेघधारीं। बहु केला. ॥ ५४ ॥ कीं पतिव्रतेला प्रबोधी । परपुरुष बहुत भोंदी । तरी विकार कामबुद्धि । उमटेचिना. ॥ ५५ ॥ विरक्त पुरुष घरोघरीं । भिक्षाचि मागेल वरी । परि सेवा कवणाचीच न करी । लक्ष देतां. ॥ ५६ ॥ तैसा वासनासंस्कार । विटला देखोनि संसार । तो मागुतीं न रिघे घर । पुनरावृत्तीं. ॥५७ ॥ आत्मअनुसंधानें पोळिली । बुद्धिज्ञानें उजळली । तेथ वृथा ऐसी कळली । प्रपंचछाया. ॥ ५८ ॥ विष ऐसें कळलिया । तो न सेवी कांहीं केलिया । कीं मोहरे न जाय देखिलिया । व्याघ्र जैसा. ॥ ५९ ॥ तेंवी कळलिया संसारदु:ख । तेथ इच्छा धरील तो मूर्ख । आधींच आहे विमुख । शरीरावरी. ॥ ६० शरीराचिया आश्रमा । जीव पडला पैं भ्रमा । म्हणोनि शरीरग्रामा । येणें पुरे. ॥ ६१ ॥

---

१. ज्ञानवंत, शाहणा. २. ज्वलित. ३. पुष्कळ. ४. विषयाची गोडी–प्रीति. ५. यमाचें, काळाचें. ६. आरसा. ७. मेघांच्या धारांनीं. ८. उपदेशी. ९. फसवी, ठकवी. १०. सकल संसार ज्यानें सोडला असा पुरुष. ११. प्रवेश करी.

**वसंते मृतवल्लयश्च यथा सपल्लवा न तु ।**
**तद्वत्सतां तु कर्माणि निष्फलानि भवंति वै ॥ ९ ॥**

वसंतसत्ता बहु थोर । आघविया वना करी शृंगार । फलपुष्पें पत्रांकुर । नित्य झाडी. ॥ ६२ ॥ तया बहुत वनामाझारी । पिकली वेल सेवटवरी । ते कालसत्तेची परी । नचले जेथ. ॥ ६३ ॥ आदिलीं[1] पानें गळोनी पडती । तेथ नूतन[2] पालव नुमटती । मग वसंत सामर्थ्यशक्ति । न चले जेथ. ॥ ६४ ॥ कच्चियावरि सामर्थ्य चाले । पक्कियावरि तें न चाले । तेंवी अज्ञानत्वें आलें । कच्चेपण. ॥ ६५ ॥ तेंवी कर्मफल वसंत । जो फलाशा जीव धरित । तयासीच उमटत । पुनर्जन्म. ॥ ६६ ॥ तैसें पूर्वज्ञानें पिकले । फलाशेसी जे विटले[3] । तेथ शुभाशुभ पैं न चले । कर्मसत्ता. ॥ ६७ ॥ वासनांतराची होळी । जेथ झाली ज्ञानानळीं[4] । तो जीव कोणेच काळीं । देह न धरी. ॥ ६८ ॥ तो परमात्मा आधींच होता । परि शरीराची होती अहंता । ते गेलिया झाला आतां । आहे तैसा. ॥ ६९ ॥ हीणत्व मिश्रित आंत होतें । तें शोधुनि दवडिलें निरुतें । मग आहे तैसेंचि उरतें । सोनें जैसें. ॥ ७० ॥ कीं घटींच सांपडलें दिसे । अज्ञान दृष्टिचेनि मिसें । घट फोडिलिया आकाश असे । जेथिंचें तेथ. ॥ ७१ ॥ तेंवी न नाशितां शरीर । अभिमान घालितां बाहेर । परमात्मा निराकार । असलाचि असे. ॥ ७२ ॥

**प्रारब्धभोगसंयुक्ताः संतो लिंपंति नैव तैः ।**
**अच्छिद्रं दृश्यते सर्वैः कपित्थं गजभक्षितम्. ॥ १० ॥**

जेंवी हस्ति कपित्थ[6] गिळी कोडें[7] । तें मळमार्गें बाहेर पडे । पाहातां होतें तेवढें । दिसे तैसें. ॥ ७३ ॥ परि आंत निपटूनि गर्भ[8] नसे । तें कळे होय कैसें । विषय सेवितां ज्ञानियां तैसे । अभिमान नाहीं. ॥ ७४ ॥ जन तैसेचि ते दिसती । योगक्षेम चिंता करिती । इतरांसारिखे राहती । वर्णाश्रमीं. ॥ ७५ ॥ यथाशक्ति दान करिती । समर्थी अंतीता[10] भोजन देती । तीर्थयात्रेसि पैं जाती । समयोचित[11]. ॥ ७६ ॥ परि केलियाचा अभिमान नाहीं । मग इच्छा न धरीच कांहीं । असोनियां देहीं । नसेचि पैं तो. ॥ ७७ ॥ जैसा क्लीब[12] पावे वेश्ये-

---

१. आधींची, पहिलीं. २. नवीन पानें फुटत नाहींत. ३. त्रासले, आवडेनासे झाले. ४. ज्ञानरूपी अग्नींत. ५. खरोखर. ६. कवठीचें फळ. ७. कौतुकानें ८. फळांतील गर. [मागें पृष्ठ १२ टीप ८ पहा.] ९. भिकाऱ्यास. १०. अतिथीला. ११. योग्यकाळीं. १२. कापुरुष, नपुंसक.

घरीं । केले उपचार पैं स्वीकारी । शेखीं[1] भोगाचिये द्वारीं । उभा न ठाके ॥ ७८ ॥ कीं रिसासारिखें बोले । त्या शब्दाशब्दीं मान डोले । तेथ विषम-भाव देखिले । मनीं ठेवी. ॥७९॥ तेंवी हृदय नैराश्य आथिला[2] । आहाच प्रपंचीं वर्तला । परि मोह नाहीं उरला । मानसा ठायीं. ॥ ८० ॥ नट जैसा वेष-धारी । तैशीच संपादणी[3] करी । अमिथ्या दावूनि अंतरीं । प्रकार दावी. ॥ ८१ ॥

**गवां वने चरंतीनां चेतः स्वे स्तन्यपे शिशौ ।**
**तथा चित्तं परे नित्यं सतां तु देहिनां खलु. ॥ ११ ॥**

धेनु चरती अरण्यामाजी । वत्स ग्रामींचे पैं योजी । मग सांजवणी[4] सहजीं । घरासि ये. ॥ ८२ ॥ मग उभतांचें प्रेम खवळे । वोरसोनि पान्हा बहुत वोळे । वत्स सुखाचिये खोळे । आपेंचि पडे. ॥ ८३ ॥ लक्ष आणि शरीर । दोघांसि झालें एक घर । तेथ संतोषाचें मंदिर । बैसावया. ॥ ८४ ॥ तेंवि ज्ञानिया शरीरधारी । आयुष्य असे पैं जंववरी । तंव राहाटीच आववी करी. । सहजियें ते. ॥ ८५ ॥ देह असे संसारधर्मीं । परि लक्ष लावीं परब्रह्मीं । आणि अंतकाळीं निजधार्मीं । मोकळी देह. ॥ ८६ ॥ जेथिंचें लक्ष तेथ गेलें । दो-हींचेंही एक झालें । ऐसें परमभाग्य आलें । सद्गुरुकृपें. ॥ ८७ ॥ येथील लक्ष तेथ जाय । तरि तो येथ नाहीं तेथ आहे । तयाची पारख[5] कवणा होय । तोहि तैसा. ॥ ८८ ॥

**परपुंसि यथा चित्तं जारिण्या वर्तते ननु, ।**
**तथा चित्तं सतां नित्यं परे ब्रह्मणि देहिनाम्. ॥ १२ ॥**

जैसी व्यभिचारिणी नारी[6] । स्वपतीशीं राहटी[7] करी । पतिव्रता धर्म स्वी-कारी । मुखें मात्र. ॥ ८९ ॥ लौकिक व्हावया न चुके । परि आपणा म-ध्येंचि राखे । ज्ञानी संसार धरिती काखे । वृथा तैसा. ॥ ९० ॥ पतीचेनि प्रतिपाळ । पतीचेनि स्वधर्म उजळ । ऐसें असोनि प्रेमळ । परस्थानीं. ॥ ९१ ॥ तैसाचि कीं हा जीव । [8]पंचमहाभूतें सावाव । तयाचेनि नांव । ययाचें पैं. ॥ ९२ ॥ भूतें नांदती समाधान रिती । तंवचि जीवासि पैं वस्ति । पांच पां-चांठायीं जाति । मग कवणाचे हातीं काय लागे. ॥ ९३ ॥ ऐसे शरिराचे उपकार । घेऊनि नाठवी जो कां नर । तोचि ज्ञानाचा अधिकार । पूर्ण पावे.

---

१. शेवटीं. २ प्राप्त झाला. ३. बलावणी, हावभाव. ४. संध्याकाळीं. ५. परीक्षा. ६. स्त्री, बायको. ७. वागणूक. ८. आप, तेज, वायु, आकाश इत्यादि.

॥ ९४ ॥ कीं [1]जीवनेंचि उद्भव [2]कुमुदिनी । परि तेवढाच संतोष न मनीं । चंद्राचिया [3]उदयमानीं । विकास करी. ॥ ९५ ॥ तेंवि विषयाचिया भावा । विना संतोष नाहीं जीवा । परि येथ न गुंते प्रेमभावा । ब्रह्माविणें. ॥ ९६ ॥

**लौकिकाश्रमधर्मेण वर्तंते साधवः सदा ।**
**परं तेषां मनो नित्यं परे ब्रह्मणि शाश्वते. ॥ १३ ॥**

तैसें लक्ष परब्रह्मीं । हृदयस्थ आत्मारामीं । जो परमेश्वर स्वामी, । सर्वांचा पैं. ॥ ९७ ॥ त्रैलोक्यदाता परम । परात्पर मंगलधाम । जयाचिये सत्तें इंद्रियग्राम । [4]चेष्टती पैं. ॥ ९८ ॥ जो सर्व व्याप्य [5]दिगंबर । अचल अढळ अमर । दृष्टीलागीं अगोचर । दिव्य मूर्ति. ॥ ९९ ॥ तो सहज बैसला नयनीं । चरित्र आणि अवलोकनीं । परमऋषि ज्ञानी मुनि । सर्व जेथ. ॥ १०० ॥ शरीर सोडुनि आप आपणा पाहे, । तंव सर्वांठायीं भरला आहे । निश्चित देखोनि राहे । जेथील तेथ. ॥ १०१ ॥ वरि प्रकट आहे आश्रमधर्म । लौकिक दशे सर्व कर्म । अंतरीं जाणोनियां वर्म । राहणें जें कां. ॥ १०२ ॥

**कर्म रजस्तमाभ्यां वै प्रारब्धेन च वर्तनम् ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणो बध्नंति तेषु नैव हि ॥ १४ ॥**

प्रारब्धास्तव देहाला भोग । तेणें चि प्राप्त पैं [6]भवरोग । तेणेंचि योग वियोग । आघवाचि पैं. ॥ १०३ ॥ रजतमाचें वर्तणें । क्रियाकर्म आचरणें । तें कांहींच बाधणें । नाहीं ज्ञाना. ॥ १०४ ॥ वाहत उदकाचें बळ । बहुत वेळ न राहे गढुळ । तेंवी राजतमाचा [7]अडखळ । नाहीं ज्ञाना. ॥ १०५ ॥ जेंवी आकाश हें [8]निर्लेप । तेंवी आत्मज्ञानाचें स्वरूप । जेंवी अंधकार दीप । न देखे जैसा. ॥ १०६ ॥ तेंवी विषयांची बद्धता । नलगे ऐशी झाली शुद्धता । गारुडी न देखिला भितां । सापासि जेंवी. ॥ १०७ ॥

**यथा महौषधेनैव महाद्विषं तु शाम्यते, ।**
**विषयाश्च शमं यांति स्वात्मबोधेन वै तथा. ॥ १५ ॥**

जेथ सर्पाचा दंश होये । तेथ विषवृद्धि बहु आहे । मृत्यूचें बोलावणें ये । तत्काळ पैं तें. ॥ १०८ ॥ तरि [9]वन्हि विझवि [10]जीवन, । कीं अभ्र पळवी प-

---

१. पाण्याच्या योगानें. २. कमळिणीस. ३. उदयकाळीं. ४. चेतनायुक्त होती. ५. दिशा हेंच आहे अंबर (वस्त्र) ज्याचें तो. ६. संसाररोग. ७. अडकात, अडकाठी. ८. स्वच्छ. ९. अग्नि, विस्तव. १०. पाणी.

वन । क्षुधा हकाक भोजन । जयापरी. ॥ १०९ ॥ तेंवी चिंता हारवी धन । कीं समाधि लावी योगसाधन । ठिकाणीं पावलिया श्रमा गमन । शमन होय. ॥ ११० ॥ तेंवी दिव्य औषधि करुन । सेवितां विष होय शमन । मग जीव पैं समाधान । सहज पावे. ॥ १११ ॥ तेंवी विषय सुखबाधा । न पवे केलिया आत्मशोधा । प्रारब्धाचिया क्रोधा । त्यागुनियां. ॥ ११२ ॥ म्हणोनि जाहलिया पुरुषाभय । नाहींच बाधा तो निर्भय । हा अलिप्तपणाचा अभिप्राय । असेल जरी. ॥ ११३ ॥ म्हणोनि आत्मज्ञानाचें बळ । झालिया सर्व पडे पैं निर्बळ । मग सविवेक प्रबळ । होइजे तेथ. ॥ ११४ ॥

**सर्वान्विषयबंधांश्च नाशयत्यर्धमातृका ।**

**भवरोगभयं हंत्री साक्षिणी चेश्वरी कृपा. ॥ १६ ॥**

तैसा विषयांचा बाध । अर्धमात्रा दिव्य औषध । करी तयांचा निषेध । अहंबाधे. ॥ ११५ ॥ विषयांची म्हणती बद्धता । घाली [२]अधोगति [३]प्राणिजाता । तरि तोचि ऐक आतां । अभिप्राय. ॥ ११६ ॥ तरि रस रीतीं न मारितां विष । करीच जीवित्वाचा नाश । म्हणोनि कीं बद्धतेस । कारण होय. ॥ ११७ ॥ रसमात्रेनें सेविलें । तेंचि आयुष्य जामीन झालें । तैसे निरहंकृतीं विषय आले । ब्रह्मत्वासी. ॥ ११८ ॥ दुराग्रही विषयसंग । तोचि आत्मज्ञानाचा भंग । रजोगुणाचा रंग । चढे जेथें. ॥ ११९ ॥ तैसें अर्धमात्रा ते न करी । प्रकट झालिया तयाघरीं । अक्रियत्वचि भरी । हृदयामाजी. ॥ १२० ॥ शरीरीं कोणी एक असे । तो सुखदुःख भोगीतसे । ऐसें कधींच पैं न दिसे । स्वप्नींही कीं. ॥ १२१ ॥ असे तरी एक भगवंत । जो सर्वीं असोनि सर्वातीत । तेथ दृश्य म्हणणें [४]भ्रांत । [५]मृगजल जैसें. ॥ १२२ ॥ येथ सुखदुःख जो भोगिता । तो शरीर नसतां दिसोनि येता । तरी तें साच तत्वता । दिसोनि येतें. ॥ १२३ ॥ जो हास्य रूदन पैं करी । सुखदुःखें देहाभीतरीं । तीं दोन्हींही नसतां भूमीवरी । [६]निचेष्टित देह. ॥ १२४ ॥ जैसी भूतचेष्टा क्षणभरी । मार्गें जातया मध्येंच धरी । तैसीच येथील परी । जाणणें ते. ॥१२५॥ स्वप्नीं कांहीं एक पैं दिसे । तें जागृतीं मिथ्याचि असे । अर्धमात्रेस्तव वसे । देखणें ऐसें. ॥ १२६ ॥ भवरोगाचा भय । हरोनि झाला कीं निर्भय । जेथ कीं ऐसी सोय । ईश्वरी कृपा. ॥ १२७ ॥

---

१. भूक. २. नरकवास. ३. प्राणिमात्रास. ४. संशय, संदेह. ५. मृगजळाप्रमाणें मिथ्या. ६. चेतनारहित.

**साधुः साक्षात्परं ब्रह्म परमात्मा सदाशिवः ।**
**सुनिश्चलश्च पूर्णोऽयं दिव्यमूर्तिर्दिगंबरः ॥ १७ ॥**

तो मनुष्यरूपें ईश्वर । दिव्य मूर्ति दिगंबर । पूर्ण ब्रह्म साक्षात्कार । केवळचि तो. ॥ १२८ ॥ त्याचें दिसणें यासी दिसे । परि सामर्थ्य तयाचें यासि नसे । हृदयींच हें प्रकाशे । काय ऐसें. ॥ १२९ ॥ ऐसिया [1]संदेहा निरुत्तर । ऐक तूं हें सविस्तर । येणें संशय दुःख निस्तर । आघवेंचि कीं. ॥ १३० ॥ सत्ता आनंद प्रकाश । द्विधा प्रकार प्रवेश । जयामाजी [2]शबलांश । मायारूप.॥१३१॥ मायेमाजि सकळिक । शबलांश कैसा ऐक । आणि प्रत्यक्ष पां देख । नयन-दृष्टीं. ॥ १३२ ॥ इच्छामात्रें [3]निर्माण व्हावें । आणि इच्छेनेंचि संहारावें । तया आंत दावावे । प्रकार नाना. ॥ १३३ ॥ हें शबलसत्तेचें रूप । ऐक आनंदाचा साक्षेप । शब्द स्पर्श रस रूप । आणि तो गंध. ॥ १३४ ॥ हें पंच विषयांचें सुख । जीवासि आवडे [4]हरिख । तोचि शबल देख । आनंद येथ. ॥ १३५ ॥ आणि प्रकाश म्हणणें तेज । जें चंद्रसूर्याग्निसहज । जगत्सौंदर्यासि बीज । तें हें जाण. ॥ १३६ ॥ शुद्धांश जे कां सत्ता । अज्ञान नाशी तत्वता । जें कवणिया घाता । सांपडेचि ना. ॥ १३७ ॥ विश्वलोपि जो प्रकाश । जेणें सूर्यचंद्राचा होइजे नाश । दृश्याकार [5]तमास । हारपणें जेथ. ॥ १३८ ॥ शुद्ध आनंद तो कैसा । [6]नातळतां विषय लेशा । सहज पैं संतोषा । उपजणें जें. ॥ १३९ ॥ निराश्रित निराकारि । समाधानाची उजरि । शुद्धांशाचि परी । जाण ऐसी. ॥ १४० ॥ हा शुद्धांश मूळ समर्थ । त्यासीच म्हणणें परमार्थ । सद्भक्तीचा स्वार्थ । येथेंचि असे. ॥ १४१ ॥ यया म्हणावें आत्मज्ञान । येर शबलांश तें अज्ञान । सिद्धि सामर्थ्याचें स्थान । तेंचि कीं. ॥ १४२ ॥ कर्मापासोनि पराधीन । झाला विषयांचिया स्वाधीन । म्हणोनि जड देह बंधन । पडलें तया. ॥ १४३ ॥ तया कैंचें सामर्थ्य । त्यासी श्रम घडला पैं व्यर्थ• । सामर्थ्य असलिया अनर्थ । भोगील कां? ॥ १४४ ॥ अज्ञाना सामर्थ्य नसावें । ज्ञानिया म्हणोनि असावें । मूर्खमत स्वभावें । देखणें हें. ॥ १४५ ॥ महदाकाशीं जें सामावे । तें घटाकाशीं केंवि मावे? । [7]आंभरण तेथ संभवे । मृत्तिकेचें. ॥ १४६ ॥ घटाकाशीं वोळखिलें । महदाकाश-

---

१. संशयास. २. विरुद्धप्रकारचा अंश. ३. उत्पन्न व्हावें. ४. आनंद, हर्ष. ५. अंधकार. ६. न स्पर्शतां. ७. दागिना, अलंकार, भूषण.

पण आपुलें । आहे घटातीत संचलें । अनंतपण. ॥ १४७ ॥ घटीं असतां उमजलें । म्हणोनि घटाकाश कें झालें । तेंवि लघुत्वाचेनि मुद्दलें । श्रेष्ठत्व दिसे. ॥ १४८ ॥ संकट पडलिया भक्तांवरी । भगवंत त्यांची सुटका करी । कांहीं राखतसे वारि । चमत्कारें. ॥ १४९ ॥ म्हणोनि ज्ञानसामर्थ्यसंबंध । धरील तो पैं मतिमंद । हाचि सुटावया संशयबाध । विस्तार केला. ॥ १५० ॥ सांडूनियां शरीरभाव । साधु देख निराकार देव । तो नेईल पैं वैभव । ज्ञानाचें कीं. ॥ १५१ ॥ तेथ विषयांची कामना । केलिया तो नयेचि मना । आणि हृदयीं निंदकभावना । वसों येते. ॥ १५२ ॥

**आत्मन्येवात्मना तुष्टो निदानज्ञः परात्परः ।**
**तस्मिन्द्वैतस्य चाभावः स्यान्मायायाः कुतो भयम् ॥ १८ ॥**

निदान जाणावया जाणता । जेथ नुरेचि पैं तत्वता । हळवारपण उन्निता । आलियावरि. ॥ १५३ ॥ जेथ रात्रीचा दिवस । धरत्री ना पैं आकाश । संसाराचा भास । तेथ कैंचा. ॥ १५४ ॥ भावाभाव तेथ नाहीं । निद्रा स्वप्न तये ठायीं । सर्वेचि अपायीं । सुटे जीव. ॥ १५५ ॥ म्हणोनि तो ब्रह्म होय । न सांडितां मुळिंचि सोय । तयासि कैंचा भय । अविद्येचा. ॥ १५६ ॥ अविद्याचि झाली विद्या । आणि विद्या मिनेली[1] स्वसंवेद्या । ऐसेंचि जेथ सद्यः । दिसोनि आलें. ॥ १५७ ॥ आपणचि सर्व झाला । म्हणोनि भेदभाव विझाला । आपणांशींच रिझाला । आपण पैं तो. ॥ १५८ ॥

**अभिन्ना नित्यमुक्ताश्चाविर्भूताश्चिन्मयास्तथा ।**
**निष्प्रपंचाविशुद्धाश्च पश्यंति दृश्यमात्मवत्. ॥ १९ ॥**

जैसा रवीसि न दिसे अंधःकार । तैसा साधुसी न दिसे संसार । आपणासमान दिसती नर । अज्ञानहि. ॥ १५९ ॥ ते समान कैसे दिसती । जे स्वप्नींहि ईश्वर नेणती । आणि जन्मादारभ्य अभ्यासिती । तरि ऐक्य कैसें. ॥ १६० ॥ तरि संत पाहती ऐशिये कळे । अगोचर देव कोणाचि न कळे । तरी अज्ञान उणें आम्ही आगळे । कैसिया परि. ॥ १६१ ॥ दिसेना म्हणोनि ते न पाहती । शब्दीं नये तो न बोलती । न कळोनि पैं जाणती । अज्ञान ते कीं. ॥ १६२ ॥ ऐसे आपुलिये मुक्तदृष्टी । मुक्तचि मानिति सर्व सृष्टी । अगर्वघनाचि वृष्टी । वर्षे तयां. ॥ १६३ ॥ निषेध करावया दुजें । उरलेंचि नाहीं तया सहजें । सर्व

---

१. मिळून गेली.

संघांचें वोझें । उतरे जेथ. ॥ १६४ ॥ जेथ अज्ञानाचा कलंक गेला । निर्मळ आहे पैं एकला । म्हणोनि संवाद राहिला । सर्व तेथ. ॥ १६५ ॥

**योगप्राप्ताश्च ये संतः सर्वसाध्याश्च तन्मयाः ॥**
**समाधानस्य धामैव यांति परमसाधनम् ॥ २० ॥**

हीं प्राप्त कवण्या यत्नें । भवसमुद्रीं चिद्रत्नें । जेंवी वैकुंठपतीचिया यत्नें । उंहुळणें क्षीराब्धि. ॥ १६६ ॥ ते योग्यता कवणे परि । आत्मत्वातें सहज वरि । दृश्य देखोनि नानापरी । रिघेना जे. ॥ १६७ ॥ ऐशी योग्यता पैं निःसीम । परम प्राप्ति अनुपम । पुनरावृत्ति श्रम । न पडे जेथ. ॥ १६८ ॥ तन्मय झालिया या सर्व सिद्ध । प्रत्यक्ष ज्ञान पै प्रसिद्ध । आत्मज्ञानचि शुद्ध । लागे जेथ. ॥ १६९ ॥ ऐसें साधकांचें साधन । अकल्पिताती आराधन । प्राप्त झालिया समाधान । आपेंचि होय. ॥ १७० ॥

**सद्यःसुखं समाधानं सर्वत्र ब्रह्मभावना ।**
**तेषां दुःखं सुखं तुल्यं च संदेहविनाशनात् ॥ २१ ॥**

प्रस्तुत कारण समाधाना । सर्वत्रीं ब्रह्मभावना । तया वांचुनि कामना । नसावी आन. ॥ १७१ ॥ सुखाचाचि नाहीं हर्ष । तेथ दुःखाचा केंवि होय स्पर्श । ऐसा कांहीं उत्कर्ष । असे जेथें. ॥ १७२ ॥ जेथ सकल संशयाचा नाश । आत्मा भेटे स्वयंप्रकाश । जया सुखाचा उद्देश । ऐसें करि. ॥ १७३ ॥ ऐसें ऐक्य होय सुगम । जेथ मौनावले पैं निगम । तें पद पुरुषोत्तम । प्रकाशे जेथ. ॥ १७४ ॥ ऐसा कवणापासोनि लाभे । शरीरींच या सुलभे । जयाचिया प्रभे । सर्व नाशे. ॥ १७५ ॥

**कर्तुमात्मविशुद्धिं च कोऽन्योऽस्ति मनुजो भुवि ।**
**स्वयं तु शुद्धबुद्धश्च तुर्तया सज्जनं व्रजेत् ॥ २२ ॥**

आत्मज्ञानाची बुद्धि । देता नसे पैं त्रिशुद्धि । आपणचि आपुली शुद्धि । करावी कीं. ॥१७६ ॥ आपुलिये दैवीं असावें । तरीच मानसीं उपजावें । मग सज्जनांनीं करावें । साहित्य तेथें. ॥ १७७ ॥ शुक कीं मयूर व्हावें । पहाया त्या प्रेम उपजे स्वभावें । नेउनियां प्रतिपाळावें । ऐसें दिसे. ॥ १७८॥ कीं नागलतिकेचा रोप । जतन करावाचि अतिसाक्षेप । कीं मर्कटवल्ली दे-

१. पहुडणें. २. अन्य, दुसरी. ३. सोपें, सुसाध्य. ४. मुके झाले. ५. पोपट. ६. विड्याच्या पानाची वेल, नागवेल.

खतां कोप । कवणाही चढे. ॥ १७९ ॥ सुंदर पहातां प्रेम वाटे । आणि कुरूप देखोनि मन हें विटे । तेंवि सद्बुद्धि घेवोनि [1]भेटे । साधुसी जावें. ॥ १८० ॥ तेथ तुर्येचा पैं अंकुर । हृदयीं घेईल पैं आर । तरीच संताचें हृदय जिव्हार । भेदील तें. ॥ १८१ ॥ तेथ [2]गुरुगम्य अभिप्राय । ते ते पावले ठाय । तेथ शब्दार्थाची सोय । सहज लागे. ॥ १८२ ॥

**सतां तु संगतिं सेवां नित्यं च प्रार्थनां खलु ।**
**कृत्वा ज्ञानं च तेभ्यस्तु श्रुत्वा मनसि चिंतयेत् ॥ २३ ॥**

नित्य बुद्धीस सत्संग । करोनि पाहावें अंतरंग । मग संगींच निसंग । देखणें जें. ॥ १८३ ॥ सेवावृत्ति सहवास । प्रसन्न करूनि उल्हास । भरलिया उपदेश । साधुचा घ्यावा. ॥ १८४ ॥ आधींचि [3]जाणता न व्हावें । सर्व आधींचि पैं समजावें । समजलें चित्तीं भरावें । हृदयामाजी. ॥ १८५ ॥ तेंचि साधन पैं करावें । [4]तद्रूप होउनि राहावें । मग वेळोवेळां पहावें । अंतर्बाह्य. ॥ १८६ ॥ प्रथम चंदनखोडें ऐकावें । मग तयापाशीं मागावें । आपुलिये पदरीं घ्यावें । सत्वरचि. ॥ १८७ ॥ उगेंचि संग्रहीं न ठेवावें । उगाळुनि लागलेंचि पहावें । मग तदुपरी चर्चावें । अंगा तया. ॥ १८८ ॥ तेंवी आत्मत्वाचा विचार । तेथही असे हा प्रकार । अनुक्रमें सादर । ऐक कसा. ॥ १८९ ॥ आत्मवस्तु संतांकडे । आहेचि पैं सुख निवाडें । तें श्रवण करोनियां [5]चोखडें । लाविजे तेथ. ॥ १९० ॥ मग सेवा करूनि मागणें । दिधलितया झालें जाणणें । तयाचें मनन करणें । लागे आधीं. ॥ १९१ ॥ मग अभ्यास करावा लागे । तेथ हृदय हें [6]अनुरागें । तद्रूप झालिया आंगीं जागे । निरंतर. ॥ १९२ ॥ संप्रज्ञात अनुक्रमें । चालणें करोनि क्रमें । स्थिर जाहलिया रमे । जीव हा तेथ. ॥ १९३ ॥

**गृहस्थवर्णिने चापि वेदांतोपनिषत्खलु ।**
**उपदिशंति संतश्च व्यतिरेकान्वयक्रमम्. ॥ २४ ॥**

गृहस्थाश्रम राखोनि । शास्त्राज्ञा वंदूनि । तीन्ही अवस्था [7]जिंणोनि । अभ्यासाच्या. ॥ १९४ ॥ ऐसा अधिकार पाहोनि । वेदांत पैं उपदेशुनि । व्यतिरेक अनुसंधानीं । धांवणें जें ॥ १९५ ॥ मग ब्रह्मज्ञान कारण । गुरुगम्याची

---

१. भेटीसाठीं, नजराणा. २. गुरु जाणतो असा अभिप्राय. ३. प्रथम, पहिल्यानें. ४. तदाकार. ५. चांगलें, ६. प्रीतीनें, सप्रेम. ७. जिंकून, हस्तगत करून.

खुण । आपेंचि आपण । प्राप्त होय. ॥ १९६ ॥ तेथ प्राप्ती तेंचि विचारा । आधीं व्यतिरेक करिजे खरा । मग अन्वयाचिया घरा । स्थीर होय. ॥ १९७॥ स्थीर होतां अन्वयाआंत । जेंवी चोरा घरीं बिराड करीत । तयापरी दृश्य चरित । बाधणें जें. ॥ १९८ ॥ व्यतिरेकाची विशाद पुरी । घेवोनि राहिला अन्वया घरीं । तेथ देहबुद्धि भिकारी । जीव होता. ॥ १९९ ॥ तया व्यतिरेक भांडवलावरी । अन्वय करी सावकारी । सभाग्य झाला संसारीं । मोक्ष देखे. ॥ २०० ॥•चोरचि झालाहे राजा । हेंचि जेथिंचिया अनुग्रह पैजा । तें कवणेंपरी उमजा । सावधपणें. ॥ २०१ ॥

**तदनुसृत्य धीरोऽसौ मुद्राध्यानासनस्थितः ।**
**दृश्यविक्षेपशून्यश्च पूर्णप्राप्तिं च गच्छति. ॥ २५ ॥**

पूर्णप्राप्ति विसावा । व्हावया तेथ धीर व्हावा । विक्षेप कांहीं न यावा । दृश्याचा पैं. ॥ २०२ ॥ आकारींचे विकार । सर्व नासुनि निर्विकार । झालियां मग धीर । उपजे जेथें. ॥ २०३ ॥ धैर्याचें कारण काय । ऐशी पुसणियां पडे सोय । कांसयाचा तरी भय । असे तेथ. ॥ २०४ ॥ तरी ऐक तयाचें उत्तर । शरीर धरिलें पृथ्वीवर । आपण तेंचि शरीर । करोनि हिंडे. ॥ २०५ ॥ येथिंचा येथचि जाय । तया परदेश केला होय । पहातां तंव आकार आहे । जेथ तेथ. ॥ २०६ ॥ चारी खाणींचे जीव । पाहिला तेथ समुदाव[1] । चंद्रसूर्यांची राणीव । सर्वत्र आहे. ॥ २०७ ॥ पृथ्वी हेंचि कीं पाहे । उदक तेंचि पैं आहे । परी गृह सोडिलिया होय । असंतोष. ॥ २०८ ॥ एवढा मोह यया जीवा । पडला आहे भेदभावा[2] । आपुला म्हणुनि ठेवा । वेगळाचि काढी. ॥ २०९ ॥ माझा देश माझें घर । माझीं मनुष्यें संसार । ऐसेंचि पूर्वापार । जयाच्या मनीं. ॥ २१० ॥ जया दृश्यावांचुनि न क्रमे । तो निराकारीं कैसेनि रमे । शून्य देखोनि विरमे । चित्त ज्याचें. ॥ २११ ॥ रानींचें रांउळा[3] नेलें । तें पाहतां पै भांबावलें । तेंवी जीवा अधैर्य आलें । निरालंबीं ॥ २१२ ॥ तेथ धैर्यचि असलें व्हावें । निरापेक्ष पैं असावें । तरीच पैं वसावें । घडेल जेथ. ॥ २१३ ॥ गुरुकृपा दृढ असावी । आसन ध्यान मुद्रा बरवी । तेव्हांचि पैं साधावी । मोक्षप्राप्ति. ॥ २१४ ॥ पेर पैलिकडे आसन । सहज मुद्रा अभ्यासून । सर्वत्र असावें प्रासून । आपणामध्यें. ॥ २१५ ॥

---

१. समुदाय, समूह. २. द्वैतभाव, ३. राजकुलांत, राजवाड्यांत.

ऐसा अवसान कळेचा पकड। लाभेल जरी सुरवाड। तरीच पुरेल कोड। मनोरथाचें. ॥ २१६ ॥ ऐसी मुमुक्षुमार्गाची धांव। पुरेल जेथ पैं हांव। तेथ सर्वेचि देखिलें माव। दिसे जैसी. ॥ २१७ ॥

**दृश्यं स्वप्नं च शून्यं च चतुर्थो भेदसंज्ञकः।**
**एतेषां भ्रांतिनाशस्तु क्रियते च क्रमेण वै ॥ २६ ॥**

दृश्यभासाचा प्रथम। अशेष नासावा भ्रम। मग सहजेंचि हरेल श्रम। संसाराचा. ॥ २१८ ॥ दृष्टी पडे तें नासे। परी देखिलें तें हृदयीं भासे। साभास स्वप्न ऐसें। म्हणावें तें. ॥ २१९ ॥ तयाचे द्रष्टत्व पैं झालिया। तें आपेंचि जाय कीं लया। मग राहिलें तें तया। शून्यचि दिसे. ॥ २२० ॥ तया शून्याचिया सरिसा। भांबावे तो अनारिसा। तै भ्रांतीच कीं नाशा। पावेल जेव्हां. ॥ २२१ ॥ तेव्हां भेद नासे चतुर्थ। मग संतोषाचाचि अर्थ। ऐसें न होतां बोलणें व्यर्थ। आघवेंचि हें. ॥ २२२ ॥

**स्थूललिंगे शरीरे च तृतीयं कारणं तथा।**
**एतान्यतीत्य संगच्छेन्महाकारणसंज्ञितम्. ॥ २७ ॥**

स्थूलाचा जाड्यत्व धर्म। लिंगदेहाचें सूक्ष्म कर्म। आणि कारणाचें वर्म। शून्यदशा. ॥ २२३ ॥ शून्यदशेचें मूळ। तयावरी आघवा खेळ। स्थूल, सूक्ष्म केवळ। एकचि होय. ॥ २२४ ॥ तया पंचविसांचें जाण। करावें पैं निराकरण। तयांतीत होतां आपण। नाश तया. ॥ २२५ ॥ आपण कवण हा पहावा। तंव शून्याचा कीं नाश व्हावा। ऐसा करितो विसावा। महाकारण. ॥ २२६ ॥ दृष्टी चालतां पाय थरे। सांपडतां पैं विवेक ठरे। प्रथम मनीं न भरे। अत्यंत कीं. ॥ २२७ ॥

**जागृतिः प्रथमावस्था द्वितीया स्वप्न एव च।**
**तृतीया च सुषुप्तिः स्यादेतास्त्यक्त्वा तुर्यां व्रजेत्. ॥ २८ ॥**

प्रथमावस्था जागृति। आघवी साकार जाणती। आणि भेद भाव उठती। कांहींएक. ॥ २२८ ॥ दुसरी अवस्था स्वप्न। तेथ जागृतीचें मोडे [२]भान। तें प्रतिभास चिन्ह। साभास देख. ॥ २२९ ॥ ते जागृतीच बांभावे। ते संधीं स्वप्नासि कीं फावे। दिसलें साच स्वभावें। क्षणेक मानी. ॥ २३० ॥

---

१. 'यत् दृष्टं तन्नष्टं' असें नैय्यायिकांच्या तोंडून ऐकण्यांत येतें. २. स्मरण.

तिसरी अवस्था सुषुप्ति । ते मूढ दशेचि व्याप्ति । तेथ स्वसंवेद्य ज्ञप्ति । आ-वरण पडे. ॥ २३१ ॥ मग काहींच कळलें ना दिसे । ते सूर्या तेथ साक्षी असे । ते अवस्था त्रयीं विपरीत । पातली आहे. ॥ २३२ ॥ कीं जात धातु मिश्रवशें । हीणत्व पावोनि सोनें असे । तेंवी चित्कळा मिळालिया जीवदशें । ऐसें होय. ॥ २३३ ॥ तेथ चौथी अवस्था तूर्या । प्रकटलिया ज्ञान चर्या । आत्मरूप धैर्या । उभें करी. ॥ २३४ ॥ तेव्हां देखणें कैसें होय । हाचि क-ळावा अभिप्राय । अनादि आपुली सोय । न संडी कदां. ॥ २३५ ॥

**अउमेताश्च मात्रास्तु सर्गस्थितिलयप्रदाः ।**
**चतुर्थी चार्धमात्रां तु शून्याख्यां रमते स वै. ॥ २९ ॥**

अकार मात्रा प्रथम । सृष्टि उत्पत्ति उपक्रम । द्वितीय मात्रा संभ्रम । उ-कार तो पैं. ॥ २३६ ॥ तेथ स्थितीचा समारंभ । आकार संबंधीं लाभ । तेणे करोनि क्षोभ । सेवटीं पैं. ॥ २३७ ॥ तेथ मकार मात्रा उठे । तेव्हां आघवेंचि पैं[१]आटे । ते शून्यदशा जेथ भांगटे । अर्ध मात्रा ते जाण. ॥ २३८ ॥ ऐसा ॐकार पैं विरूढला । चहूं भागीं विस्तारला । मूळ तें धरोनि राहिला । 'सोहं' शब्दें. ॥ २३९ ॥ तेथ बिंदु म्हणती पैं तया । तो अनुभव असे पैं जया । तो ब्रह्मचि होउनि माया । मिथ्या मानी. ॥ २४० ॥

**विश्वाख्यः प्रथमश्चैव तैजसाख्यः परस्तथा ।**
**प्राज्ञाख्यश्च तृतीयस्तु चतुर्थ ईश्वरस्तथा ॥ ३० ॥**

विश्व अभिधानीं[२] प्रथम । दुसरा तैजस असे नाम । तिसरा प्राज्ञ कैसा क्रम । जाण पैं तो. ॥ २४१ ॥ चौथा पैं तो ईश्वर । जो गुणत्रयाचें घर । ब्रह्मां-डाचा अंगीकार । करी जो कां. ॥ २४२ ॥ मन बुद्धिसी न कळतां । देहचि राखावें तत्वतां । ते सत्ता म्हणावी आतां । विश्व ऐशी. ॥ २४३ ॥ अंतः-करण करावें जतन । बुद्धीचें नुतरावें महिमान । राखतसे अनुसंधान । तैजस तो. ॥ २४४ ॥ स्थिति अवस्थें इंद्रियें । जेथ क्षीण पावला होय । निद्रा संतोष सूये[३] । प्राज्ञ तो पैं. ॥ २४५ ॥ जीव अनादीचा अंश । शरीर धरितां बुद्धि भ्रंश । झाला तयासि सारांश । दावणें जें. ॥ २४६ ॥ तो अभिमा-निया ईश्वरू । जीवाचा तोडी जे संसारू । अज्ञानें अविचारू । होऊं नेदी. ॥ २४७ ॥

---

१. आच्छादन. २. नांवाचा. ३. शिवे, प्राप्त होय.

**नेत्राभासश्च स्थूलाख्यः साकारः प्रथमः खलु ।**

**प्रविविक्तो द्वितीयश्च स्वेच्छाभूतो मनः स्थितः ॥ ३१ ॥**

स्थूलाचा नेत्रभोग । भुले देखतांचि सोंग । मग भलतेंचि ढोंग । घेउनी उठे. ॥२४८॥ प्रविविक्त म्हणणें मानसीक । साभास हा सकळिक । जेवढें तेवढें कौतुक । मनींच भोगी. ॥ २४९ ॥ मनीं सृष्टि मनीं संहार । हा प्रविविक्ताचा प्रकार । वासने वृथाकार । होतसे जेथ. ॥ २५० ॥ अवघे भोग मनीं वरी । साभासाचिया विकारीं । तयाची प्रतीति स्थूल शरीरीं । घेतसे पैं. ॥ २५१ ॥ अवयव कल्पित ध्यानाचीं । मग प्रतिमा करणें मेणाची । मग तद्रुपता रसाची । भोग नाशी. ॥ २५२ ॥ तैसा विकार मानशीं उठी । तो स्थूलीं देतसे पैं दिठी । आणि भोगासि देतां मिठी । विसरे स्थूला. ॥ २५३ ॥

**तृतीयस्तु निराभास आनंदाख्यश्चतुर्थकः ।**

**सर्वद्रष्टा च संपूर्णः शाश्वतः परमप्रियः ॥ ३२ ॥**

तिसरा भोग निराभास । सनिद्र संधि सुव्यास । आवरण नासोनि प्रकाश । पडे जो कां. ॥ २५४ ॥ तोचि आनंद चतुर्थक । जो सर्व घटीं साक्षी एक । शाश्वत जो कां शशांक । ज्ञानोदय. ॥ २५५ ॥ तोचि प्रिय होय सहज । ऐसा पडे जेथ उमज । तो अद्वयानंद बीज । विश्वाचें जें. ॥ २५६ ॥ विश्वेश्वर जो व्यापक । कलाकौशल्य कलापक । कळिकाळ आज्ञापक । जयाचा पैं. ॥ २५७ ॥ जो विश्वग चिदानंद । शुद्ध सुमनाचा मकरंद । विषयविषा विद्रत । सर्वत्र जो. ॥ २५८ ॥ जो योग मंडळनिवासी । चिद्रूपचित्कळा विलासी । जो हृद्गत हृषीकेशी । जनार्दन. ॥ २५९ ॥

**त्रिकुटं श्रीहटं चैव गोल्हाटं च ततः परम् ।**

**चतुर्थमौटपीठं च सुषुम्ना मार्गणे खलु. ॥ ३३ ॥**

प्रथम त्रिकुट मंडळ । जेथूनि पृथ्वीचा खेळ । तें जिंकावें पैं केवळ । लागे आधीं. ॥ २६० ॥ दुसरें जें कां श्रीहाट[1] । उदकाचे मूळ कपाट । जेथूनि

१. 'श्रीहाट म्हणजे शक्तीचा बाजार. त्याचें स्थान टाळ्वेवर बोट फिरविल्यानें शरीरस्थ वायूवर फेरफार होऊन टाळ्वेचा मुख्य बिंदु ठरतो. त्या बिंदूच्या जागीं सर्व शरीराची ज्ञानशक्ति राहते, म्हणून त्यास **श्रीहाट** (शक्तींचा बाजार) अशीं संज्ञा आहे.' (ज्ञानेश्वरमहाराजांचें चरित्र-पृष्ठ ९४.)

काढणें वाट । ब्रह्मरंध्राची. ॥ २६१ ॥ तिसरें जें कां गोल्हाट[1] । तेज तत्वाचें मूळ पीठ । तेथ पैं सर्व शेवट । देखणें याचा. ॥ २६२ ॥ सर्व दृश्य एकदां दिसे । जेथ दृष्टीच पैं प्रकाशे । असे नसे एक दसे । पहाणें जें कां. ॥२६३॥ चौथें जें कां औटपीठ । तें पवनाचें मूळ पीठ. । तेथ गेली असे पैं वाट । सुषुम्नेची. ॥ २६४ ॥

**पंचमी भृंगगुंफा तत्रोन्मनी सा प्रकीर्तिता ।**
**समाधौ पूर्णयोगा च स्थिरात्मसिद्धिदा खलु. ॥ ३४ ॥**

भ्रमरपूर पंचमस्थान । जेथ आघवेंचि सांठवे गगन । लय पावे तें पैं मन । तये ठायीं ॥ २६५ ॥ तो सर्वांचा पैं शेवट । जेंवी आकाशीं फुटे घट । संसारवासनावाट । खुंटे जेथ. ॥ २६६ ॥ तेथ सर्व पावलें लेय[2] । फिटे जिवित्वाचा पैं भय । स्वानुभवनिर्णय । तेथील हा. ॥ २६७ ॥ तेथ पूर्ण योगसमाधि । स्थिर होय मन बुद्धि । तेथ पावलिया आत्मसिद्धि । सिद्धिचि होय. ॥ २६८ ॥ तेथ एकची आघवें अंतरीक्ष[3] । जेथ तेथ पैं अलक्ष्य । ऐसें दिसतां साक्ष । मावळे जेथ. ॥ २६९ ॥

**सर्वद्रष्टी तु वै तूर्या चावस्थात्रयसाक्षिणी ।**
**नित्यं निरंजनासक्ता समाधानं च गच्छति. ॥ ३५ ॥**

तूर्या[4] साक्षी अवस्थात्रया । दृष्टत्व अविद्या माया । आणि या गुणत्रयां । नाशिजे पैं. ॥ २७० ॥ जागृतीं वाटलें दीर्घ स्वप्न । स्वप्नींहि उरलें तेंचि भान । सुषुप्ती ओळखिली अज्ञान । देहाभिमानें. ॥ २७१ ॥ दोन्ही अवस्था संभ्रमीं । अज्ञानें म्हणे हेंचि कीं मी । ज्ञानें म्हणे कीं नाहें मी । परि कोण मी हें न कळे पैं. ॥ २७२ ॥ तेंचि सुषुप्तीचें रूप । जेथ नुपजे ज्ञानरूप । अज्ञानतमाची झांप । पडे जेथें. ॥ २७३ ॥ तेथ तूर्यादशा प्रकाशे । तें ज्ञानदृष्टीं कैसें दिसे । तेंचि आतां पैं परियेसें । स्वानुभवें. ॥ २७४ ॥

**भिन्नमशाश्वतं सर्वं स्थूलं लिंगं च कारणम् ।**
**पश्यति सैव शाश्वच्च सोऽहंमूलश्च निर्गुणः. ॥ ३६ ॥**

---

१. 'गोल्हाट म्हणजे छातीच्या आंतील पोकळींत जो उलटा प्राण आहे, त्या प्राणांतील ज्ञानवृत्तीला इंद्रियांवांचून स्वतांच्या स्वरूपाचा यथार्थ बोध होत नाहीं; अशा त्या प्राणवायु म्हण्याच्या ठिकाणास **गोल्हाट** म्हणतात.' (बळवंत खंडोजी पारखकृत ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र–पृष्ठ ९३.) २. नाश. ३. आकाश. ४. चौथी.

स्थूलदेह मज दिसे । लिंगदेह वेगळें भासे । कारण शून्यही वसे । दुजेपण. ॥ २७५ ॥ तेव्हां उरलें तें ब्रह्म हें मी । ब्रह्म म्हणणें तेथ नामी । म्हणोनि ' अहं ब्रह्मास्मि,' । मूळ तें मी. ॥ २७६ ॥ तैसी दृष्टी विस्तारली । परब्रह्मकळा हे लाधली । योगनिधि कीं हे साधली । ज्ञानांजनें. ॥ २७७ ॥

**नाहं सावयवोऽस्मीति साभासोऽहं न वै तथा ।**

**शून्योऽस्यहं न वै साक्षी सर्वगो निर्मलः खलु ॥ ३७ ॥**

मी नव्हें साकाररूप । साभासचि हें निक्षेप । शून्याचाही साक्षप । असे पैं हा. ॥ २७८ ॥ तिन्हीं अवस्था साक्ष । तोचि आत्मा मी अलक्ष्य । तेथ स्तवन करावया दक्ष । वेद झाला. ॥ २७९ ॥ सर्व गणणें अगणित । सर्वी असूनि सर्वातीत । शरीरीं जो कां साक्षिभूत । तोचि तो मी. ॥ २८० ॥ पाप केलें पाप कळतें । पुण्य केलें पुण्य दिसतें । भोगेल म्हणितल्या भोगतें । साक्षियोगें. ॥ २८१ ॥ पापभ्रांति पुण्यफळ । त्यागिलिया मी निष्काम केवळ । मुक्त दिसतां निर्मळ । मुक्त होतो. ॥ २८२ ॥ म्हणोनि दृश्यसाक्षी कल्पद्रुम[3] । परात्पर जें परब्रह्म । जीवदशे योजिलें काम । तेंचि होय. ॥ २८३ ॥

**अहंकारवियुक्तं चानाद्यंतं द्वैतवर्जितम् ।**

**कैवल्यं शिवरूपं च योगिनां परमं सुखम्. ॥ ३८ ॥**

अहंनाशी[4] माझें रूप । रूपातीत पैं अरूप । हृदयीं प्रकाशे निर्वाती दीप[5] । प्रलय आरोप जेथ नाहीं. ॥ २८४ ॥ स्थीर जे कां शाश्वत । जयां नाहीं आदिअंत । जेथ हा वेदांत । होय पैं गा! ॥ २८५ ॥ जेथ भुवनत्रयाची काजळी । झाडुनि प्रकाशदीप उजळी । तेथ योगियां दिवाळी । निरंतर. ॥ २८६ ॥ जें कैवल्य शिवरूप । परमहंस निष्पाप । जगतरंग आप । चिदात्मक. ॥ २८७ ॥

**इति ज्ञानसमाधानं सांप्रदायेन साधितम् ।**

**विक्षेपावरणघ्नं चाद्वैतं स्वानुभवं च तत्. ॥ ३९ ॥**

इत्यादि ज्ञानसमाधान । सांप्रदायेंचि करून । जीवाचें पैं अज्ञान । दूर होय. ॥ २८८ ॥ तेणें उपाधि[6] नासली । जीवदशा हे उजळली । मग ए-

---

१. मीच ब्रह्म आहें. २. ठेवा, सांठा. ३. कल्पवृक्ष, दाता. ४. गर्वरहित. ५. वातीशिवाय. ६. माया.

कांशींच प्रांजळली । व्यापकत्वें. ॥ २८९ ॥ सर्व झालें एकदेशी । अनेक आलें ऐक्यत्वासी । द्वैतपणाची विवंशी । फेडोनि ठेली. ॥ २९० ॥ जेथ आवरण अज्ञान नासलें । विक्षेप अन्यथा ज्ञान बुडालें । जीवत्व दूषण उडालें । जेथिचें तेथ. ॥ २९१ ॥

**पूर्वसत्कर्मयोगेन कश्चिन्नरेषु साधकः ।**
**निश्चलज्ञानसंयुक्त आत्मानं वेत्ति सर्वगम्. ॥ ४० ॥**

ऐसें निश्चल ज्ञान व्हावें । तेथ कृतकृत्य पैं मानावें । मनुष्यामाजी स्वभावें । विरळा कीं हें. ॥ २९२ ॥ अनंत जन्मांचें सुकृत । तयासिच आत्मवस्तु प्राप्त । मूढ अविवेचे आप्त । त्यांसि पैं नाहीं. ॥ २९३ ॥ ऐसा हा पैं अलभ्य लाभ । जो आरंभारंभस्तंभ । चित्तासि असतां संसारलोभ । प्राप्त नोहे. ॥ २९४ ॥ जीवा शरीरभ्रांति न फिटे । तव आत्मप्रकाश हा नुमटे । संत साधु न भेटे । कोणीच तया. ॥ २९५ ॥ म्हणोनि विरळा पैं कोणी । जेथ विनटे दैवगुणीं । आधिष्ठला आत्मसाधनीं । निरंतर. ॥ २९६ ॥

**इति श्रीसिद्धांतसंहितायां सोहिराविरचितायामर्थार्थिज्ञानयोगकथनं नाम सप्तमोऽध्यायः संपूर्णः ॥**

---

## अध्याय आठवा.

**आत्मानं यो विजानाति नृणां श्रेष्ठतमो मतः ।**
**अन्ये च विषयासक्ताः कस्मै जीवंति ते भुवि? ॥ १ ॥**

जो मनुष्य ऐसा म्हणावा । तयानेंचि जन्म घ्यावा । परमात्मा ओळखावा । हृदयस्थ. ॥ १ ॥ हाचि तयाचा स्वधर्म । नोळखे तरि परधर्म । मग पशूवत् कर्म । भोगा आलें. ॥ २ ॥ ज्याचिये सत्तेनें सर्व झालें । तें यया उपयोगा आलें । तया भगवंताला विस्मरिलें । तरी होय भैव प्राप्त. ॥ ३ ॥ देव एक असे कीं दूसरा । ऐशिया न करितां पैं विचारा । तरि कासया यावें संसारा । वैषयांचि साठीं. ॥ ४ ॥ आणि वासनेतें हरावें । न मरतांचि तरावें । न जन्मतां जन्मावें । भवभ्रमें. ॥ ५ ॥ स्वप्नींच नित्य असावें । कधींच जागृतीतें

१. भूत, जखीण. २. धन्य. ३. कचित्. ४. हृदयांत राहणारा. ५. संसार.

न यावें । ययासि कीं भ्यावें । देहाअंतीं. ॥ ६ ॥ ऐसा अनुताप झालिया चित्ता । म्हणोनि स्मरे भगवंता । सांडुनि देहाची अहंता । तद्रूप होय. ॥ ७ ॥ तरि तोचि धन्य संसारीं । मनुष्ययोनीमाझारीं । तेथ अवगुणाची परी । येत नाहीं. ॥ ८ ॥

**शिष्टधर्मरतो धन्यः सद्गुणी च विराजते, ।**
**बाह्यशुद्धश्च पाखंडी दुर्गुणी नैव शोभते· ॥ २ ॥**

विशिष्टगुणें विराजित । प्राणी सर्वत्रीं मान्य होत । तेथ दुर्गुण कोण पाहत । एका पुढें. ॥ ९ ॥ उत्तम नसे कीं एक गुण । आणि बहुत भरले दुर्गुण । तरी जन्मामध्यें भूषण । उणें आलें. ॥ १० ॥ वरिवरि चांगला आचार करी । आणि शरीर व्यापिलें व्यभिचारीं । तो विटंबचि संसारीं । कीर्ति नसे. ॥ ११ ॥ जेंवी भोरपियाचें धैर्य । कीं चोराचें चातुर्य । वांझ पुरुषाचें वीर्य । निर्फल जैसें. ॥ १२ ॥ नेत्रांवीण पैं सुंदर । कीं दीपावीण जैसें मंदिर । तेंवी सद्गुणावीण शरीर । मान्यता न पैवे. ॥ १३ ॥

**अध्यायाध्यापने चैव ज्ञानयोगव्यवस्थितिः ।**
**शमदमादि सत्यं वै विप्राणां कर्म तूत्तमम्. ॥ ३ ॥**

ब्राह्मणांचा अधिक गुण । प्रथम करावें वेदपठण । शिष्यसमुदाय किजे प्रवीण । अध्ययनें. ॥ १४ ॥ उपनिषदें जें वर्णिलें । चित्तीं व्हावें तेंचि धरिलें । मनन करोनि तद्रूप झालें । पाहिजे जीवें. ॥ १५ ॥ शम दम तपाचें साधन । शौच शांति आर्जवी मन । अज्ञान आणि सज्ज्ञान । पारखिजे पैं. ॥ १६ ॥ हें सांडुनि गांवपण । करी झाडव सुश्रूषण । ब्रह्मत्वाचें मान्यपण । न पवेचि तो. ॥ १७ ॥ तो दानप्रतिग्रहाप्रति । योग्य नव्हे वेदमतीं । ऐशी होय पैं गति । स्वधर्मावीण. ॥ १८ ॥

**क्षात्रधर्मस्तु शौर्यं च युद्धे चाप्यपलायनम् ।**
**जीवस्य निर्ममत्वं वै धृतिस्तु साधुता तथा. ॥ ४ ॥**

क्षत्रियांचें मुख्य लक्षण । युद्ध करावें निरीक्षण । सामोरें व्हावें या संतोषपण । मानुनी चित्तीं. ॥ १९ ॥ शत्रूचा घेउनी धाक । होऊं नये पैरा-

---

१. पश्चात्ताप. २. गर्व, मीपणा. ३. शोभित. ४. पावे, प्राप्त होई. ५. हुशार, विद्वान्. ६. वेदाच्या मताप्रमाणें. ७. पाठमोरें.

ज्मुख । जीवित्वाचा शोक । करूं नये. ॥ २० ॥ सुगंधें आणिलें चंदनपण । ना तरी इतर काष्ठ तैसें जाण । तेंवी धैर्येंचि दिधलें मिरवण । शूरत्वाचें. ॥ २१ ॥ तो एक गुण जेथ पैं नसे । केवळचि जैसा साधु असे । तरी तो शूरचि मान्य दिसे । कवणियेपरी. ॥ २२ ॥ तिखटेंचि मिरीं मिरवलें । आम्ल आम्लत्वें नांमाथिलें । कीं गोडिये ठायीं आवंतिलें । गूळ जैसें. ॥ २३ ॥ जो चढे जयाचे नांवा । तोचि गुण पैं तेथ व्हावा । अन्यत्र गुणांचा विसांवा । महिमा नसे.॥ २४ ॥ ययाचि साठीं स्वधर्म । पुण्यकीर्ति संभ्रम । पाप अपकीर्ति अधर्म । प्राप्ति करी. ॥ २५ ॥

**कुलस्त्रीणां च धर्म्यत्वव्यभिचर्येण वर्त्तनम् ।**
**ईश्वरतुल्यं पूज्यं चँ सद्भावं भर्तृसेवनम्. ॥ ५ ॥**

कुलवधूचा स्वधर्म । न करीच व्यभिचारकर्म । भूषणाचें वर्म । हेंचि तेथ. ॥ २६ ॥ ईश्वरतुल्य पतीतें मानी । संतोष सद्भाव उपजे मनीं । कवणाचा व्यभिचार कानीं । घेईच ना. ॥ २७ ॥ स्वधर्मे मान [4]जोडे । कीर्ति येऊनि गळां पडे । कांहींच पातक न जोडे । संसारींचें. ॥ २८ ॥ वारुवा जैसा देवमणि । श्रेष्ठ जैसा शुभलक्षणीं । तेंवि अव्यभिचार निर्वाणीं । कारण स्त्रियें. ॥ २९ ॥ हें एक नसतां लक्षण । विद्या आणि अन्यत्र गुण । सहसा न पवे भूषण । येणेंविणें. ॥ ३० ॥

**श्रेष्ठधर्मो गृहस्थानां सत्यत्वं प्रियभाषणम् ।**
**भूतेषु सदयत्वं च यथाशक्ति च दातृता. ॥ ६ ॥**

गृहस्थाचे श्रेष्ठगुण । प्रिय आणि सत्य भाषण । यथाशक्ति संरक्षण । दयाधर्म. ॥ ३१ ॥ कधींच न बोले असत्य बोल । तेणेंचि तो पैं अमोल । तया वर्णितां मानडोल । सर्वीच निघे. ॥ ३२ ॥ सदय हृदय जयाचें । सत्व बैसला असे वाचे । मुखमाधुर्य जयाचें । सर्व कर्णी. ॥ ३३ ॥ धैर्य सत्वाचा सागर । जो कां संसारिक नर । विश्रांतीचें माहेर । अनाथांसी. ॥ ३४ ॥ ऐसा गृहस्थचि परि कौतुकें । ऐशिया चिन्हासि तुके । तेथ पुण्यचि भुकें । तयावीण. ॥ ३५ ॥ गृह ऐसें हें शरीरस्थ । त्यांत वसे तो गृहस्थ । तयामाजी संसार स्वस्थ । समत्वें करी. ॥ ३६ ॥ 'सं' शब्दें समानत्व । 'सार' तें

---

१. नांव प्राप्त झालें. २. बोलाविलें. ३. असाध्य वस्तुविषयीं हेतु. ४. प्राप्त होई. ५. दयार्द्र, कनवाळू. ६. उत्तम.

देखें परमतत्व । सारांशेंचि समत्व । बुद्धीसिये. ॥ ३७ ॥ विश्व कुटुंब ईश्वराचें । पंचवीस कुटुंब जीवाचें । तेथ पैं समत्वाचें । सार देखें. ॥ ३८ ॥ 'संसार' शब्दाचा अर्थ । तोचि पूर्ण परमार्थ । मूळ लक्षी यथार्थ । दिसे ऐसें. ॥ ३९ ॥

**अनित्यं च शरीरं वै कीर्तिस्तु शाश्वतापरा ।**

**आप्तवर्गाश्च पोष्या वै गृहस्थस्य मनः परे. ॥ ७ ॥**

कीर्तिच एक देखे । देह मानी तृणासारिखें । आप्तवर्गाचिया हरिखें । संतोष पावे. ॥ ४० ॥ बाह्यकीर्ति प्रपंचीं घडे । अंतरकीर्ति परमार्थी वाढे । यया परि दोहींकडे । देखीव एक. ॥ ४१ ॥ बाह्यकुटुंब विषयें पोशी । आणि अंतरकुटुंब ब्रह्मरसीं । ऐसी असे जयापाशीं । हातवटी पैं. ॥ ४२ ॥ प्रपंच तोचि परमार्थ । म्हणणें याचा हाचि अर्थ । संशयीं पडती व्यर्थ । न कळतां पैं. ॥ ४३ ॥ व्यापकत्व आंगाथिलें । तृणासमान जीवित्व झालें । ऐसें एकें केलें । ब्रह्मबोधें. ॥ ४४ ॥

**मैथुनमष्टकं वर्ज्यमिंद्रियनिग्रहश्च वै ।**

**शुक्रस्य संग्रहो नित्यं कर्मैतद्ब्रह्मचारिणः ॥ ८ ॥**

ब्रह्मचारियाचा धर्म । आकर्षिजे इंद्रियकर्म । आधीं जाणावें वर्म । बिंदूचें पैं. ॥ ४५ ॥ कवण बिंदूचें स्थान । कोठें नादाचें अनुसंधान । यया दोहींचें पैं ज्ञान । असावें आधीं. ॥ ४६ ॥ स्खलन न पवे वीर्य । हेंचि शरीराचें ब्रह्मचर्य । सूक्ष्मदशे तेंवी धैर्य । ज्ञानी व्हावें. ॥ ४७ ॥ स्त्री देखिलिया काम उपजे । तेणेंचि इंद्रियें माजे । मग ब्रह्मचर्य लाजे । विसरे तो कीं. ॥ ४८ ॥ तेणें वीर्यपतन होय । हाचि ब्रह्मचारिया भय । तैसीच असे सोय । आत्मत्वीं हे. ॥ ४९ ॥ देखोनि आकार आश्रम । सहसा जया न पडे भ्रम । '[4]मी ब्रह्म' ऐसा संभ्रम । विसरेचिना. ॥ ५० ॥ तेचि दृढता बिंदूची । भ्रांत न पडे ती मात्रांची । हे ब्रह्मचर्यत्वाची । सूक्ष्म रीति. ॥ ५१ ॥

**मित्राणां श्रेष्ठधर्मस्तु निष्कामप्रीतिवर्धनम् ।**

**अत्यागसहनत्वं च समा चानुमतिः सदा ॥ ९ ॥**

आतां मित्राचें लक्षण । मित्र म्हणावा तो कवण । दर्शनभाषणें संतोषण ।

---

१. ही उक्ति 'वसुधैव कुटुंबकम्' या उक्तीसीं बरीच साम्य पावते. २. नीच. ३. आनंदानें. ४. 'अहं ब्रह्मास्मि' असा.

होय जया. ॥ ५२ ॥ कांहींच मानसीं अर्थ । नुपजे कवणचि पैं स्वार्थ । तो स्नेह जाईना व्यर्थ । शेवटवरी. ॥ ५३ ॥ बरवें देखतां समाधान । श्रम ऐकतां सखेद मन । ऐसेंच चिन्मात्रींचें चिन्ह । ओळखावें. ॥ ५४ ॥ मनीं चोरूनि न ठेवी । तेचि मित्रता जाणावी बरवी । कांहीं कार्या चाड लावी । तो मित्र नोहे संवचोर. ॥ ५५ ॥ कार्याचिया कारण । वर दाखवी बरवेपण । अप्राप्त झालिया दूषण । द्वेष धरी. ॥ ५६ ॥ ईश्वराचा मित्र होये । त्यांतहि द्विधा आहे । एक पैं निष्काम राहे । कीं सकाम एक. ॥ ५७ ॥ स्तवन करितां आराम । देखोनि होईजे निष्काम । विषय इच्छिती सकाम । जाण पैं गा! ॥ ५८ ॥ कांहीं दिवस भजन । करितां नाहीं फळदर्शन । मग उबगोनि स्मरण । सांडिती पैं. ॥ ५९ ॥ तेंवी कीं प्रपंचपरमार्थी । मित्रता असे दोहीं अर्थी । ययाचिकरितां यथार्थी । निरोपिलें. ॥ ६० ॥

**गुरूणां श्रेष्ठधर्मश्च छात्राणां भवतारकम् ।**
**अज्ञाननाशनं तेषां ज्ञानदानं च मुक्तिदम्. ॥ १० ॥**

सद्गुरूचा विशिष्ट गुण । शिष्यासि करावें भवतारण । नसावेंचि आवंतण । आन तेथें. ॥ ६१ ॥ अज्ञान आघवें नासुनि । आत्मज्ञान प्रकाशुनि । जीवदशा उद्धरोनि । तद्रूप किजे. ॥ ६२ ॥ उद्धार न करितां संसार । आघवा चालवी तयावर । तो साधु नोहे संवचोर । जाण तैसा. ॥ ६३ ॥ ययालाचि पैं न ठावें । यानें तयातें काय सांगावें । दोघीही क्रिया भोगावें । कोणी कोणा. ॥ ६४ ॥ तैसे नव्हती ते उत्तम । संत जे कां निरूपम । ते न करितीच पैं काम । ययारिती. ॥ ६५ ॥ मोक्षदानी परम । सहज जे कां निष्काम । साभिलाषीं प्रेम । नाहीं जया. ॥ ६६ ॥

**शिष्यस्य लक्षणं श्रेष्ठमनन्यं गुरुसेवनम् ।**
**प्रज्ञानत्वमनिंद्यं च शाश्वतस्य परीक्षणम्. ॥ ११ ॥**

शिष्याचें सार लक्षण । गुरुसेवे अन्यपण । आत्महित कारण । लक्षिजे जे कां. ॥ ६७ ॥ प्रज्ञावंत डोळस । अगर्व निःशंक निर्दोष । स्वप्नींही निंदेस । स्पर्शला नाहीं. ॥ ६८ ॥ नव्हे कामकटाक्षें व्याकुळ । तीव्र कोपी उच्छृंखळ । ऐसा परम पैं निर्मळ । अधिकारी. ॥ ६९ ॥ सद्गुरुकृपेचें जीवन । आंत जा-

---

१. त्रासून. २. बोलावणें, आमंत्रण. ३. संसारमोचन. ४. अन्य, दुसरें. ५. इच्छा. ६. मोक्षदाता. ७. पाणी.

हला आहे [1]मीन । गुरु अवलोकनीं सुदिन । सदां ज्यासी. ॥ ७० ॥ सकळ साधनीं रूढ । अधिकारिया प्ररूढ । गूढचि पैं हें उघड । समजेल जो. ॥ ७१ ॥ तैसा तन्मय होऊनि विनय । गुरुकृपे पावे अभय । तोचि शिष्यत्वा योग्य होय । तयेठायीं. ॥ ७२ ॥

**साधूनां मुख्यधर्माश्च विचार आत्मनः खलु ।**
**ईश्वरभजनं नित्यं निर्गुणे निरतिः स्थिरा. ॥ १२ ॥**

साधूचें मुख्य लक्षण । करावें पैं ईश्वरस्मरण । आत्मतत्व निर्गुण । शोधावें पैं. ॥ ७३ ॥ शोध करितां हृदयीं दिसे । सर्व दृष्टत्वीं प्रकाशे । देहबुद्धि तेथ नासे । तत्क्षणीं. ॥ ७४ ॥ अखंड रमावें आत्मतत्त्वीं । सर्व मानिजे मुख्यत्वीं । आणि ज्ञानमाजें महत्त्वीं । न फुंजावें. ॥ ७५ ॥ सदैव ब्रह्म विसरूं नये । निर्वाणीं राहावें निर्भय । अद्वय सुख अप्रमेय । भोगीजे पैं. ॥ ७६ ॥ ऐशिया संतांचिया स्वभावा, । स्वल्प बुद्ध्या न घडे सेवा । [2]जैसा भुंजंगें वेढिला ठेवा । धनाचा कीं. ॥ ७७ ॥ ऐसी भगवंताची आज्ञा । व्यर्थ वेंचूं नये प्राज्ञा । हें समजलें सुज्ञां । मुमुक्षांप्रति. ॥ ७८ ॥ तैसा संधीं भाव न दिसे । तेथ केंवी बुद्धि प्रकाशे । म्हणोनि शिष्यत्व असे । विरळागत. ॥ ७९ ॥

**स्वभावस्तु गुरोः शुद्धोऽसह्यश्च दुर्जयः खलु ।**
**सदोषो नैव तस्मिन्ननंतगुणनिधौ बत. ॥ १३ ॥**

समर्थाचिये ठायीं । अवघडचि असे कांहीं । तेथ उद्विग्न न होतां उपायी । योजावेचि पैं. ॥ ८० ॥ मधुवरी मक्षिका बैसे । तैसा आधीं उपसर्ग दिसे । सानशक्ति उद्देशें । उपाव संतीं. ॥ ८१ ॥ प्रथम विषय बाधे तें [3]जिणावें । ऐसें औषध पदरीं घ्यावें । मग धनापाशीं जावें । असे तेथ. ॥ ८२ ॥ आधींच उपाव जाणावा । मग तो पैं सहज लाभ घ्यावा । नातरी तो रुसावा । कवणावरी. ॥ ८३ ॥ आतां कवण कवण ते थोर । तेथ काय दुर्घट प्रकार । तेंचि पैं अवधार । काय कैसें. ॥ ८४ ॥

**तीर्थराजः पवित्रश्च रत्नानां जनकः खलु ।**
**एकेन क्षारदोषेण तृषार्तो नैव तुष्यति. ॥ १४ ॥**

समुद्र थोर सर्वांसि । प्रख्यात पैं भूमंडळासि । वेष्टुनि ईश्वरआज्ञेसि ।

---

१. मासा, मत्स्य. २. सापानें. ३. जिकावें.

ान देतो. ॥ ८५ ॥ सर्व तीर्थे मिळतां त्यासि । पवित्र ऐसा जलराशी । ोटीं सर्व रत्नांसि । निपज होय. ॥ ८६ ॥ ऐसा सर्व प्रकारें समर्थ । परि तृषार्तो दर्शन व्यर्थ । परि देहांतीं स्वार्थ । दावूनि दे. ॥ ८७ ॥ तेथ पैं स्नान करितां । पुण्याची करावी आस्था । तेथ कवण वाखाणे क्षारता । दुर्गुणाची. । ८८ ॥ तैसे साधु समर्थ असती । आणि प्रखर असे पैं प्रकृति । उग्रता पैं ाविति । शब्दासवें. ॥ ८९ ॥ तो न मानावा पैं दुर्गुण । मिरीयांतील ति-खटपणचि देतें गुण । कीं हिरडियांचें तुरटपण । गुणकारी. ॥ ९० ॥ जिव्हे ोड, रोग मारी । ऐसें औषध नाहीं तरी । स्त्री भोगूनि ब्रह्मचारी । कोठेंचि से. ॥ ९१ ॥ असत्यवादी विश्वासी । ऐसा नसेचि कवण देशीं । अज्ञान ावला मोक्षासि । साधनावीण. ॥ ९२ ॥ शीतळ असोनि कठीण । पाषा-ाप्रति उदक जाण । तेंवी साधूचें उग्रपण । कल्याणकारी. ॥ ९३ ॥ माते-चेया कोपा । ओळखावी तेचि कृपा । तेंवि तीव्रतेचिया प्रलोपा । उपदेश ो. ॥ ९४ ॥ जेंवी सिंधूची क्षारता । तेचि आणी पवित्रता । कीं भवरोग री स्पर्शतां । संत शब्दें. ॥ ९५ ॥

**तथापि तं च गच्छंति पापं धावयितुं जनाः ।**

**तद्वत्साधुं तु ज्ञानार्थं विद्यार्थी च गुरुं व्रजेत्. ॥ १५ ॥**

स्नानाकरितां समुद्रा जावें । संतां ज्ञानास्तव भजावें । विद्येसाठीं सोसावें । ोलेल तें. ॥ ९६ ॥ मधुकरितां उंच जागा । चढोनि जाणें पडे पैं गा ! । थ मैधुकर डसती आंगा । तें सहज सोसी. ॥ ९७ ॥ वैद्य परिहरी व्याधि । ध्याचें अवघड आधीं । संकट पहिलें समाधि । प्राणायाम. ॥ ९८ ॥ वन्ही ज्वळतां जैसें । धूम आधीं डोळां बैसे । तेवीं श्रमावीण प्राप्त नसे । कांहीं क. ॥ ९९ ॥ सुखोत्पत्ति मन्मथकर्म । प्रथम शरीरासी पडे श्रम । परि तो मचि ऐसा भ्रम । उपजों नेदी. ॥ १०० ॥

**विश्वप्रकाशकः सूर्यश्चैतन्यजनिता च सः ।**

**पूज्यश्चापि समर्थो हि तापो दोषाय तत्र न. ॥ १६ ॥**

सूर्यासारिखा समर्थ न दिसे । तयाचेनि सर्व प्रकाशे । सर्व उत्पन्न होत से । तयायोगें. ॥ १०१ ॥ मेघ त्याचेनि होय । जलराशि शोषिताहे । मग र्षतां मैहिवरि जिये । धान्यवृद्धि. ॥ १०२ ॥ ब्राह्मणाचें परम दैवत । तयानें

१. वर्णन करी, स्तवी. २. हरण करी. ३. मधमाशा. ४. पृथ्वीवर.

स्नान संध्या होत । जपतप अनुष्ठानयुक्त । तयायोगें. ॥ १०३ ॥ कमल न विकासे तयावीण । जगत् चेष्टवी जें कारण । अक्रियत्वें आपण । गगनीं असे. ॥ १०४ ॥ ऐसा समर्थ सर्व पाळी । परि तेजस्पर्शें आंग जाळी । तरी ऐकिलें नाहीं गाळी । तया देतां. ॥ १०५ ॥ तेवीं सामर्थ्य जयाचिये काखे । तेथ लांछन कवण देखे । अनधिकारिया मूर्खें । निंदिजे गुणा. ॥ १०६ ॥ ऐशिया रविला सर्व वंदिति । परि आंधळा तयातें निंदी सततीं । सर्वां सुख सुगंधी ती । कीटका दुःख. ॥ १०७ ॥

**शतपत्रं सुरम्यं च सौरभेण युतं खलु ।**
**तस्मिन्कंटकवृद्धिश्च दोषाय न कदाचन. ॥ १७ ॥**

शेवती आंगीं कांटा असे । तरी उत्तम तियेचें पुष्प दिसे । फुला झाडा एकचि वसे । संबंध केंवी. ॥ १०८ ॥ सुमन सुगंधें नामाथिलें । तेथ दूषण नाहीं संभवलें । भूषणचि पावलें । तयायोगें. ॥ १०९ ॥ रूपेंचि वेश्या रूपा आली । कीं सत्यानें शृंगारिली बोली । कीं आकाशें आणिली खोली । योग्यते जैसी. ॥ ११० ॥ लज्जेनेंचि विराजे कुलवधू । कीं द्वेषेंचि दाविला विरोधु । अज्ञानें आणिला बाधु । जीवदशेचा. ॥ १११ ॥ तेंवी एक गुणें सर्व शोभे । तेथें दूषण काढिल्या काय लाभे । तेथ पातकचि सांगिजे जिभे । बोल म्हणे. ॥ ११२ ॥

**शीतला तु पवित्रा सा गंगा च पापनाशिनी, ।**
**तस्यां कर्दमसंघश्च नैव दोषाय जायते. ॥ १८ ॥**

गंगोदक पवित्र परम । आन गंगे आंत कर्दम[3] । तेच दूषणाचा भ्रम । न पडे कोण्हा. ॥ ११३ ॥ जें पावन करी पैं जिवां । पदरीं बांधी पुण्यठेवा । पवित्रतेचिनि वैभवा । शोभली ते. ॥ ११४ ॥ पातक अवघेंचि पैं गाळी । आणि पुण्याचा प्रताप उजळी । जया पुण्याची नवाळी[4] । सुख दावी. ॥ ११५ ॥ ऐसें असतां हेळण । करी ऐसाही असेल कोण । अघोरकर्म दारुण । महापापी. ॥ ११६ ॥ जो मुद्दलचि पैं आळशी । तो गंगेतें परम द्वेषी । जरी कां पुण्य घडे स्नानेंशी । तरी आंतचि मत्स्य. ॥ ११७ ॥ ऐसे आलस्याचे निकल्पे । मना येई तेंचि जल्पे[6] । तो तुष्टला पैं स्वल्पें । प्रपंचें येणें. ॥ ११८ ॥

१. शिवी. २. पुष्प. ३. चिखल. ४. नवीनपणा. ५. द्वेष, वैर. ६. बोले, बडबडे.

म्हणोनि संभावितां दूषण । लावितां न लगेचि पैं जाण । पवन घातलिया आण । आयके जेंवी. ॥ ११९ ॥

**तेजःपुंजयुतं रत्नममोघं कठिनं खलु ।**
**काठिन्यं तु न दोषाय भूषणाय परं च वै. ॥ १९ ॥**

रत्नाची प्रभा अमोलिक । अंधःकारीं तमनाशक । परि तयाचे आंगीं असे एक । कठिनत्व पैं. ॥ १२० ॥ तेथ स्पर्श इच्छा न करावी । ते प्रभाचि डोळां देखावी । म्हणोनि हातवटी कळली व्हावी । जेथिची तेथ. ॥ १२१ ॥ लेह्य असलिया पितां नये । खाद्य चोखितां गोडी न पवे । चोष्य खातां जहीं होय । रसने चोरी ॥ १२२ ॥ प्राप्त वस्तु पावे सिद्धि । ते भोगावया पाहिजे बुद्धि । वर्तमाने लागे शुद्धि । परि यत्न व्हावा दर्शना ॥ १२३ ॥ तैशी वस्तु समर्थ आहे । ते अवघडचि आधीं पाहें । मग रीति कळलिया सुलभ होय । आ-वडे तैशी ॥ १२४ ॥

**चंदनं शीतलं चैव सुगंधं सौभगं खलु, ।**
**तस्मिंश्च तिक्ततादोषः कथं भवति पश्य वै ? ॥ २० ॥**

चंदन स्वादातें कडु । परि घ्राणासिच लागे गोडू । रसने होय निवाडू । अप्रियाचा. ॥ १२५ ॥ जया करितां जहालें असे । तयासिच तें प्रिय असे । अग्राहक निंदितसे । सहज तें पैं. ॥ १२६ ॥ देह रोगियां अन्नद्वेषी । भाग्य देखोनि दुबळा क्लेशी । कीं सुंदरीला उपहासी । कामुक जैसा. ॥ १२७ ॥ म्हणोनि जयासि जें प्राप्त नाहीं । तो द्वेष कीं करील कांहीं । तेंवी अज्ञाना ज्ञान न साही । ते निंदिति साधू. ॥ १२८ ॥ चोर चंद्राचा द्वेष करी । आचार द्वेषी अनाचारी । विचारद्वेषी अविचारी । मूर्ख जैसा. ॥ १२९ ॥

**मृगमदः सुगंधिश्च बहुमूल्यः सुखप्रदः ।**
**पशुभूतमिदं किं च ब्रूहि त्वं दूषणं ननु. ॥ २१ ॥**

जैवादि अथवा कस्तूरी । सुगंधिक नानापरी । तयाचें कीं अधिकारी । घ्राण तें पैं. ॥ १३० ॥ घ्राणासीच संतोष । जैसा सिंधूसी भरिजे उल्हास । भोगी सुगंधि सावकाश । जयापरी ॥ १३१ ॥ सुगंधीं सर्वज्ञपण । पदार्थाची पारखण । जाणे अज्ञानाचें लक्षण । जिज्ञासु जेंवी. ॥ १३२ ॥ ते नेत्रांसि न

१. जिभेला. २. निकाल. ३. कोंकणांतील एक जातीच्या वन्य पशूच्या बेंबींत सांपडणारा पदार्थ. ४. परीक्षा.

पवे खुण । सुगंधाचें सर्वज्ञपण । तयानें करावी खाण । रूपाचीच. ॥ १३३ ॥ म्हणोनि अधिकाराविण । कांहींच पैं न कळे जाण । रसाअनधिकारी घ्राण । तेथ कारण जिव्हाचि. ॥ १३४ ॥

**गृह्यंत इंद्रियग्रामैर्यथा स्वविषयाः खलु ।**
**तथाधिकारिणा चैव गृह्यते ज्ञानमुत्तमम्. ॥ २२ ॥**

नानारस पक्वान्नें । करोनियां दिव्यान्नें । घ्राणाचिया संनिधानें । करावीं काय. ॥ १३५ ॥ नानापरिचा सुगंध । श्रेष्ठ जो कां मकरंद । तो जिव्हेपाशीं सिद्ध । करोनि काय. ॥ १३६ ॥ म्हणोनि ज्याचें तया नेलें । तरि नेलियाचें सार्थक झालें । अनधिकारी अव्हेरिलें । अपमान पावे. ॥ १३७ ॥ घेतां जितेंद्रियाचें दर्शन । पतिव्रताचि पावे समाधान । आणि स्वैरिणी न करी सन्मान । नपुंसक म्हणे. ॥ १३८ ॥ म्हणोनि जो जयाचा अधिकारी । देखतांचि पैं प्रीति धरी । अनुभवी कीं स्वीकारी । तेथील पैं. ॥ १३९ ॥

**पद्मिनीरूपभार्यायां किं रमेत नपुंसकम् ।**
**साधोश्च परमं गुह्यमज्ञो जानाति वै कथम्? ॥ २३ ॥**

पद्मिनी असोनि कीं बरवी । नपुंसका काय करावी? । तेंवी अज्ञानाचिया जीवीं । ज्ञान न पडे. ॥ १४० ॥ अविद्या आंगीं प्रबळली । अन्यथा नीज सबळ झाली । तेथ स्वप्नावस्था उँजळली । दृष्टिपुढें. ॥ १४१ ॥ नानाप्रकार देखिले । मोहें मानस खवळलें । तये वेळां पैं खिळले । रजतम. ॥ १४२ ॥ तेणें परमार्थाची नसे गोडी । केवळ संसारचि वाटली जोडी । सर्व लोकप्रौढी । ऐसिच हे. ॥ १४३ ॥ तेणेंचि काळ व्यर्थ गेला । अविवेक हृदयीं रिघाला । मग सत्व रज तम तिघांला । सत्ता झाली. ॥ १४४ ॥ तयामाजी सत्वाचें बळ । न चलेचि पैं केवळ । तेथ रज तम प्रबळ । दोघे आथी. ॥ १४५ ॥

**दुर्गंधे कीटकप्रीतिः सुगंधे मरणं ध्रुवम् ।**
**तद्वदज्ञजनः सर्वो ज्ञानं तिरस्करोति वै. ॥ २४ ॥**

सुगंध वस्तूचें दर्शन । होतां कीटकांसि होय मरण । दुर्गंधींत संतोषण । उपजे तयां. ॥ १४६ ॥ ऐसा अज्ञान जनांचा स्वभाव । परमार्थाचें न सोहवे

---

१. फुलांतील रस. २. अनादर केला, अनादरिलें. ३. जारिणी, वेश्या. ४. दिसली, प्रकाशित झाली. ५. सहन न होई.

नांव । निंदा वाद स्तुति लाघव । प्रिय वाटे. ॥ १४७ ॥ अन्यथा ज्ञानाचा खेळ । जया प्रिय झाला केवळ । तेणेंचि क्रमिजे काळ । तयानें पैं. ॥ ११८ ॥ ऐसें दृश्य वाटलें दृष्टिपुढें । मोहमदिरेनें[1] केलें वेडें । कीं गुणत्रयदोरें माकडें । बांधिलीं जैसीं. ॥ १४९ ॥ ऐसा उत्पत्तीचा प्रवाद । विस्मृतीचा प्रमाद । मधिलें पाहूनि आद्य[2] । विसरला कीं. ॥ १५० ॥

**धनविषयलुब्धाश्च निंदापाखंडवादिनः ।**

**कर्माभिमानिनः पापा विमुखाः साधुदर्शने. ॥ २५ ॥**

धनाचें बोलणें बोलावें । कीं विलास वर्णितां डोलावें । पाषांड काढोनि[3]तंडावें । दिवसभरी. ॥ १५१ ॥ विधिनिषेध कर्मठपण । व्रत तीर्थाचें पोषण । दुजियाचें दूषण । बोलणें सूये. ॥ १५२ ॥ अवचटें साधु पावला । तयासि दिसे उपद्रव आला । मग चंद्र देखोनि संकोचला । कोल्हा जैसा. ॥ १५३ ॥ पुरुष देखोनि विरक्त । स्वैरिणी स्त्रीस संकोच होत । तया परी चोरित । मानस तया. ॥ १५४ ॥ ऐसिया लोकांचे समुदाव[4] । तेथ साधूचें नसे नांव । तयाचाचि गांव । आघवाचि हा. ॥ १५५ ॥

**संकटेऽपि विरक्तस्तु वसेन्नैतादृशेषु वै ।**

**यदि वासो भवेत्तेषु न बोद्धव्याश्च ते तु वै. ॥ २६ ॥**

जेथ ऐशिया लोकांचा गांव ये । तेथ विरक्तीं बैसूं नये । संतोषासि होये । असंतोष. ॥ १५६ ॥ गांवपण[5] मांडलिया वायसें । तयांत जाऊं नये हंसें । गेला तरी हांसें । सर्वांसींच ये. ॥ १५७ ॥ भक्षण तयातें पूसती । तंव हंस सांगेल मोतीं । कावळे तयातें निंदिती । अति वानिती श्वानमांसा[6]. ॥ १५८ ॥ व्यभिचारिणी समस्ता । त्यांत गेलिया पतिव्रता । उपमानें समता । आपुली देती. ॥ १५९ ॥ बहुत दुबळांआंत । एकटाचि जाय धनवंत । ते करिती आपणवत् । कितीएक दिवसीं. ॥ १६० ॥ जरी कां तया आंत वसावें । तरी कार्याकारणचि वर्त्तावें । तेथ प्रकट ज्ञान न करावें । अंतरींचें. ॥ १६१ ॥ जेरी वैद्याचिया पाशीं । जाणें जेंवी औषधासी । तेथ अर्थ न येतां विवशी । रोगाचिये. ॥ १६२ ॥

---

१. मोहरूप मद्यानें. २. आद्य, पहिलें. ३. भांडावें. ४. समूह. ५. ग्रामस्थांची सभा. ६. कुत्र्याच्या मांसाला.

**भोक्तृत्वान्नोदकार्थं च द्वये संगश्च जायते, ।**

**तद्विना तु चरेद्धीमान्निःसंगं निरुपद्रवम्. ॥ २७ ॥**

भोक्तृत्व हेंचि पैं व्याधि । अन्नउदकाची उपाधि । शरीरा पडियली आवधि । सुटेना कीं. ॥ १६३ ॥ तयांचा पडिलाचि पैं प्रसंग । तरी तितुकाचि करणें संग । मागुतीं निःसंग । राहणें जे कां. ॥ १६४ ॥ दुग्धावेळींच तेथ जाणें । नसे गाईशीं क्रीडणें । नसे उच्छिष्टांत बैसणें । जेविलीया. ॥ १६५ ॥ स्नानासि जो जाय । नदींतचि बैसोनि राहे । तेंवि विश्वीं न विसावेतां होय । कार्यार्थी जो. ॥ १६६ ॥ सामान्य रोगाचें भेषज । द्रव्य केलें असे सहज । जगदर्शनीं पैं काज । एवढेंचि हें. ॥ १६७ ॥ जरी जगाकडे कवण काम । जगा पडिला अज्ञानभ्रम । तेथ साधूचा संभ्रम । होय कैसा? ॥ १६८ ॥

**एकाकी सन्विरक्तस्तु स्मरेद्धरिं च पुण्यदम् ।**

**यस्य स्मरणमात्रेण मुच्यते जन्मबंधनात्. ॥ २८ ॥**

एकटपणीं न जाय वेळ । तरी ईश्वरस्मरणीं काळ । क्रमावा तया आळ[३] । नसेचि कांहीं. ॥ १६९ ॥ तेणें परिणामहि निर्वाळे । अलभ्य लाभ मोक्ष फळे । स्मरतां पातक पळे । जयाचिया नामें. ॥ १७० ॥ भुकेला सिंह सेविना तृण । पतिव्रता कामातुर जाण । भोग न करी पतीविण । जयापरी. ॥ १७१ ॥ तेंवी भगवत्स्मरणीं घडी । क्रमावी पावोनि परथडी[३] । ज्ञानियांची आवडी । असावी ऐसी. ॥ १७२ ॥ विहिताचरणीं प्रतिष्ठा पावे । नमनचि आवडे करावें । अधर्में होत आहे स्वभावें । अप्रतिष्ठा. ॥ १७३ ॥

**यथा लाभः फलाहारोऽन्नं सद्भिर्भक्ष्यते खलु ।**

**तैरपि नोपदिश्यंतेऽज्ञानाः कामरता ननु. ॥ २९ ॥**

भोजनाविरहित भूक । सहसा न मोडे देख । लाभावीण हैंरिख[४] । न वाटे जैसा. ॥ १७४ ॥ जेथ अन्नाची सोय न पवे । तंव क्षुधेचा श्रम न सोसवे । म्हणोनि मिळेल तयासवें । फलाहार कीजे. ॥ १७५ ॥ परि तृप्ततेचि प्रतीति । नयेचि पैं तयाप्रति । मागुतीं उरे पैं भ्रांति । क्षुधेची ते. ॥ १७६ ॥ तेंवी साधुसि इच्छा भाषणाची । आत्मयाचिया भूषणाची । ऐशिया विशेषणाची । न होय भेटी. ॥ १७७ ॥ आणि कालक्रमणा न होय । भलत्यासी

---

१. औषध. २. इच्छा. ३. पलीकडला किनारा. ४. हर्ष, आनंद.

धरी सोय । तेथ बोलतसे अभिप्राय । अध्यात्माचा. ॥ १७८ ॥ तें अध्यात्म तया अज्ञाना । बोलतां न पडे समाधाना । तयाचिया तरी मना । नावडेचि तें. ॥ १७९ ॥ जेंवी गायन केलें बधिराशीं । कीं नृत्य आरंभिलें अंधापाशीं । नागसर वाजविला दिवडापाशीं । जयापरी. ॥ १८० ॥ पद्मिणी गेली नपुंसका भेटी । दृष्टी पडतां कामना नुठी । ऐकतां विलासगोष्टी । न चढे ऊर्मी. ॥ १८१ ॥ तेंवि ऐकोनि ज्ञानाचा महिमा । अज्ञाना न चढेचि प्रेमा । म्हणोनि तेथ उपक्रमा । करूं नये. ॥ १८२ ॥

**जारिणीधर्मपत्न्यास्तु भर्त्रा या लभ्यते गतिः ।**

**तां गतिं साधवो यांति दुर्जनस्य समागमात्. ॥ ३० ॥**

धर्मपत्नी ना जयाला । म्हणोनि सौख्यार्थचि कल्पिला । आणि संग तयानें केला । स्वैरिणीचा. ॥ १८३ ॥ तेथ द्रव्याचा नाश केला । जगीं उपहास पैं झाला । सेखीं[2] लांबा[3] लागला । पातकाचा. ॥ १८४ ॥ यमजाचणीं योग्य जाहला । धर्मपरमार्थी नागवला । अर्थकामेंशीं नाडला । गृहस्थाश्रमा. ॥ १८५ ॥ इतकियांत वृद्धापकाळ । आलिया व्याधीनें होय व्याकुळ । ते अनुवृत्तिसी अनुकूल । कोणी नाहीं. ॥ १८६ ॥ तैसी साधूचीही होय गति । मूर्खाची धरिलिया संगति । शेवटीं पावे उपहति । ऐक कैसी. ॥ १८७ ॥ ज्ञान शिकला ययापाशीं । परी गुरुत्व[4] नेदी ययासि । परतोनि उठे वादासि । याचिसवें. ॥ १८८ ॥ अज्ञानाची अक्कल उणी । आपुलें महत्व साधूसि आणी । जनामाजी हेटणी । होय ऐसी. ॥ १८९ ॥ तोचि शरणागत शिष्य होता । तरी नाचरता हे कृतघ्नता । उचितासिच जडता । योग्यतेसि. ॥ १९० ॥ म्हणोनि चाक न लावितां गाडा । कीं न पेटवितांचि[5] पाडा । आणि न राहटवितां घोडा । वरी बैसूं नये. ॥ १९१ ॥ पदर न येतां विलाशीं । प्रवर्तूं नये कुमारीशीं । व्याकरणाचा अनभ्यासी । गीर्वाण त्यासि बोलूं नये. ॥ १९२ ॥ तेंवी अनधिकारिया संगा । करितां नये अंतरंगा । केलिया होय पैं दगा । ज्ञानमार्गी. ॥ १९३ ॥ म्हणोनि सांगणें सज्ञाना । देखणें होय स्वसमाना । तेथ आत्मज्ञानदुकाना । उघडें किजे. ॥ १९४ ॥

---

१. वाद्यविशेष. २. शेवटीं. ३. डाग, दोष. ४. श्रेष्ठत्व, मोठेपण. ५. गाडीच्या किंवा नांगर ओढण्याच्या कामाचे सवयीचें शिक्षण न देतां. ६. पोळ.

**सतां च संगतिः श्रेष्ठा सद्भिः सह निरंतरम् ।**

**तेषां संभाषणं नित्यं सर्वसौख्याय जायते. ॥ ३१ ॥**

रत्नासरिसा बैसवावा । तरी रत्नमणीच पैं व्हावा । हंस झाला तरी ओळखावा । हंसानेंचि. ॥ १९५ ॥ भूपा मित्र पैं भूप । कीं आपा मित्र पैं आप । शृंगारा सज्जनरूप । जयापरि. ॥ १९६ ॥ चंदना देखे चंदन । कीं वंदनदीक्षा वंदन । कीं आराध्या देखोनि आराधन । होय जैसें. ॥ १९७ ॥ तेंवी साधूचिया समाधाना । साधूचि पावे सन्माना । कीं कारण जेंवी दिनमना । सूर्य जैसा. ॥ १९८ ॥ मग प्रकाश मिळे प्रकाशा । सुवर्ण जेंवी सुवर्ण कैसा । अवकाश आणि आकाशा । मिळणें जैसें. ॥ १९९ ॥ तें न मिळतांचि आहे मिळणें । आणि न बोलतांचि होय बोलणें । न चाखितांचि पैं चाखणें । शब्दरसातें. ॥ २०० ॥ न बैसतां तेथ बैसणें । पैस नसतां पैस होणें । हे तेथींचिये खुणे । जाणती जे. ॥ २०१ ॥

**प्रकृतिरुभयोरेका त्वभ्यासोऽपि द्वयोः समः ।**

**ताभ्यां लक्ष्यत ऐक्यं च साधनं हि द्वयोः समम्. ॥ ३२ ॥**

दोघांचीहि प्रकृति एक । अभ्यास दोघांचा सम्यक । अलक्षीं लक्ष समतुक । एकचि जेंवी. ॥ २०२ ॥ तेथ संवादा पडे सांगड । ऐसें बोलणें गुह्य उघड । कीं दोघांही घेणें एकचि गड । परब्रह्म. ॥ २०३ ॥ दोहीं डोळां पैं एक दिठी । कीं दोहीं वाचीं एक [3]गोठी । तयापरि राहटी । संवादाची. ॥ २०४ ॥ दोहीं चरण एक चाली । कीं एकचि केंस पैं दोहीं भाळी । तयापरि येथ झाली । संवादकळा. ॥ २०५ ॥ दोही उंसा एक गोडी । कीं दोहीं रतियां एक चाडी । तयापरी पैंरवडी । संवादाची. ॥ २०६ ॥

**तत्रालापांस्तयोः श्रुत्वार्तादयो यांति वै सुखम् ।**

**तेऽपि भवंति संताश्च तरवश्चंदनेन वै. ॥ ३३ ॥**

तेथ आर्त्त जिज्ञासु असती । तेही श्रवणीं सुख पावती । शब्दार्थाचें मनन करिती । शेवटीं होती तद्रूप. ॥ २०७ ॥ अर्थार्थी योग साधिती । निर्गुणातें आराधिती । मग ध्येयध्यान विसरती । तद्रूपत्वें ॥ २०८ ॥ सहज ऐकावया येती । तेही जेथ सुख पावती । श्रवण होतां उदास

१. कसोटीस, परीक्षेस. २. समान, सारखें. ३. गोष्ट, कथा. ४. प्रकार.

होती । प्रपंचाशीं. ॥ २०९ ॥ मग स्वजाति देखोनि सकळ । संत बोलती प्रांजळ । तत्वरूप केवळ । यथास्थित. ॥ २१० ॥ मासा दिठी देखलिया । उदकींच घातलें न्हावें तया । कीं निर्भयत्व दाविजे भया । परिसतां यातें. ॥ २११ ॥ उपवासें शीणला तया । बळेंचि ओगरिजे ठाया । तेंवी सर्वार्ते समुदीया । दाविजे ब्रह्म. ॥ २१२ ॥ ऐसा मनोगत संतांचा । अधिकार पाहोनि तयाचा । मग तत्त्वोपदेशाचा । वर्षाव करिती. ॥ २१३ ॥ परिसाचिया स्पर्शनें । लोहाचेंचि होतें सोनें । तेंवी साधूचिया दर्शनें । अज्ञान होती ब्रह्मरूप. ॥ २१४ ॥ चंदनाचिया संगतीं । खैर धामणें चंदन होती । ते साधुसंताची जवळीक करिती । तेही पावती साधुत्व. ॥ २१५ ॥

**आत्मबोधसुखं नित्यं भक्तिज्ञानसमुत्थितम् ।**

**स्वच्छं तच्छृण्वतां शश्वत्सर्वेषां तु सुखप्रदम्. ॥ ३४ ॥**

एक रविचिया प्रकाशें । बहुत कमळ पैं विकाशे । कीं एक मेरुचेनि निवालिसे । सर्व सृष्टि. ॥ २१६ ॥ एक अन्नें सर्व तृप्त । एक ज्ञान सर्वां अलिप्त । एक दीपें सर्वां दिप्त । पडे जैशी. ॥ २१७ ॥ तेंवीच हें आत्मसुख । सर्वांसींच होय हरिख । अऽहेरूनि रूपरेख । ऐसें होय. ॥ २१८ ॥ आत्मबोध होय उत्पन्न । तयासि नलगे व्युत्पन्न[3] । भक्तिज्ञानाचें अनुसंधान । पाहिजे तेथ. ॥ २१९ ॥ चरणसंकोच आसनार्थ । नेत्र झांकणें नलगे तेथ । नळगेचि बोलणें अर्थ । आघवाचि वेळां. ॥ २२० ॥

**सुखसाध्यं समाराध्यं यत्परात्मसुबोधकम् ।**

**सर्वमयमभेद्यं चार्तिं विनोपदिशेन्न तु. ॥ ३५ ॥**

सुख सिद्ध झालें प्रस्तुत । सर्वत्र देखिला भगवंत । हेचि परमप्राप्तिप्राप्त । तेथिंची पैं. ॥ २२१ ॥ साम्येंचि साधिला महायोग । साम्येंचि नाशिला भवरोग । साम्येंचि दवडिला वियोग । जीवशिवाचा. ॥ २२२ ॥ हेंचि परम आराधन । सहजचि आहे साधन । असे जैसें पुरातन । तेंचि दिसे. ॥२२३॥ निरोध राहिला आघवा । प्रसर नसे जया भावा । स्वरूपावांचुनि रिघावा । नाहींच कोठें. ॥ २२४ ॥ ऐशी झाली प्रसन्नता । निजबोधाची दुर्लभता । हे खुण आर्तावांचुनि तत्वतां । न बोलावी. ॥ २२५ ॥

---

१. वाढणें, जेवावयास वाढणें. २. थंड झाली. ३. विद्वान्.

**पूर्णात्मज्ञानिना नैवाज्ञेषु वासः क्रियेत वै ।**
**किंतु तेषां च संबंधोऽप्यसंतोषाय जायते. ॥ ३६ ॥**

जो आत्मज्ञानें दृढ होय । तेणें जनसहवास करूं नये । असंतोषासि होय । कारण कीं. ॥ २२६ ॥ ठगाचिया गांवीं सात्विक । प्राणी गेलिया स्वाभाविक । अपहारीं कौतुक । दाविती ते. ॥ २२७ ॥ कीं वेश्येचें दर्शन । सुखरूपेंचि करितें हाण[1] । अज्ञानाचें शहाणपण । तैसें आहे. ॥ २२८ ॥ प्रथम लीन भाव दाविती । साधूचा कीं अंत घेती । पारखोनि पैं गर्वा येती । परतोनियां. ॥ २२९ ॥ अर्थ असलिया हारविती । परमार्थ बोलों वचकती । ऐशिया संव चोरांची संगति । तेही नको. ॥ २३० ॥ सहवासें संतोष नाहीं । अथवा भाषणामध्येंहि कांहीं । सुखचि आघवें तये ठायीं । सोडोनि जाय. ॥ २३१ ॥ ऐशियांसवें संभाषण । स्वप्नींही नसावें जाण । शरीरास्तव कार्याकारण । असावें कीं. ॥ २३२ ॥

**इति श्रीसिद्धांतसंहितायां सोहिराविरचितायामज्ञाज्ञयोः संगफलयोगो नामाष्टमोऽध्यायः ॥**

---

## अध्याय नववा.

**नायकः सर्वलोकानामनंतसुखदायकः ।**
**सत्त्वस्थाय चिरं शांतिं स्वानंदं च ददाति वै. ॥ १ ॥**

सत्त्वाचिया पोटीं । जो निष्काम उन्मेष उठी । स्वानंद साम्राज्य पटीं । बैसवीतो. ॥ १ ॥ तेणें शांतीच पैं एक । प्राप्ति पाविजे अमुक । त्रैलोक्याचा नायक । दृष्टीसि ये. ॥ २ ॥ दृष्टी हारोनि द्रष्टा होय । तें कीं आपणचि आहे । ध्यान हरोनि ध्यास राहे । जेथिंचा तेथ. ॥ ३ ॥ ऐसें होय पूर्व स्मरण । जेथ समूळ नासे जीवपण । अन्यथाभास भ्रमण । तुटे जेथें. ॥ ४ ॥ ऐसा हृदयींच प्रकाश । झालिया दृश्यभासाचा नाश । हा सहजीं करी उद्देश । दर्शनाचा. ॥ ५ ॥ दर्श नसे तें दर्शन । कीं स्पर्श नसे तें स्पर्शन । अगोचर अवलोकन । ऐसें असे. ॥ ६ ॥

**ब्रह्मांडं निर्मितं तेन सत्तारूपं सचेतनम् ।**
**सर्गस्थितिलयैर्युक्तमव्यक्तं शाश्वतेन वै. ॥ २ ॥**

---

१. हानि, नाश. २. द्रव्य.

जेणें उभारिलें ब्रह्मांड । आंत रचिले अनंत पिंड । पृथ्वी हे नवखंड । आधार तया. ॥ ७ ॥ अचेतन प्रथम अंकिलें । भूतकर्दमें कालविलें । मग अवयव तयाचे दाविले । उघडोनियां. ॥ ८ ॥ आधीं गुप्तरूपचि रचिलें । मग दृश्यदृष्टीं प्रकट केलें । कांहीं वेळ पैं खेळविलें । मागुतीं केलें अदृश्य. ॥ ९ ॥ जैसा पक्षियें घरटा केला । आंत येतजातचि राहिला । सेखीं जेथींचा तेथ टाकिला । वृक्षावरी. ॥ १० ॥ जैसा सर्पयोनी पावला । त्वचा प्राण एकचि झाला । परी त्वचा टाकुनि गेला । सेवटीं जैसा. ॥ ११ ॥ क्षुधायोगें प्रयोजिलें । पात्र आदरेंचि आवंतिलें । भोजनाअंतीं टाकिलें । निष्प्रिय जैसें. ॥ १२ ॥ तैसिया निचेष्टित अचेतना । चेतवी जे कां चेतना । ते ब्रह्मसत्ता-सनातना । जाण ऐसी. ॥ १३ ॥ नाशवंत तें सर्व नाशीं । नाशीत सत्ता अविनाशी । अनादी अव्यक्त ऐशी । श्रुति बोले. ॥ १४ ॥

**चंद्रसूर्यौ प्रकाशात्मौ भिन्नगुणौ सुतेजसौ ।**
**कृताः स्थिरा नगास्तेन सुवेलास्थितसागराः. ॥ ३ ॥**

पृथक् पिंडीं देखणा झाला । दृश्यदृष्टीं आवंतिला । तेथ सत्ताप्रकाशें निर्मिला । सूर्य ऐसा. ॥ १५ ॥ जयाचें तेज विमर्षण । करी सर्वांचें पोषण । तेथ घातलें पाहिजे विशण । कांहीं तया. ॥ १६ ॥ यदर्थी सृजिला शशांक । तो औषधी करी अशोक । अमृतसरोवरीं निःशंक । अंतरसाक्षी. ॥ १७ ॥ पवन दहन समारंभा । वन्हीच केला पैं उभा । सर्वचि न पुरे क्षोभा । जयाचिया. ॥ १८ ॥ पर्वतांचे पक्ष छेदिले । यथास्थानीं स्थिर केले । तेणें उपसर्गचि खंडिले । प्राणियांचे. ॥ १९ ॥ समुद्रउंची पृथ्वीहून । तो स्थिर टेविला आज्ञापुन । पायरेखा नुलंघुनी । न चलेचि तो. ॥ २० ॥

**आकाशं विस्तृतं चैव चपलः पवनः कृतः ।**
**तेजस्तूष्णं कृतं तेनार्द्रं जलं संज्ञितं खलु. ॥ ४ ॥**

जेथ विस्तीर्णत्व कल्पिलें । तेथ आकाश ऐसें जाहलें । यास्तव संतोषत्व आलें । जीवजंतु. ॥ २१ ॥ जेथ कीं अवकाशाविण । वाढेचि ना पां कवण । तया विशेषा कारण । करोनि ठेलें. ॥ २२ ॥ निचेष्टित आघवें न चले । योजना झाली अव्यक्त कळें । तेथ जन्म घेतला अनिळें । तये सत्ते. ॥ २३ ॥

---

१. चिखलानें. २. शेवटीं. ३. बोलाविलें. ४. न आवडणारें. ५. उत्पन्न केला. ६. वायूनें.

अंधत्व पावे आघवें । जीवजंतूतें स्वभावें । आणि आहारही पचन व्हावें । सेविले सर्वी. ॥ २४ ॥ म्हणोनि तेजाचें एवढें । रूपचि ठेलें दिठीपुढें[1] । तेथ शबल शुद्ध निवाडें । द्विधा केलें. ॥ २५ ॥ तेजाचीच प्रबळता होय । तेथ प्राण केवळ न जीये[2] । ययाकारणें तोय । निर्माण केलें. ॥ २६ ॥

**सर्वाधारा धरा चैव निर्मिता वै स्वसत्तया ।**
**तेनैव शेषरूपेण सुस्थिरा च कृता खलु. ॥ ५ ॥**

दृश्याचिया आधारा । निर्माण केली धरा । तिये अंतरिक्षीं थारा । कैसेनि होय. ॥ २७ ॥ मग शेषाचा अवतार धरी । पृथ्वी घे पैं मस्तकावरी । चराचर[3] रचिलें वरी । आघवेंचि. ॥ २८ ॥ मुद्दलीं शून्य निरंजन । तेथ पृथ्वी आली कोठुन । उदकासि स्थान । कवण पै तें. ॥ २९ ॥ दहन[4] कोठुनि आणिला । पवन कैसा निर्माण झाला । आकाशाशीं व्यापिला । अवकाश कैसा. ॥ ३० ॥ एवं ईश्वरसत्ता समर्थ । ज्या ज्या वेळीं जो जो कां अर्थ । प्रकट होय पदार्थ । स्वभावेंचि. ॥ ३१ ॥ सत्ता तेचि कीं माया । आणि मायेचें कौशल्य हे काया । मग कायेचिया ठाया । संसार आला. ॥ ३२ ॥ संसारासंगें भ्रम । आणि भ्रमामाजी सकळ काम । सकामेंचि आत्माराम । अंतरला. ॥ ३३ ॥ म्हणोनि हा चिद्विलास । विस्तारला पैं दृश्यभास । तेथ अनेक पैं भूतांस । उत्पत्ति होय. ॥ ३४ ॥

**तस्यां तु प्राणिनां तेन गतिश्च कल्पिता खलु ।**
**आयुः स्वल्पं च दीर्घं वै क्षयो वृद्धिश्च कल्पिता. ॥ ६ ॥**

मग पृथ्वीवरी हे जीव । गमनागमन करिती सर्व । वृथा धरिती कीं गर्व । जीवबुद्धि. ॥ ३५ ॥ कवण एक स्वल्पायुषी । एक ते दीर्घायुषी । कांहीं दिवस वृद्धीसि । पावती ते. ॥ ३६ ॥ कांहींवेळां शून्य होय । नोंदणुक[5] पैं दृष्टी नये । ऐसा मिथ्याचि होय । संसार हा. ॥ ३७ ॥ जैसें कीं तें मृगजल । क्षणैक भासे घडिपळ । पातलिया सांजवेळ । नाहींच होय. ॥ ३८ ॥ कीं क्षणेकं स्वप्न दिसे । मग मिथ्या होय जागृतिदशे । संसार दिसे ज्ञानप्रकाशें । मिथ्या तैसा. ॥ ३९ ॥

**कचित्कुटुंबिनश्चैव कचिद्दीनाः कचिन्मृताः ।**
**कचिच्च विभवस्तृप्ता उपोषितादयः कृताः ॥ ७ ॥**

---

१. दृष्टीपुढें. २. जगे, वांचे. ३. स्थावरजंगम. ४. अग्नि. ५. वागणूक.

कांहीं दीन कुटुंबीं नांदे । कोणे वेळां संहार बाधे । कवणिएक दिवशीं गादे । उपोषणें. ॥ ४० ॥ कोणि एकदिवशीं भाग्योदय । कवण एक धनवंतें होय । कवण एक दरिद्री होय । जन्मवरी. ॥ ४१ ॥ धनाचेनि संनिधीं माजे । अधर्म करितां जो न लाजे । शिरीं वाहिजे ओझें । अहंपणाचें. ॥ ४२ ॥ जैसें जलोदरें वाढलें उदर । कीं पांडुनें सुटलें आंग फार । तेंवी धनाचा अहंकार । फुगवी तया. ॥ ४३ ॥ आणि तोचि आलिया दारिद्रकाळ । जैसा शैरत्कालीं वाळला ओहेंळ । मग केवळचि बुद्धि बरळ । होय जेव्हां. ॥ ४४ ॥ भलतीच पैं आशा रिघे । जेथ न रिघावें तेथ रिघे । काम क्रोध लोभ तिघे । उपोषित. ॥ ४५ ॥

**कश्चिदादौ दरिद्रश्च पश्चाद्भवति भाग्यवान् ।**
**कश्चित्तु भाग्यवानादौ पश्चाद्दारिद्र्यसंयुतः ॥ ८ ॥**

स्वल्प दिवस दारिद्र्य भोगी । मग सर्वेचि पदार्थां पडे पांगीं । आगीं जळे अखंड आगी । चिंतेची ते. ॥ ४६ ॥ तेव्हां अवघाचि मरे हरिख । फिरता असे कीं म्लानमुख । चांगलेंचि बोलतां मूर्ख । म्हणती लोक. ॥ ४७ ॥ मग दारिद्र्याची वेळ टळे । आणि भाग्योदय जेथ उजळे । तेथ तोखणीच करिती बरिळे । बोला जरि. ॥ ४८ ॥ जैशा पुष्पांचिया जाति । अनुक्रमेंचि विकासती । मनुष्यकाळाचि ही गति । तैसीच असे. ॥ ४९ ॥ एक सुमनें सायंकाळा । एक विकासे प्राचीवेळां । एका माध्यान्ह सगळा । पाहिजे पैं. ॥ ५० ॥ एवं सुगंधें नावाजती । श्रीमंताचिया मस्तकीं जाती । एके रंगशोभाचि करिती । सानथोरां. ॥ ५१ ॥ अति सुगंध विरळा असती । सुगंध नसती तीं बहु असती । तैसे दरिद्री लोक कसती । अनेक कर्मीं. ॥ ५२ ॥ तैसें उदंड असे जन । त्यामाजी क्वचित् असे साधन । अनेक वनीं चंदन । जयापरी. ॥ ५३ ॥

**कश्चिद्ग्रस्तश्च रोगेण कश्चिद्भोगेन संयुतः ।**
**बहुसंततिवान्कश्चित्कश्चित्संततिदुर्लभः ॥ ९ ॥**

कवण एक ग्रासिला रोगें । कवण एक आथिला भोगें । कवण एक संतान ओघें । संसारजळीं. ॥ ५४ ॥ एका संतानचि नसे मागें । तें दुःखचि हृदयीं

---

१. व्याकुळ होतो. २. रोगविशेष. ३. उन्हाळ्यांत. ४. ओढा, नाला. ५. पुष्पें ६. पुष्कळ.

जागे । तेणें उदासीन वीतरागें[1] । स्मशानवत्. ॥ ५५ ॥ एक निरुजा सर्वकाळ । एका आंगीं प्रबळ बळ । एका शरीरीं दुष्काळ । सामर्थ्याचा.॥ ५६ ॥

**संतुष्टा ज्ञानिनः केचित्केचिन्मूढाश्च दुःखिनः ।**
**केचित्तु हर्षसंयुक्ताः केचिद्रुदंति नित्यशः. ॥ १० ॥**

कोणी एक आत्मज्ञानी । समर्थ असे समाधानीं । सकळ असे आराधनी । सप्रज्ञा ते. ॥ ५७ ॥ एक अज्ञानें निर्बळ । त्यांचा वृथाचि जात्से काळ । कामबाणें सदा व्याकुळ । सदां रडती. ॥ ५८ ॥ इच्छेसारिखें न जोडे फळ । काळ असे कीं प्रतिकूळ । म्हणोनि दुःखेंचि वेळ । लोटे तयांचा. ॥ ५९ ॥ येर ज्ञानिया सदां सुखी । स्वात्मसुखाचिया हरिखीं । हास्य करी संतोखीं । जनीं वनीं. ॥ ६० ॥ ऐसे राहती बहुत जीव । कर्मचि लागलें सर्व । परस्परें होय त्यां गर्व । नेणोनि पैं. ॥ ६१ ॥

**केचिदन्नाशिनश्चैव केचिच्च तृणभक्षकाः ।**
**वृक्षपर्णाशिनः केचित्केचित्पवनभक्षकाः. ॥ ११ ॥**

एका अन्नचि जीवन । एका तृणचि भक्षण । एका वृक्षपर्णचि कारण । प्राणधारणा. ॥ ६२ ॥ भुजंगां[3] पवनचि भक्षण । गुरां श्वापदां तृणपर्ण । मनुष्ययोनिस कारण । अन्नचि एक. ॥ ६३ ॥ ईश्वरी सत्ता पैं समर्थ । जे जे योनि कल्पिजे अर्थ । मग तेवढेनिच स्वार्थ । होय त्यांचा. ॥ ६४ ॥ विविध विविध भेद । सत्ता सर्वांसि अभेद । सकळांसींच आनंद । अनुक्रमें करी. ॥ ६५ ॥ येरांचें पैं सेवन । आणिकां न होय समाधान । म्हणुनि अनुसंधान । ज्याचें तयासी. ॥ ६६ ॥

**जरायुजांडजौ चैवोद्भिजाश्च स्वेदजास्तथा ।**
**निर्मिताः प्राणिनः सर्वे भगवता स्वसत्तया. ॥ १२ ॥**

अंडज आणि जारज । उद्भिज आणि स्वेदज । जयाचा निर्मिता सहज । भगवान् जो. ॥ ६७ ॥ जो परात्पर परब्रह्म । भक्तकाजकल्पद्रुम । जयाचिया तेजें व्योम । विकासलें. ॥ ६८ ॥ जो विश्वीं असोनि नाहीं । जो देहीं असतां विदेही[4] । जयाचिया दर्शनें संदेहीं । न पडे जीव. ॥ ६९ ॥ ऐसा प्रकट गुप्त परम । जो वसवित हृदयधाम । उत्तमासि पैं उत्तम । पुरुषोत्तम जो.

---

१. वैराग्यामुळें. २. जगण्यास, वांचण्यास. ३. सापांला. ४. देहरहित.

॥ ७० ॥ जो गुरुगम्य एकांत । योगसाधन सिद्धांत । तेथ आदि आणि अंत । एक होय. ॥ ७१ ॥ सर्वसाक्षी सदोदित । जो सकळभूत हृद्गत । अचिंतन अतीत । परमेश्वर. ॥ ७२ ॥

**सुखदुःखयुताः सर्वे प्राणिनः पूर्वकर्मणा ।**
**कर्मानुसारतो जीवाश्चरंति च स्वयोनिषु. ॥ १३ ॥**

प्राणियांप्रति देखें । पूर्वकर्मानुसारिखें । सहजचि पैं सुखदुःखें । प्राप्त होती. ॥ ७३ ॥ पुण्यें सौख्यप्राप्ति होय । पापकर्में दुःखचि आहे । ऐसें जो कां राहे । तत्त्ववेत्ता. ॥ ७४ ॥ तो द्रष्टृत्वपणें सर्वेही । जें जें देखे कांहीं । तया दृष्टी नाहीं । मिथ्याचि हे. ॥ ७५ ॥ जो पूर्वापार मुमुक्षु आहे । तो मी कवण ऐसें पाहे । बहुधा शोध करिताहे । अध्यात्माचा. ॥ ७६ ॥ घेपे संतसज्जनांचा माग । पाहे अपवर्गाचा लाग । फेडी अज्ञानाचा डाग । मानसींचा. ॥ ७७ ॥ जो जातीचिया उणावा । साशंकित जीव व्हावा । कधींही तरी आत्मठेवा । सांपडे तया. ॥ ७८ ॥ जो प्रयत्नचि पैं न करी । आणि इच्छाही किमपि न धरी । तो पैरेचिया पैल तीरीं । केंवी पावे. ॥ ७९ ॥ उपोषित आणि आळशी । रोगिया पथ्य उदासी । तारुण्य आणि विविशी । रतीसि जेंवी. ॥ ८० ॥ भ्रमर आणि आंधळा । केउता देखे कमळा । कीं केवळ बैसला गळा । गायकाचा. ॥ ८१ ॥ दुर्बळ आणि पैं क्रोधी । मूर्ख आणि पैं विषादी । द्वेषी आणि दुर्बुद्धि । मान्य होय कैसेनी. ॥ ८२ ॥ तेंवी किंचिज्ज्ञ आणि आशाभूत । जीव जाड्यत्वें रमत । आणि अज्ञान पैं आवरित । ऐशामध्यें. ॥ ८३ ॥ आणि महामोहें गुंतला । परतंत्रता पावला । तो मागुती पैं आला । पूर्वस्थिति. ॥ ८४ ॥

**साभासं चैव साकारं विकृतं च त्वनेकधा ।**
**योगी पश्यति योगेन सर्वमेतच्च ब्रह्मजम्. ॥ १४ ॥**

लिंगदेह तत्त्वें पंचवीस । तोचि जाणावा साभास । साकार स्थूलदेह विलास । प्रत्यक्षाकारें. ॥ ८५ ॥ जें मानसींच पैं संभवे । तें साभास येईजे नांवें । आणि केवळ नेत्रेंचि देखावें । साकार ते. ॥ ८६ ॥ दिसतां अदृश्य जें होय । अभिधान तया साभास ये । देखिलें जाड्य तेथचि आहे । तें जाण

१. अध्यात्मज्ञानाचा.　२. मोक्षाचा.　३. परानामक वाणीच्या.　४. नांव.

पैं साकार. ॥ ८७ ॥ देव कां देवचार जाण । आण कांहीं खेचर[1] म्हण । साभासचि आपण । म्हणणें तया. ॥ ८८ ॥ आणि जेवढें भूमीवर । वर्तें धरोनियां शरीर । तें जाणिजे साकार । चर्मदृष्टीं. ॥ ८९ ॥ हें योगियां आश्चर्य दिसे । ईश्वरसत्ता प्रकाशे । तें असत्चि पैं अनारिसें । म्हणोनि तया. ॥९०॥ मूळ तें तव शून्य असे । येथ कर्ता कोणीच न दिसे । सहजचि होतसे कैसें। चरित्र हें ॥ ९१ ॥ आत्मज्ञानाचेनि प्रकाशें । जाहलियावरी ऐसें दिसे । तेथ शून्यचि पैं वसे । दृष्टीपुढें. ॥ ९२ ॥ जेथ जागृतीचें देखणें वाढे ।' तेथ स्वप्नाचा पैं भास मोडे । कीं अभ्र जैसें उडे । पवनयोगें. ॥ ९३ ॥ कीं भोजनें जाहलिया तृप्ति । क्षुधेच्या वेदना निःशेष जाती । कीं सूर्योदयीं राती । हारपे जैसी. ॥ ९४ ॥ विचार येउनि हृदयीं बैसे । तेथ अविचारत्व अवघें नासे । जेंवी कां दीपप्रकाशें । अंधार नुरे. ॥ ९५ ॥ तेंवी ब्रह्मरूप जाहलिया दृष्टी । मिथ्याचि भासली सर्व सृष्टी । तेथ जाहलिया अमृतवृष्टि । मग मरणभय तें केउतें ? ॥ ९६ ॥

**रज्जोः सर्पस्य भासश्चाप्यज्ञानं भ्रममूलकम् ।**
**ब्रह्मणि तु जगद्भासोऽज्ञानजो भ्रममूलकः. ॥ १५ ॥**

दोरत्व दृष्टि अचळ झालें । तेथ सर्पत्वचि वायां गेलें । मग सर्व मिथ्या मानुनि आलें । ब्रह्मत्व पुढें. ॥ ९७ ॥ तेणें अवघेंचि पैं पहुडलें । आणि ज्ञानचि एकटें जडलें । तेथें सर्व शून्याचें पडलें । पांघरूण. ॥ ९८ ॥ सावयव सर्वचि पैं झांकलें । आणि झांकणेंचि कीं उघडिलें । तेथ मौनचि कीं पडिलें । चेहूं[2] वाचां. ॥ ९९ ॥ स्तवनीं स्तवनचि मांडिलें । कीं स्तवितेंचि पैं निवळिलें । तेथ अर्थजात कीं आकळलें । तयामध्यें. ॥ १०० ॥ तेथ भास्यभासकता मोडली । जेथ अलभ्य वस्तु हे जोडली । मग वृत्तीच हे वाढली । माघारेंचि. ॥ १०१ ॥

**सद्भिश्च दृश्यते चैवाभेददिव्यदृशापरम् ।**
**कैवल्यं च स्थिरं नित्यं शिवजीवैक्यसौख्यदम्. ॥ १६ ॥**

तव तेथेंचि ते पंचम । अवस्था नसोनि आराम । परब्रह्म कैवल्यधाम । अविनाश जें. ॥ १०२ ॥ जयाचियें प्राप्तीसाठीं । सिद्धसाधकांची आटाटी[3] ।

---

१. आकाशांत फिरणारे २. परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी ह्या चार वाचा.
३. खटपट.

मोडुनि बैसते राहाटी । इंद्रियांचि. ॥ १०३ ॥ ब्रह्मचर्यादि व्रतें । आचरती निष्कर्म तपातें । अजपादि जपातें । विसरति ना. ॥ १०४ ॥ प्राणायामाचे सायास । गगनीं व्हावया प्रवेश । ऐशिया असाध्यास । साधु पाहाती. ॥ १०५ ॥ तेथ चर्मदृष्टीचा नाश । व्हावया दिव्यदृष्टीचा प्रकाश । धरिती पैं उद्देश । योगाचा पैं. ॥ १०६ ॥ जें कां दिव्यदृष्टि म्हणणें । तें कवणेपरीचें जाणणें । तरी ये दृश्यदृष्टीं भांबावणें । नाहीं जया. ॥ १०७ ॥ आकाराचा अग्र पाहे । अंत लक्षुनि आधींच राहे । माजिलें कौशल्य आहे । मिथ्या म्हणे. ॥ १०८ ॥ जेंवी आकाश हें निर्लेप । दृष्टीसि न दिसे रूप । सर्व मोजूनि माप । रितें[1] जैसें. ॥ १०९ ॥ अभ्रांत पडिलें जळे । तेंवी दृश्य द्रष्टत्वीं मावळे । कीं हारपिजे अनिळें[2] । गगनीं जेंवी. ॥ ११० ॥ दृष्टी सर्वेचि सामावे । सेवटीं दृष्टी कशांत मावे । ऐसें बुद्धीसीच फावे । देखणें तें. ॥ १११ ॥ देखणें देखोनि स्थिरावली । तेचि दिव्य दृष्टी ऐसी बोली । तेथलिया अनुभवाचि खोली । बहुतचि असे. ॥ ११२ ॥ जेथ जीवित्वाचें जीवत्व गेलें । शिवाचें शिवत्व हारपलें । भेद नासोनियां केलें । अभेद तैसें. ॥ ११३ ॥ लघुत्वाचें नसे मुद्दल । तरि गुरुत्वा कैचें सेल । ऐसें अगोचर कीं नवल । भगवंताचें. ॥ ११४ ॥

**ब्रह्मणि भूतसृष्टिश्च यथा हेम्नि नगास्तथा ।**
**चैतन्यं शून्यमाकाशं सर्वं वै ब्रह्मसंभवम्. ॥ १७ ॥**

सर्व नाशूनि उरलें शून्य । तयामाजि चैतन्य । चैतन्यीं मावळलें शून्य । सहजेंचि तें. ॥ ११५ ॥ जेथ पराब्जिनीचा विकास । जेथें चित्सूर्याचा प्रकाश । महदाकाशीं अवकाश । उजळला पैं. ॥ ११६ ॥ सर्व ब्रह्मत्वीं विकासलें । भूत दृष्टीं उल्हासलें । शृंगार हे भासले । सुवर्णी जैसे. ॥ ११७ ॥ तैसें साम्यत्व हृदया आलें । सर्वेचि ब्रह्म भासलें । तेथें मी हें एकांशी नासलें । शरीराचें. ॥ ११८ ॥ ऐसा ऐक्यत्वाचा ठसा । जेथ बैसला दृश्य भासा । तया बोधजळींचा मासा । जीव होय. ॥ ११९ ॥

**अधिष्ठानं च सर्वेषां विदेहिनां च दर्शनम् ।**
**सर्वेषां चापि साक्षित्वं ब्रह्म तस्मिन्स्थितं महत्. ॥ १८ ॥**

सर्वांचें देह पंचभूतांचें । अधिष्ठान धरत्रीचें । जीवन पैं उदकाचें । सर्वां

१. रिकामें. २. वायूनें.

एक. ॥ १२० ॥ सर्वां चालक एक पवन । सर्वां व्यापक एक गगन । सर्वां दाहविता दहन । एकचि जैसा. ॥ १२१ ॥ एक वस्तु सर्वां दिसे । एकचि भय सर्वां भासे । एक अन्नें तृप्ति असे । सर्वांसि पैं. ॥ १२२ ॥ पांच पांचांकडे जाती । तयासी पैं मृत्यु म्हणति । सर्वांसि सारखी ये ही गति । प्राणिजाता. ॥ १२३ ॥ एकचि भगवंत सर्वां दाता । एकचि काळ सर्वां खाता । एकचि पंथ सर्वां जातां । सोडूनि देह. ॥ १२४ ॥ एकचि साक्षी सर्वीं वसे । म्हणोनि जीवाला जीव भीत असे । विदेहता मुक्तदशें । एकचि सर्वां.॥ १२५ ॥ एका पितयाचे पुत्र असती । विषम भावें विभक्त होती । वडिलेंचि जोडिलें भोगिती । विरुद्ध भावें. ॥ १२६ ॥ मग बंधुत्व हें विसरती । गोत्रवादचि कल्पिती । तेथ एकाचें एक न साहती । बरवेपण. ॥ १२७ ॥ तेंवि विश्व अपत्य भगवंताचें । क्षणेक पोसणें संतोषाचें । तेथ अनेकत्वाचें । उठलें रूप. ॥ १२८ ॥ तेथ संरक्षण सर्वांचें । व्हावया करितां भेद रचे । मग नातेंचि नायकीचें । लाविलें जेथ. ॥ १२९ ॥ माझें घर माझें दार । माझें कलत्र पुत्र संसार । शेत परडें गुरुं ढोर । आपुलें म्हणे. ॥ १३० ॥ ऐसें विषम भावें संरक्षण । करोनि परमात्मा आपण । न धरीच विषमपण । दृष्टी पुढें. ॥ १३१ ॥ जेथ दुसराचि पैं नाहीं । विषमता कैंची तये ठायीं । म्हणोनि सर्वी व्यापुनि विदेही । परब्रह्म. ॥ १३२ ॥

**दृश्यभासश्च लोकोऽस्मिन्ब्रह्मज्ञानविघातकः ।**
**तस्माद्योगेन कार्यं च ब्रह्मज्ञानस्य साधनम्. ॥ १९ ॥**

ब्रह्मीं पावावया प्रयास । परस्पर होतां प्रवेश । आडवा येतो विश्वाभास । आघवाचि हा. ॥ १३३ ॥ दृष्टी वेधलिया कवळें । सर्वचि देखिजे पिंवळें । कीं बांबुळी पांघुरलिया जळें । आच्छादी पैं. ॥ १३४ ॥ अवरुचीग्रस्त रसना । जेंवी अंतरिजे रस नाना । कीं मुकिजे अमृतपाना । मृत्युकाळीं. ॥ १३५ ॥ ना तरी दैन्याचिया वेळे । आधींच लाभ दुरी पळे । तैसें आत्मज्ञान नुजळे । अज्ञानासी. ॥ १३६ ॥ मीना जेंवि पैं जीवन । कीं बालकाचें जेंवी स्तनपान । कीं कामातुरा मैथुन । प्रिय जैसें. ॥ १३७ ॥ तेंवी विषयांचें सुख । अज्ञानासि तैसें प्रिय देख । म्हणोनि तया संतोख । उपजेचि पैं.

---

१. अग्नि. २. पांच तत्वांकडे. ३. बायको. ४. खटपट, उद्योग. ५. जिव्हा.

॥ १३८ ॥ यया कारणें कांहीं । योगसाधन असे पाहीं । तेंचि पैं लवलाहीं । ऐक कैसें. ॥ १३९ ॥

**मार्गाश्च पंच वै साध्या योगिना फलसाधने ।**
**तेन स द्वैतनाशं च प्राप्नोति पदमव्ययम्. ॥ २० ॥**

पंचमार्गांचा अभ्यास । करावया ब्रह्मीं प्रवेश । कीजे प्राण पवनास । आमंत्रण. ॥ १४० ॥ त्रिकूट लंघुनि निघावें । सुषुम्नेमाजि पैं रिघावें । योगकार्य हें साधावें । ऐशियापरी. ॥ १४१ ॥ सहस्रदळींचें विसावणें । अनिर्वाच्य ब्रह्म पैं पावणें । जीवानें तद्रूप होणें । शिवस्वरूपीं. ॥ १४२ ॥ इंद्रियांचा उपरम[1] । करावा जेथ शमदम । तेथ पुनर्जन्माचें काम । न पडेचि कीं. ॥ १४३ ॥ सर्व वासनेचा नाश । प्रपंचाचा निरास । निजधामाचा वास । करणें जें कां. ॥ १४४ ॥

**प्रथमो विहगाख्यश्च द्वितीयो मीनसंज्ञकः ।**
**तथा पिपीलिकाख्यश्च चतुर्थः कपिसंज्ञकः. ॥ २१ ॥**

प्रथम पंथ विहंगम[2] । दुसरा मत्स्यमार्ग क्रम । तृतीय पिपीलिका[3] संगम । होय जेथ. ॥ १४५ ॥ चौथा पंथ पैं कपीचा । मिलाफ होतसे स्वस्वरूपाचा । जेथ संगम मोडे संभ्रमाचा । भवाचिया. ॥ १४६ ॥ ऐशी हे धारणा गहन । कर्माकर्मीचें होय दहन । मानसा पडे मोहन । समाधीचें. ॥ १४७ ॥ ऐसें हें अव्ययसुख परम । तेथ व्हावें पैं विश्राम । अचुक गमनीं व्योम-। गामिये किजे. ॥ १४८ ॥ अभ्यासचि अभ्यासा करी । पवनातें पैं पवन धरी । वृत्तीचिये माघारीं । वृत्ती लागे. ॥ १४९ ॥

**सुषुम्ना स्थिरवायुश्च पिंगलेडे नियम्य वै ।**
**भ्रूमध्यस्थिरदृक्चेक्षते नैराश्यं च कारणम्. ॥ २२ ॥**

जेथ वामनाडी दक्षिण । आकळोनि संक्रमण । ब्रह्मरंध्रीं निरीक्षण । करावें कीं. ॥ १५० ॥ अचेत चित्ताचा सांगांत । जेथ लक्षावया एकांत । पवन निरोध साधित । असावा कीं. ॥ १५१ ॥ पवन पूरकें आंत घ्यावा । बाहेर रेचकें सोडावा । मध्यमेमाजी करावा । कुंभक पैं तो. ॥ १५२ ॥ मग नेत्रकमळ काजळी । स्थीर केलिया निराळीं । वासनांतची होळी । करिजे जेथ. ॥ १५३ ॥ मग भ्रूकुटीमाजीं निरीक्षण । नेत्राचें किजे उपलवण । शनैःशनैः[4]

---

१. शांति. २. पक्षी. ३. मुंगी. ४. हळूहळू.

स्थिरासन । करावें कीं. ॥ १५४ ॥ मनाचियोगें आघवें । जें संसाररूप संभवे । तें मावळोनि जाय स्वभावें । जेथिचा तेथ. ॥ १५५ ॥ नामें नाम हारपलें जेथ । रूपें रूप पुशिलें जेथ । मग पुढील परमार्थ । ऐक कैसा. ॥ १५६ ॥

**संभूतं वसुधांशं च त्यक्त्वा त्यजेश्च वै परम् ।**
**सूक्ष्माख्यमपि जाड्याभिमानं देहसमुद्भवम् ॥ २३ ॥**

त्याग करूनि मेदिनीचा । भूतांसहित सर्वांचा । नैरास्य करणें अभिमानाचा । स्थूल देहीं. ॥ १५७ ॥ पृथ्वीचे भाग जेवढे । निवाड करूनियां तेवढे । निरसावेंचि वारी कोडें । आर्त्तिचेनी. ॥ १५८ ॥ अकारमातृका विस्तार । स्थूल सूक्ष्म सविस्तर । आकळावा निरंतर । सूक्ष्मत्वें. ॥ १५९ ॥ पंचीकरणीचा एकेक अंश । धरत्रीचा जेथिला दंश । तेथिला होय नैराश्य । तये मुद्रे. ॥ १६० ॥ ऐसा धारणा वारू दाटला । चतुरंग सैन्यभार आटला । तो परस्परें निवटला । जेथील तेथ. ॥ १६१ ॥

**उदकं विकृतं चैव स्थूलसूक्ष्माकृतं खलु ।**
**ततः सूक्ष्मविकारांश्च दशास्य कारणाज्जहि. ॥ २४ ॥**

उदकाश्रित विकार । तयाचा करोनि संहार । स्थूल देहा आधार । सूक्ष्माचा. ॥ १६२ ॥ पृथ्वीस आधार उदक । उदकासि पृथ्वीचा टेंक । दोहीं योगें कौतुक । पिंडोत्पत्तीचें. ॥ १६३ ॥ सूक्ष्मासि आश्रय स्थूळाचा । आणि स्थूलासि आधार सूक्ष्माचा । मग उभय योगें प्रपंचाचा । मार्ग पडे. ॥१६४॥ ते सर्व विकार सूक्ष्मींचे । जे भूतकर्दमीं असती साचे । तेंचि निरसन सर्वांचें । करणें आधीं. ॥ १६५ ॥ जैसे कूर्माचे अवयव । देहींच आवरी सर्व । तया परी देहाचें गर्व । सांडणें तेथ. ॥ १६६ ॥

**आकृष्य द्वैतबुद्धिं च गोल्हाटे स्थिरमानसः ।**
**शून्यया लोकयन्सर्वं चैतन्येन युतो भवेत्. ॥ २५ ॥**

बुद्धीचा पैं द्वैत भाव । आकळुनियां सर्व । सहजें होणें स्वभाव । उदासीन ॥ १६७ ॥ प्रथम नेत्रांचें मूळ । गोल्हाट जें तेजमंडळ । तेथ स्थीर करिजे अनिळ । प्राणायामें. ॥ १६८ ॥ मग तेथ पावोनि समाधानी । अवलोकन

---

१. पृथ्वीचा. २. वायु.

करावें शून्यीं । मग मिळोनि जावें चैतन्यीं । कवणीये परी. ॥ १६९ ॥ जैसें लवण जळीं प्रवेशे । तेथ लवण भास नाशे । एकसरां होतसे । उदकचि जैसें. ॥ १७० ॥ कीं अग्निमाजी काष्ठ पडे । तें अग्निचि होउनि पवाडे । तेथ विभूति होउनि उडे । काष्ठपण. ॥ १७१ ॥ तैसाचि हा पैं जीव । घेउनि साधनाचा समुदाव । प्राणी पावतां अभ्यास धांव । मोडली जेथ. ॥ १७२ ॥ मग निमग्न होउनि ब्रह्म सुखें । दैन्य मागिल न देखे । अन्वयाचेनि हरिखें । आनंदला. ॥ १७३ ॥ ऐसी योगाची परम खूण । विसरला पावोनि अनादिपण । तेचि झाली आठवण । न सुटे जैसी. ॥ १७४ ॥

**वैखर्यां मध्यमायां च नष्टो भासो द्विदेहयोः ।**
**तेजोऽतश्चैव पश्यंत्याः परायाः दृश्यशून्यकः ॥ २६ ॥**

वैखरी मध्यमासमान । तेथ हारपलें द्विदेहभान । पश्यंती[1] अनुसंधान । वाटलें पुढें. ॥ १७५ ॥ परेचिये आलिकडे । जेथ त्रिगुणत्व हें वाढे । ओळखोनि तयाचि हे चाडे । न गुंतेचि पैं. ॥ १७६ ॥ मग पश्यंती पावला जेथें । महातेज प्रकाशे तेथें । तेथोनि परे परौतें । पाहतां होय. ॥ १७७ ॥ तेथलिया पहाणे थोरी । जें आपणापें नाहीं करी । मग तेथलिये सरोबरी । नाहींच कीं. ॥ १७८ ॥ जेथें दृष्टत्वची वाटलें । तेथ दृश्यत्व आघवें हारीं[2] पडलें । ऐसें बहुधा केलें । तेजें जेणें. ॥ १७९ ॥ अल्पचि देखणें होतें । शरीराचिया पुरतें । तें अंकुरलें बहुतें । विस्तारणें येणें. ॥ १८० ॥

**तत्तेजसापि दृश्यं वै परब्रह्मप्रकाशकम् ।**
**पश्यति चैव योगेन नगेषु हेमरूपताम्. ॥ २७ ॥**

तया शुद्धतेजें करोनि । सकळ दृश्य अवलोकुनि । कवण त्या अनुसंधानीं । देखणें तें. ॥ १८१ ॥ जेंवी अनेक तरंग[3], उदक एक । बहुत कुमुदिनी[4], एक शशांक[5] । ज्वाळमाळे जेंवी दाहक । एकचि जैसा. ॥ १८२ ॥ उदंड चित्रें, एक भिंती । अनेक प्राण्यां एकचि ज्योति । नाना घटीं एक माती । जयापरी. ॥ १८३ ॥ विचित्र पट तंतू एक । नग प्रकाशीं एक कनक[6] । तेंवी अनंत ब्रह्मांडनायक । सर्वांभूतीं. ॥ १८४ ॥ जो अदृश्य दिव्यमान । परात्पर स्वरूप

---

१. ही चार वाणींपैकीं तिसरी वाणी. २. जिंकलें गेलें, हरलें. ३. लाटा. ४. कमलिनी. ५. चंद्र. ६. सोनें.

भगवान् । जीवचि होय निदान । जाणलिया तें. ॥ १८५ ॥ सर्वज्ञ तो कीं जाणलिया । किंचिज्ज्ञ जाणणें जाय लया । मग आपणचि तया ठाया । धणी होय. ॥ १८६ ॥ परब्रह्माचा प्रकाश । झालिया विकाशलें आकाश । अवघाचि कोंदला अवकाश । तेजें तेणें. ॥ १८७ ॥

**समाधिसुखविश्रान्तः सुखदुःखसमश्च वै ।**
**त्यक्तकामः स्थिरात्मा च भेदशून्यश्च जायते. ॥ २८ ॥**

समाधिसुखविश्रांति । जेथ सुखदुःखें हारपती । मनाची न चले व्याप्ति । जयेठायीं. ॥ १८८ ॥ भूमि जे कां दग्धली । ते तृणांकुरा जेंवी मुकली । कीं पल्लव न दावी वाळली । वृक्षदशा. ॥ १८९ ॥ कीं किरडुवें चाटिली । ओंटी जेंवी शुष्क झाली । बहुत चारणीं युक्ति केली । परी दुग्ध नाहीं. ॥ १९० ॥ तेंवी मनाचा पैं उद्देश । मोडला नुरे दृश्यभास । जाहला जेथ नाश । जीवभेदा. ॥ १९१ ॥ स्वल्पचि असतां जीवपण । जन्म नसे तो जिंकिला पण । मरण नाहीं तें आपण । स्वरूप झाला. ॥ १९२ ॥

**एवं विहगमार्गश्च साकल्येन निवेदितः ।**
**श्रवणमननैर्यस्य प्राप्यते च परं पदम्. ॥ २९ ॥**

विहंगमाचा[3] विस्तार । सर्व कथिला सविस्तर । तयाचा स्वानुभव प्रकार । ऐक कैसा. ॥ १९३ ॥ धरोनि पक्षियाचा स्वभाव । मानसीं भरावी विशेष हांव । उड्डाण करितां धांव । गगनीं ध्यावी. ॥ १९४ ॥ क्षणामध्यें मिळवी फळ । हाचि पक्षियां वेग प्रबळ । फलसाधनीं बहुत वेळ । न लगे तया. ॥ १९५ ॥ दोनीं नेत्रें दोनी पक्ष । कवळुनि उडे जो अलक्ष । आत्मफळीं लक्ष । ठेवुनियां. ॥ १९६ ॥ फळा आंतलिया बोंची । आपण फळ होय एकचि । जेथ पैं दुजेपणाची । ओळखी मोडे. ॥ १९७ ॥ ऐसा विहंगमत अभ्यास । सांगितला पैं बहुवस । साधकीं अनुभवास । आणुनि ध्यावा. ॥१९८॥

**अथातो मीनमार्गश्च कथ्यते शृणु सादरम् ।**
**येन मार्गेण यांति वै संतोऽव्ययं स्थिरं परम्. ॥ ३० ॥**

तेथ आणिक प्रकार । मीनमार्गाचा अभ्यास थोर । तें कथन पैं अवधार ।

---

१. परिणाम, शेवट. २. एक जातीचा सर्प. (दोन तोंडांचा.) ३. विहंगम=पक्षी. ४. मोक्ष साधण्याची—मिळविण्याची इच्छा करणारांनीं.

कवणियेपरी. ॥ १९९ ॥ सावध वृत्ति पैं ऐकावें । आणि तयाचेंचि मनन करावें । मानसीं कर्त्तव्य धरावें । तयाचि परी. ॥ २०० ॥ तया योगाचिया वशें । सहज ज्ञान पैं प्रकाशे । आणि आत्मप्राप्ति असे । सुलभचि पैं. ॥ २०१ ॥ नाचरितां वरी अभ्यास । केंवी प्राप्ति होय तयास । देहाभिमानाचा कस॰। केंवी मोडे. ॥ २०२ ॥ तैसें चरण चाली चालिजे । तेव्हांचि ठिकाणीं पाविजे । बैसोनि मानसीं योजिजे । तरि कैसेनि पावें. ॥ २०३ ॥ म्हणोनि मौन धारणा यया । योजिजे कैसें उपाया । प्रथम निरसिजे माया । मानसिक. ॥ २०४ ॥

**दृष्टिभेदेन शून्यश्च संन्यासेन समन्वितः ।**
**सर्वसावधचेताश्च ब्रह्मभूयाय कल्प्यते. ॥ ३१ ॥**

दृष्टि परतोनि पाहिजे । दृश्य भास नैराशिजे । एकलिच पैं निजे । मनोवृत्ति. ॥ २०५ ॥ दृष्टीचा भेद पैं तोडिजे । अभेदपणचि निवडिजे । कवणीये प्रकारें किजे । विचार तो पैं. ॥ २०६ ॥ जेथ जीवाचा जन्म झाला । जीव देहत्वें बांधला । ऐसा मोह असे झाला । पुरातन. ॥ २०७ ॥ ते जडणुक पैं तुटावी । आणि शरीराची संगति सुटावी । ममताचि हे विटावी । देहावरी. ॥ २०८ ॥ तें दृष्टीनेंचि विवरण । करोनि धरावें दृढपण । तें कवणिये परीचें विवरण । ऐक कैसें. ॥ २०९ ॥ जेथ जन्मचि नाहीं घडला । हा जीव नाहीं आंत अडला । भ्रमचि मात्र पडला । अज्ञानयोगें. ॥ २१० ॥ ऐसें दृढ देखिलें व्हावें । आहेचि जें कां स्वभावें । असे तैसेंचि पाहावें । ज्ञान दृष्टीं. ॥ २११ ॥ तरी जन्म झाला कशाचा । सहज अवकाश आकाशाचा । जेथ आहे तेथिचा । न नासे कदां. ॥ २१२ ॥ आंत पवनासी सहज असणें । तया नाहीं पैं बैसणें । जाड्यत्वासि हालविणें । सहज भावें. ॥ २१३ ॥ पवनास्तवचि आघवें घडे । परि तो कवणाचि ठायीं न जडे । कशानेंचि पैं न जडे । आच्छादितां. ॥ २१४ ॥ सहज तेज तें प्रकाशे । नेत्र भिंगारीं सहज दिसे । उदक हें वोलांशें । वोल धरी. ॥ २१५ ॥ पृथ्वी असलेचि जागीं असे । सर्व नासलिया न नासे । आतां कवणतिया भासें । जन्म येथ. ॥ २१६ ॥ एवं पंच महाभूतें असती । पिंडासवें येती ना जाती । ऐसेंच कीं

१. मनापासून उत्पन्न झालेली माया. २. विटणें=तिरस्कार उत्पन्न होणें. ३. ओलेपणाच्या अंशानें.

पाहती । दूर दृष्टी. ॥ २१७ ॥ तैसेचि ते रजतम । सात्विकें गुण परम । यथां गुणत्रयांचा उपक्रम । जेथुनी होय. ॥ २१८ ॥ ते ब्रह्मा विष्णु महेश्वर । कल्पकोटि अमर । महा भूतांचाहि प्रकार । दीर्घायुही. ॥ २१९ ॥ म्हणोनि पिंड पैं मृगजळ । आभास दिसे टवाळ । ऐसेंचि हें निर्वाळ । बुद्धि चोख. ॥ २२० ॥ तयासिच म्हणणें संन्यास । तेव्हांचि त्यागिलें दृश्य । हें न होय तरी वृथा नाश । शब्दीं कीजे. ॥ २२१ ॥ शब्दोद्देशें मेला म्हणे । तरी कैसेनि तया मरणें । तया ज्ञानाविण संहारणें । संसार शुद्धि. ॥ २२२ ॥ ययापरी संन्यास । साम्य चित्ताचा समास । तदुपरि कीजे अभ्यास । मौन मुद्रा. ॥ २२३ ॥ शरीरीं गुंततां स्वभावें । परतोनि स्वरूपीं[१] पहावें । तरीच साधन आघवें । हातासि ये. ॥ २२४ ॥

**अदृश्ये धारणा चैव धृतिस्तु चिन्मये परे ।**
**कमलिन्यां यथा भृंगो ब्रह्मणि तु मनस्तथा. ॥ ३२ ॥**

गमन पाहातां पैं दृश्यीं । लक्ष लाविलें अदृश्यीं । जरी साक्षात्कार अदृश्यीं । होईजे तेथें. ॥ २२५ ॥ अद्वय कमळीं आमोद चांग । तेथें बैसिजे भ्रमर सारंग । संसारीक संग । सांडोनियां. ॥ २२६ ॥ आत्मस्वरूपीं होउनि स्थिर । ज्ञानेंचि बळावला धीर । तेथ निवडिजे पैं क्षीरनीर । हंसबुद्धि. ॥ २२७ ॥ तेथ आत्मभाव विहीन । दृढ झालें आत्मज्ञान । मग सहजचि साधन । यशा आलें. ॥ २२८ ॥ कर्म वसे देहींचें देहीं । आपण असे आपुल्या ठायीं । ऐसि बहुधा देख नवाई[३] । विवेकाची. ॥ २२९ ॥

**पूर्वकर्मानुसारेण देही प्रपंचसंयुतः ।**
**कामक्रोधादिभिश्चैव क्लेशी दुश्चितमानसः ॥ ३३ ॥**

पूर्वकर्मसंस्कारें । जीव गुंतला देहाकारें । तेथ कामक्रोधविकारें । आकळिला. ॥ २३० ॥ केवळ वासनारूप झाला । वीतरागमार्गा[४] विसरला । दृश्य पदार्थी अनुसरला । परतंत्रपणें. ॥ २३१ ॥ तेथें अज्ञान हृदयीं संभवलें । तेणें विषय सुख प्रिय झालें । जेंवी रोगेंचि कीं आथिलें[५] । शरीर जैसें. ॥२३२॥ मग रोगा साहेल तें सेवावें । न साहे तें त्यजावें । तैसें जाहलें स्वभावें । जीवा यथा. ॥ २३३ ॥ परमार्थ नावडे भवरोगा । म्हणोनि सांडिलें ज्ञानयोगा ।

१. आत्मस्वरूपीं. २. प्राप्त होतें, मिळतें. ३. नवीनपणा, नवी गोष्ट. ४. वैराग्यमार्गास. ५. पीडिलें.

संतोष वाटे विषयभोगा । म्हणोनि सेवी. ॥ २३४ ॥ यया प्रकारें भ्रमला । जीव संसारीं विरमला । तेथूनियां उठविला । पाहिजे आतां. ॥ २३५ ॥

**दुःखार्तस्तु क्वचिल्लोके वैराग्यभक्तिसंयुतः ।**

**ज्ञानी भूत्वा प्रबुद्धश्च साधुर्भवति निर्मलः ॥ ३४ ॥**

आतां वैराग्याचिया बळें । जीव प्रपंचांतूनि ढळे । दुःखचि पैं सगळें । कळे जेव्हां. ॥ २३६ ॥ वैराग्य प्रवर्तलिया बळें । परी भगवंताचें स्वरूप नकळे । म्हणोनि ज्ञानाचिया कळे । पुढें येणें. ॥ २३७ ॥ मग ज्ञानाची कळा आघवी । प्रत्यक्ष आत्मयातें दावी । तेथील गोडीच पैं ध्यावी । सद्भक्तीनें. ॥ १३८ ॥ म्हणोनि भक्ति ज्ञान वैराग्य । झालिया ब्रह्मबोधा योग्य । विरळा कोणी सभाग्य । साधु ऐसा. ॥ २३९ ॥ बाबुळी सारणिया हात व्हावे । उदक भरणिया पात्र घ्यावें । प्राशनातें द्वार पैं यावें । मुखाचें पैं. ॥ २४० ॥ तेंवी वैराग्य हरण विक्षेपा । ज्ञान उजळी आत्मदीपा । भक्ती ते ईश्वरस्वरूपा । लुब्ध होय. ॥ २४१ ॥ पात्रचि मिळतां दीप नलगे । एकुलेचि वातीतें न सांगे । तेलाजेनि प्रकाश जागे । एकुलिया कैंवी. ॥ २४२ ॥ ना एकुलाची अग्नि घेतला । तो कैसेनि पैं दीप झाला । तिहींचाही संयोग केला । तेव्हां लागला दीप तो कीं. ॥ २४३ ॥ भक्तिच मात्र एकदेशी । आचरतां न पवे मुक्तीसि । ज्ञानावांचुनि समरसीं[1] । न मिळे ब्रह्मीं. ॥ २४४ ॥ भक्ति नसतां ज्ञान न लभे । जेंवी कां रस कोरडे जिभे । न गुंते जेंवी कां लोभें । चवीविण. ॥ २४५ ॥ ज्ञानें चातुर्यचि पैं रिघे । परी एकाकी त्याग नेघे । सर्व सांडुनियां न रिघे । केवळ ब्रह्मीं. ॥ २४६ ॥ अन्यथा ज्ञान त्यातेंचि शोधी । म्हणोनि तें तयातें अंतर नेदी । साह्यासि धांवे आधीं । वैराग्या म्हणे.॥२४७॥ पहिलें ज्ञानेंचि सर्व झालें । भूतीं भूत अंकित केलें । तें प्रवृत्तीं त्याग केलें । आतांचि कैसें. ॥ २४८ ॥ ना एकुलेंचि वैराग्य जागे । तरी न घडे त्या चित्तीं लागे । म्हणोनि ज्ञान तयाचिया संगें । अगत्य व्हावें. ॥ २४९ ॥ तेथ भक्ति ज्ञान वैराग्याचा । समरस होय पैं तिघांचा । तरीच ब्रह्मबोध साचा । म्हणों येतो. ॥ २५० ॥ तेव्हां बुद्धि पैं उजळे । लागलीच मिळे ब्रह्म कळे । मग विक्षेपासि चले । कोणी एका. ॥ २५१ ॥

---

१. एकरस, ब्रह्मानंद.

**कामक्रोधादिसंभूतो विक्षेपो ब्रह्मरूपकः ।**

**निर्द्वंद्वनिर्विकारस्य लाभे स्याद्भवछेदकः ॥ ३५ ॥**

काम विक्षेप न बाधे कांहीं । बोधचि बळावला देहीं । ब्रह्मरूपचि सर्वेहीं । जहालें जेथ. ॥ २५२ ॥ कामचि लागला भक्ति । क्रोधासि झाली वैराग्यप्राप्ति । लोभासि झाली ज्ञानस्फूर्ति । दैवें जेणें. ॥ २५३ ॥ शत्रू तेचि मित्र झाले । आघवे मित्रत्वा आले । वैरत्वचि विसरले । संसारिक. ॥ २५४ ॥ विषचि झालें अमृत । कीं मृत्युच स्थिति धरित । कीं स्पर्शचि होतां न जाळित । अग्नि जैसा. ॥ २५५ ॥ उदकचि तारिल बुडतया । कीं भूमिच सांभाळिल पडतया । भुलीच करील भूल तया । साधन जैसा. ॥ २५६ ॥ तेंवी अज्ञानचि झालें ज्ञान । आणि भवचि तोडी बंधन । ऐसें जाहलें संधान । अन्वयें येणें. ॥ २५७ ॥ ऐसा ब्रह्मस्वरूप स्वभाव । केवळचि झाला स्वयमेव । तेथ राहिला नाकीं देव । दूर तया. ॥ २५८ ॥

**अन्वयपूर्णज्ञानी च संदेहस्य विनाशकः ।**

**नित्यानंदी शिवोऽहं चेत्यनुभवति वै सदा. ॥ ३६ ॥**

पूर्व प्रकाश अद्वय ज्ञान । तेणें सर्व [1]संदेहनिरसन । साक्षिभूत पैं दर्शन । हृदयस्थाचें. ॥ २५९ ॥ नित्यानंद ब्रह्म झाला । तेणें देहभाव पैं विसरला । दैन्यासि पैं मुकला । सदैव जैसा. ॥ २६० ॥ नित्यता न मोडे गगनाची । तैशीच भावना पैं मनाची । तेणें कोंड गमनाची । वाट पैं ते. ॥ २६१ ॥ तेही अवस्था जिरे जेथें । लक्ष मावळे तेथें । तेचि दशा सद्या येथें । वसों आली. ॥ २६२ ॥ जीवसत्ता पैं आपली । शिवत्वेंचि निश्चया आली । तेथ चराचरीं पडली । एकचि प्रभा. ॥ २६३ ॥

**सर्वं ब्रह्मेति दृश्यं वै तत्पदं चाविनाशकम् ।**

**अप्रमेयं निराकारं ब्रह्मसुखसमुद्भवम्. ॥ ३७ ॥**

जेथ आकारचि ब्रह्म झाला । पूर्णज्ञानें ऐसा केला । तेथ आघवाचि गेला । देहभ्रम. ॥ २६४ ॥ जेथ प्रथम नाहीं तया रूपा । निराकार निर्लेपा । रूपाचें पाहिलिया अरूपा । ऐसें गमे. ॥ २६५ ॥ ईश्वरी सत्ता ऐशी जाहली । आत्मनिर्णयीं कळों आली । तेथ विश्व ऐशी बोली । नाहींच पैं. ॥ २६६ ॥ ऐसें

---

१. संशयाचें निरसन.

अवघडचि ब्रह्म होतें । तें सोपारेंचि[1] झालें आइतें । कवणेंपरी देखणें तें । दृष्टीस ये. ॥ २६७ ॥ जो जो आकार देखताहे । तो तो कीं मावळोनि जाये । याचा नियंता ययातीत आहे । कोणीएक ऐसा. ॥ २६८ ॥ तो परमात्मा अगोचर । ऐसेंही बोलती बहुत नर । सर्वांचें व्यापिलें अंतर । तयानेंचि. ॥ २६९ ॥ गुरुही सांगे तेंचि गम्य । विषयांविरहित रम्य । आणि दृष्टीसही साम्य । तेंचि दिसे. ॥ २७० ॥

**दृश्ये तु चित्तवृत्तीनां दमनं सर्वसावधम् ।**
**शून्येन युद्ध्यमाना च सा मीनधारणा खलु. ॥ ३८ ॥**

चित्तासि आवडे दृश्यभास । तयाचा करूनियां नाश । सावध सह या शून्यास । धावणें जें. ॥ २७१ ॥ तेथ मत्स्याचिया प्रकारें । उलट चढणें उदकधारें । तया युक्तिबळा न सरे । दुजा कोणी. ॥ २७२ ॥ म्हणोनि न थरे तेथ थरावें । न मरे तयासि मारावें । न धरे तया धरावें । इलाजें कीं. ॥ २७३ ॥ नायके तयासि गुज । न बुजे तयासी बुज । शून्याशीं ध्यावें झूज । तैसियापरी. ॥ २७४ ॥ ऐसें हें जेथ पडे करणें । तया मीनमार्ग ऐसें म्हणणें । तयासी योगधारणें । पैसें[3] असे तोचि कळे. ॥ २७५ ॥ तोचि जाणें इये खुणें । जो बैसला असे धारणें । तयासीच पारणें । ऐकतां होय.॥२७६॥ येरा होय पैं उपवास । अनभ्यासी अज्ञानास । श्रवण करितां संशयास । पात्र पैं तो. ॥ २७७ ॥ ऐसा अभ्यास जया घडला । तोचि ब्रह्मरूपीं पैं जथला । तयाचे दृष्टी संभवला । अवघाचि देव. ॥ २७८ ॥

**सर्वं संभाति च ब्रह्मदृश्यभासविवर्जितम् ।**
**जगन्न दृश्यते तेन सुप्रसन्नेन साधुना ॥ ३९ ॥**

अलंकार पाहतां दिठी । आठूनि पाहतसे खोटी । जेंवी आकाश पाहणें घटीं । असतां पैं. ॥ २७९ ॥ तैसें निश्चळ जे कां देखणें । निराकारचि पैं लक्षण । दृश्यभास भक्षिणें । आघवाचि पैं. ॥ २८० ॥ ऐशी प्रसन्नता चित्ताची । तेथ आगळीक असे देवाचि । स्थीरता होय कीं मनाची । निरंजनीं. ॥ २८१ ॥ दृश्यींच असतां बुद्धि । सहज लागे समाधि । बाल्यत्व नासुनि वृद्धि । तारुण्य जेंवी. ॥ २८२ ॥ देहाचा पैं आश्रम । तेथचि पावला विश्राम । चिद्विलासें निजधाम । परात्पर जें. ॥ २८३ ॥

---

१. सुलभ, सोपें. २. आसाशिवाय. ३. दूर.

**एवं च मीनमार्गस्तु सांगश्च कथितो मया ।**
**अयं चैव विवेकाश्रितो वैराग्येण संयुतः ॥ ४० ॥**

ययापरी मीनमार्ग । निरोपिला यथासांग । सकळ पैं नैसर्ग । नासोनियां. ॥ २८४ ॥ नाशिवंत नासोनि सरलें । सहजें अविनाश तें उरलें । कल्पित आघवें पुरलें । पूर्णत्वेंचि. ॥ २८५ ॥ जंव देहासिया आयुष्य असे । तंव आघवाचि संसार असे । म्हणोनि विवेका पैं नसे । विसंबणें. ॥ २८६ ॥ मोह ममता मना होये । म्हणोनि वैराग्य जांतां नये । सारासार अखंड पाहे । ज्ञान तें पैं. ॥ २८७ ॥ अज्ञानाश्र हें शरीर । आत्मज्ञा नाहीं तेंचि घर । याचिसाठीं सादर । राहाणें पडे. ॥ २८८ ॥ सर्व होतें देहयोगें । म्हणोनि देहचि राखावें वीतरागें । निरालंबीं जागें । राहावें सदां. ॥ २८९ ॥

**इति श्रीसिद्धांतसंहितायां सोहिराविरचितायां विहगमीनमार्गसाधनयोगो नाम नवमोऽध्यायः संपूर्णः ॥**

---

१. वैराग्यानें. २. ह्या ग्रंथाचे एकंदर १८ अध्याय आहेत. त्यांपैकीं पुढील नऊ दुसऱ्या भागांत येतील. शिल्लक राहिलेल्या नऊ अध्यायांची ग्रंथसंख्या २७१८ आहे. हा ग्रंथ शके १६७० त रचला असा सोहिरोबांनीं ग्रंथाच्या शेवटीं उल्लेख केला आहे.